# अनुक्रमणिका

या पुस्तकांत घेतलेले उतारे छापण्यास परवानगी दिल्याबद्दल प्रकाशक पुढील सद्गृहस्थांचे ऋणी आहेत:—

विदर्भगति–श्री. वा. भा. दामले, अकोला; शिवाजीचें राज्यारोहण व नानक–श्री. वि. म. वाकसकर, बडोदा; येशूचें पर्वतावरील प्रवचन—प्रो. ग. प. मबनीस, पुणें; आईचा मृत्यु, आळशी माणसाची कैफियत व ढवळ्या-गवळ्या–व्यवस्थापक, आर्यभूषण छापखाना, पुणें; आईची आठवण–प्रो. मा. त्रिं. पटवर्धन, कोल्हापूर; चोखामेळा–श्री. एम्. जी. टिपणसि; परभाषेंतील शब्दांची योजना, मराठे व इंग्रज, सुखनिधान व हैबती, व कपड्यांची अदलाबदल–श्री. न. चिं. केळकर, पुणें; गौरीशंकर आणि मानव–श्री. वि. द. घाटे, अहमदाबाद; मार्केटिसावरील खटला-प्रि. गो. चि. भाटे, सांगली; मूर्तिकार—श्री. चिं. का. मोडक, कल्याण; कोण?–प्रो. वि. स. गोगटे, जुनागड; पैसा–श्री. शं. के. कानेटकर, फलटण; गुराख्याचें गाणें व झांशी-वाली–श्री. भा. रा. तांबे, ग्वाल्हेर; काळाच्या दाढेंतून–प्रो. श्री. बा. रानडे, पुणें; कुत्र्याचा पट्टा--श्री. खं. सा. दौंडकर, मुंबई; श्री. थोरले माधवराव पेशवे--प्रो. द. वा. पोतदार, पुणें; हिमालयवर्णन--श्री. च. गो. आगरकर, अकोला; रायगडावर काय आहे?--श्री. एम्. एम्. लोंढे, पेण; धूमकेतु--श्री. रु. शं. दीक्षित, सातारा; लव्हाळी--प्रो. वि. भि. कोलते, उमरावती; वसईची मोहीम--श्री. गो. अ. मोडक, पुणें; कृष्णाकुमारी व महाराष्ट्रलक्ष्मी--श्री. एन. व्ही. करंदीकर, धुळें; प्राचीन शिक्षणपद्धति--प्रो. शं. दा. पेंडसे, नागपूर.

# विदर्भगीत

गाऊं विदर्भभूला, त्या वंद्य मातृभूला
विद्या, कला, निधींची, माहेर जी गुणांची
चढवूनि वैभवाला — गाऊं० ॥

स्मरणीय पुण्यसरिता, वाहे जिथें पयोष्णा
वितरीत सम्पदेला — गाऊं० ॥

कार्पासभू जियेची, ख्याती पुरातनीची
अजुनी न खण्ड जीला — गाऊं० ॥

अमुचा विदर्भ ठेवी, 'समभाव' बन्धुवर्गीं
महशूर हें जगाला — गाऊं० ॥

आतिथ्यधर्म अमुचा, लौकिक आजवरिचा
आहे अखंड भरला — गाऊं० ॥

दमयंति पुण्यचरितें, आदर्श भारतातें
प्रसवी पतिव्रतेला — गाऊं ॥

हरिरुक्मिणीविवाहीं, कर्तृत्व शक्ति मिळणीं
सुखसोहळाच झाला — गाऊं० ॥

अमरावतींत अम्बा, वैदर्भसंकटाला
बसली निवारण्याला — गाऊं० ॥

वैदर्भरीति सरसा, असुनी अतीव सरला
आदर्श वाङ्मयाला — गाऊं० ॥

गीर्वाण वाङ्मयाचा, कण्ठाच शारदेचा
भवभूति येथ झाला — गाऊं० ॥

गाजे महानुभाव, सारस्वतप्रभाव
तज्जन्म येथ झाला – गाऊं० ॥

कृति एकनाथ कविची, जी माय भाविकांची
तो एकनाथ इथला — गाऊं० ॥

ज्याची अभंगवाणी, प्रत्यक्ष देववाणी
तो नामदेव इथला — गाऊं० ॥

कवि श्रीमुकुन्दराज, कविताकलाविलास
येथेंच पूर्ण झाला — गाऊं० ॥

लीलावतीपित्याला, आचार्य भास्कराला
जी जन्म देई तिजला — गाऊं० ॥

स्वातंत्र्यज्योत लावी, चैतन्य मूर्त स्फुरवी
तो रामदास इथला — गाऊं० ॥

शिवमाउली जिजाई, येथेंच जन्म घेई
ठावें न हें कुणाला ? — गाऊं० ॥

ती शूर रायबागीण, शिवबासवें लढून
द्विजवंश भूषवीला — गाऊं० ॥

तो भोसले रघूजी, रणशूर धैर्यशाली
येथेंच कीर्ति व्याला — गाऊं० ॥

कवि संत देवनाथ, तैसे दयाळनाथ
गुरुशिष्ययोग इथला — गाऊं० ॥

धांवा दयाळजींचा, विख्यात द्रौपदीचा
गाती विदर्भमहिला — गाऊं० ॥

अपुला विदर्भ विभवें, नटवूं गुणप्रभावें
वचनास ह्याच बोला — गाऊं० ॥

३



शिवाजीचें राज्यारोहण

## २. शिवाजीचें राज्यारोहण

शिवाजीनें अचाट पराक्रम केले, पुष्कळ प्रांत जिंकले, अगणित संपत्ति मिळवली, शूर फौजा पदरीं बाळगल्या, लढाऊ जहाजें बांधलीं, यामुळें परमेश्वरी संकेताप्रमाणें हजारों लोकांचें जीवित त्याच्या इच्छेवर अवलंबून राहिलें; तथापि त्याला अभिषेकपूर्वक राजा ही पदवी प्राप्त झाली नसल्यामुळें राजकीय संबंधांत इतर बादशाहांशीं वागतांना त्याला मोठीच अडचण भासत असे. त्याच्या अलोट साहसानें व प्रखर बुद्धिशालित्वानें सर्व जग थक्क होऊन गेलें होतें तरी औरंगजेब बादशहा त्याला एक लहानसा जमीनदार समजत असे. व आदिलशहाच्या दृष्टीनें तो पदरच्या सरदाराचा बंडखोर पुत्र होता. गोवळकोंड्याची कुतुबशाही दक्षिणेंतीलच असल्यानें तेथील बादशहाचीही शिवाजीविषयीं भावना आदिलशहाहून भिन्न असण्याचें कारणच नव्हतें.

यथाशास्त्र राजा ही पदवी प्राप्त झाली नसल्यानें ज्या लोकांवर तो स्वपराक्रमानें राज्य करीत होता त्यांच्यापासून राजनिष्ठेचीही अपेक्षा त्याला करितां येत नव्हती. राजपद हें वंशपरंपरा चालणारें असल्यानें राजाचें वचन विश्वासपात्र समजतात. त्या दृष्टीनेंही शिवाजीची कुचंबणा होत होती. राजा या नात्यानें त्याला कोणत्याही तहावर सही करितां येत नव्हती, व कोणासही कायमच्या देणग्या देतां येत नव्हत्या. त्यानें जिंकलेल्या प्रदेशावर जरी तो निष्कंटकपणें सत्ता चालवीत असे तरी त्याचें सर्वसामान्य स्वामित्व अजून प्रस्थापित व्हावयाचें होतें. त्याच्या भगव्या झेंड्याखालीं जमलेली फौज कोणत्या तरी राजाची प्रजा असल्यानें व शिवाजी हा राजा नसल्यानें राजद्रोहाच्या आरोपांतून मुक्त होत नव्हती व पूर्वीच्या राजाचें वर्चस्व झुगारून देण्यासही समर्थ नव्हती. सारांश, या सर्व अडचणींचा निरास होऊन प्राप्तस्थितीला स्थैर्य देण्यासाठीं शिवाजीला स्वतंत्र राजपदधारणाची आवश्यकता होती.

राज्यारोहणाच्या समारंभासाठीं हिंदुस्थानांतील विद्वान् ब्राह्मण मुद्दाम बोलावण्यांत आले; आणि हा अभूतपूर्व समारंभ पाहाण्यासाठीं हजारों लोक आपण होऊन जमा झाले. त्याशिवाय इतर पाहुणे, सरदार व आप्तमंडळी, राज्यांतील अंमलदार, इतर राजांचे वकील, परदेशीय व्यापारी व प्रवासी ही सर्व मंडळी मिळून पन्नास हजारांची संख्या झाली होती. याप्रमाणें सरासरी एक लक्ष लोक जमले असून प्रत्यहीं दोन वेळा रायगडावर लक्ष भोजन होत होतें. आणि स्वाऱ्या करण्यांत, देश जिंकण्यांत आणि राज्याची व्यवस्था लावण्यांत जसें शिवाजीचें चातुर्य पदोपदीं दिसतें तसेंच त्या एक लक्ष लोकांच्या रहाण्याची व जेवणाची बरदास्त ठेवण्यांतही दिसतें. इतक्या लोकांच्या सुखसोईचा आगाऊ पूर्ण विचार करून सर्व व्यवस्था करण्यांत निःसंशय शिवाजीची दूरदृष्टी प्रतीतीस येते, असें तत्कालीन इंग्रज लेखकांनींही लिहून ठेवलें आहे.

राज्याभिषेकापूर्वी शिवाजीनें निरनिराळ्या क्षेत्रीं जाऊन तेथील देवतांचें दर्शन घेतलें. तारीख २१ मे रोजीं दोन प्रहरीं तो रायगडावर परत आला व भोसल्यांचा कुलोपाध्याय प्रभाकरभट्टाचा मुलगा बाळंभट्ट याच्या अनुज्ञेनें महादेव, भवानी आणि इतर देवस्थानें यांच्या पूजा शिवाजीनें यथासांग केल्या. हा पूजाक्रम बरेच दिवस चालला होता. हें कृत्य संपल्यावर गागाभट्टानें शिवाजीकरवीं यथाशास्त्र प्रायश्चित्त करवून त्यास शुद्ध करून घेतलें. नंतर तारीख २८ मे रोजीं उपनयन संस्कार करून त्याला गायत्री मंत्राचा उपदेशही केला.

दुसरे दिवशीं ता. २९ मे रोजीं ज्ञाताज्ञातदोषपरिहारार्थ सप्तधातू सप्तधान्य यांत शिवाजीची तुला करून त्यावर एक लक्ष होन दक्षिणा ठेऊन तेंही सर्व ब्राह्मणांस अर्पण केलें. शालिवाहन शके १५९६ आनंदनामसंवत्सरे ज्येष्ठ शुद्ध १३ शनिवार ता. ६ जून सन १६७४ हा दिवस राज्याभिषेकासाठीं निश्चित करण्यांत आला. आजपर्यंत रोज कांहींना कांहीं धार्मिक विधि असून त्यांतच शिवाजीचा बहुतेक वेळ जात असे. आज पहांटेपासून विधींस सुरवात होणार होती. सचैल व समंत्रक

असें शुद्धोदकानें स्नान केल्यावर शिवाजीनें कुलस्वामीचें दर्शन घेतलें. कुलोपाध्याय गागाभट्ट आणि इतर विद्वान् ब्राह्मण यांना नमस्कार केला आणि समर्थ रामदासस्वामी व मातुश्री जिजाबाई यांना वंदन केलें. या वेळीं जिजाबाईच्या आनंदाला सीमाच नव्हती. ती आतां ऐशींच्या घरांत आली असून अत्यंत वृद्ध झाली होती. तथापि तिचे डोळे झांकण्या-पूर्वीं शिवाजीला प्राप्त झालेली पदवी व सुख पाहून तिचा आनंद त्रिभुवनांत मावेनासा होणें साहजिकच होतें. मनुष्यजन्मांत अधिकांत अधिक जें ऐश्वर्य मिळणें शक्य आहे तें शिवाजीनें स्वपराक्रमानें प्राप्त करून घेतलें होतें. ज्या देशांत तो जन्मला तेथील शत्रूंना पादाक्रांत करून तो सशास्त्र सिंहासनावर आरोहण करणार होता. शिवाजी हा अजिंक्य योद्धा असून जिजाबाईला शिवाजीपेक्षांही प्रिय असलेल्या धर्माचा तो संरक्षक असल्याबद्दल त्याची प्रसिद्धी होती. या एकंदर कारणांमुळें जिजाबाईच्या सुखाला तर पारावारच नव्हता. या समारंभा-नंतर अवघ्या बाराच दिवसांनीं जिजाबाई मृत्यु पावली. यावरून हा समारंभ पाहण्यासाठींच परमेश्वरानें तिला आजपर्यंत जिवंत ठेवलें होतें असें म्हणावें लागतें.

राज्यारोहण समारंभांत अभिषेक हा मुख्य विधि असून त्यानंतर छत्रचामर धारण केलें म्हणजे राजा ही पदवी प्राप्त होते. अभिषेक-समयीं शिवाजीचा पोषाख शुभ्र असून त्याच्या गळयांत फुलांचे हार घातले होते. कपड्यावर सुवासिक द्रव्यें शिंपडलीं असून इतरही भूषणें तो ल्याला होता. याप्रमाणें वस्त्रालंकारयुक्त होऊन तो अभिषेकासाठीं सुवर्ण चौकीवर येऊन बसला. ही चौकी दोन फूट उंच व दोन फूट चौरस होती. त्याच्या डाव्या बाजूस पट्टराणी सोयराबाई व मागच्या बाजूस युवराज संभाजी बसला होता. "सुवर्णाचे कलश केले व सुवर्णाचे तांबे केले. आठ कलश व आठ तांबे यांनीं अष्टप्रधानांनीं राजियास अभिषेक" सप्त महानद्या व समुद्र यांच्या उदकांनीं मंत्रोच्चाराच्या गज-रांत व मंगल वाद्यांच्या घोषांत केला. सोळा सुवासिनींनीं राजास पंचा-

रती ओंवाळली. याप्रमाणें अभिषेकाचा विधि यथासांग पार पडला. यानंतर शिवाजीनें कपडे बदलले. वर सोनेरी कलाबतूंनीं विणकाम केलें होतें असा शेंदरी अंगरखा त्यानें अंगांत घातला. रत्नजडित सुवर्णालंकारांनीं तो विभूषित झाला. मोत्यांचा कंठा व फुलांचा हार यावेळीं त्याच्या गळयांत रुळत होता. आणि मोत्यांचा तुरा असलेली उंची पगडी त्याच्या मस्तकावर होती. ढाल, तलवार व धनुष्यबाण यांची पूजा केल्यावर त्यानें पुनः गुरुजनांना वंदन केलें व नंतर ज्या दालनांत सिंहासन ठेवलें होतें त्या दालनांत तो सुमुहूर्तावर प्रविष्ट झाला.

राज्यारोहण जेथें व्हावयाचें तें दालन उत्तम प्रकारें शृंगारलें होतें. भिंतीवर धार्मिक आज्ञेप्रमाणें निरनिराळया अशा बत्तीस आकृति व कित्येक शुभवृक्षांचीं चित्रें काढलीं होतीं. दालनाला भरजरीचें छत असून त्याला मोत्यांची झालर लावली होती. खालीं मोठमोठ रुजामे पसरले होते. आणि मध्यभागीं सुंदर नकसकाम केलेलें सिंहासन ठेवलें होतें. " तख्त सुवर्णाचें बत्तीस मणाचें सिद्ध करविलें. नवरत्नें अमोलिक जितकीं कोषांत होतीं त्यांमध्यें शोध करून मोठीं मोलाचीं रत्नें तख्तास जडाव केलीं. जडित सिंहासन सिद्ध केलें, रायरीचें नांव रायगड म्हणोनी ठेवलें. तख्तास स्थळ तोच गड नेमला. गडावरी तक्त बसवावें असें केलें." बत्तीस मण म्हणजे चौदा लक्ष रुपयांचें सोनेंच झालें. रत्नांची किंमत त्याशिवाय. हें सिंहासन तयार करीत असतांना दिल्लीचें मयूर सिंहासन शिवाजीचे दृष्टीपुढें असावें. हें सिंहासन अतिशय मूल्यवान् होतें असें तत्कालिन इंग्रज लोकही म्हणतात. सिंहासनाच्या अष्टकोनांस अष्टखांब रत्नजडित केले. "छत्र जडावयाचें मोतीलग झालरीचें करून मस्तकावर धरिलें." व्याघ्रांबराला मखमल लाऊन तें व्याघ्रांबर सिंहासनावर आंथरलें होतें. सारांश, या दालनांत आर्यपद्धतीचा साधेपणा व मोंगली पद्धतीचा विलासीपणा यांचें मिश्रण मोठें हृदयंगम दिसत होतें.

सिंहासनाच्या उभय बाजूंस सुवर्णाचे त्रिशूळ उभे केले असून त्यावर निरनिराळीं राजचिन्हें लटकविलेलीं होतीं. उजवीकडेस देवमाशांचीं भव्य सुवर्ण मस्तकें आडकवून ठेवलीं होतीं. या मत्स्यांचे दांत फारच मोठे होते. डावीकडे एका त्रिशूळावर तुर्कांच्या पद्धतीप्रमाणें घोड्यांच्या शेपट्या लटकऊन दिलेल्या होत्या, व दुसऱ्यावर न्यायदर्शक चिन्ह म्हणून आडव्या सरळ रेषेंत दांडी असलेली तराजू लोंबत होती. राजवाड्याच्या मुख्य दरवाज्याजवळ उदकानें भरलेले कुंभ ठेवले असून त्यावर वृक्षपल्लव पसरले होते. तसेंच गोपुराजवळ एक कलभ ( हत्तीचें पिल्लूं ) आणि दोन सुंदर घोडे उभे केले होते. घोड्यांचे लगाम व सामान सोन्याचें केलेलें होतें. हीं सगळीं शुभचिन्हें म्हणून प्रसिद्ध आहेत.

शिवाजी सिंहासनावर आरूढ होतांच दरबारी मंडळींनीं त्यावर सुवर्णपुष्पाची व रत्नपुष्पांची वृष्टि केली. नंतर सोळा सुवासिनींनीं पंचारती ओवाळली आणि ब्रह्मवृंदांनीं वैदिक मंत्राच्या घोषांत शिवाजीला शुभ आशीर्वाद दिले. शिवाजीनें त्यांना भक्तिपूर्वक नमन केलें व सर्वांनीं " शिवाजीमहाराज की जय " म्हटलें. या जयघोषानें आकाश दुमदुमून गेलें. सर्व वाद्यें एकाच वेळीं वाजविण्यांत आलीं व त्यांच्या आवाजानें नभोमंडळ भेदून गेलें. राज्यांतील सर्व किल्ल्यांवर राज्यारोहणाच्या ठरविलेल्या वेळीं तोफांची सरबत्ती झाली. या समारंभाचा मुख्य पुरोहित गागाभट्ट, मोत्यांचा तुरा लावलेला राजमुगुट हातांत घेऊन, सिंहासनाजवळ गेला व त्यानें तो मुगुट शिवाजीच्या मस्तकावर ठेवून ' शिवछत्रपति की जय ' असा घोष केला.

नंतर इतर वेदोनारायण पुढें होऊन त्यांनीं शिवाजीवर आशीर्वादांची वृष्टि केली. यावेळीं शिवाजीनें सर्वांना २४ हजार होनांची दक्षिणा वांटली. तींपैकीं सात हजार होन एकट्या गागासच मिळाले. " कित्येक नवरत्नादिक सुवर्ण कमळें व नाना सुवर्ण फुलें वस्त्रें उदंड दिधलीं. दानपद्धतीप्रमाणें षोडश महादानें इत्यादिक दानें दिलीं. अष्टप्रधानांस लक्ष

होन. दर असामीस त्याखेरीज एक एक हत्ती, घोडा, वस्त्रें, अलंकार देणें दिलें. ” अष्टप्रधानांचीं मुसलमानी नांवें बदलून मुख्य प्रधान, मंत्री, अमात्य, सुमंत, पंडितराव, सेनापति, सचीव, न्यायाधीश अशीं संस्कृत नांवें ठेविलीं व तींच प्रचलित केलीं.

राज्यारोहणाचा सर्व विधि समाप्त झाला त्यावेळीं सकाळीं आठाचा सुमार झाला होता. नंतर निराजीपंतानें इंग्रज वकील हेन्री ऑक्सेंडेन यास सामोरें आणून उभें केलें. हेन्रीनें शिवाजीस खालीं लवून मुजरा केला आणि त्याचा दुभाषा नारायण शेणवी यांनीं इंग्रजांतर्फे हिऱ्याची आंगठी राजास नजर केली. शिवाजीनें हेन्रीस सिंहासनाजवळ मानाचा पोषाख दिला व मग त्यास रजा दिली.

सर्वांचा नजराणा झाल्यावर शिवाजी सिंहासनावरून खालीं उतरला व बाहेर येऊन आपल्या घोड्यावर स्वार झाला. घोड्यावरील सामान मोठें किंमती होतें. शिवाजी घोड्यावरून राजवाड्याच्या मैदानांत आला. तेथें खालीं उतरून त्यानें आपल्या आवडत्या हत्तीवर आरोहण केलें. हत्तीवरील सामान व झूल याच प्रसंगासाठीं अतिशय किंमती मुद्दाम तयार केली होती. हत्तीच्या आसपास अष्टप्रधान, मागें सगळा फौजफाटा आणि जरीपटका व दोन हत्तींवर सर्वांच्या पुढें भगवा झेंडा, त्या मागें आपआपल्या तुकडींचे पृथक् पृथक् झेंडे घेऊन सज्ज झालेलें पायदळ, नंतर तोफखाना, त्यांतच वाद्यें असा या स्वारीचा थाट होता. यावेळीं रायगडावरील प्रत्येक घर ध्वजपताकांनीं व तोरणांनीं शृंगारिलें होतें. ही स्वारी राजरस्त्यानें निघाली तेव्हां घरोघरच्या सुवासिनींनीं राजावरून मंगलदीप ओंवाळले व लाह्या, फुलें, दुर्वा यांचा राजावर पाऊस पाडिला. रायगडावरील अनेक मंदिरांत राजानें जाऊन दर्शन घेतल्यावर ही स्वारी राजमहालांत परत फिरली.

## ३. घनश्याम सुंदरा

घनश्याम सुंदरा श्रीधरा, अरुणोदय झाला
उठिं लवकरि वनमाळी उदयाचलीं मित्र आला. ॥ ध्रु० ।

सायंकाळीं एकेमेळीं द्विजगण अवघे वृक्षीं
अरुणोदय होतांच उडाले चरावया पक्षी.
अघमर्षणादि करुनि तापसी तपाचरणदक्षी
प्रभातकाळीं उठुनि कापडी तीर्थपंथ लक्षी.
करुनि सडासंमार्जन गोपी कुंभ घेउनि कुक्षीं
यमुनाजळासि जाति मुकुंदा, दध्योधन भक्षीं.
॥ चाल ॥ मुक्तता होऊं पाहे कमलिनीपासुनि भ्रमरा,
पूर्वदिशें मुख धुतलें, होतसे नाश तिमिरा;
उठिं लवकरि गोविंदा, सांवळया नंदकुमरा;
मुखप्रक्षालन करीं, अंगिकारिं भाकरकाला,
उठिं लवकरि वनमाळी उदयाचलीं मित्र आला. ॥ १ ॥

घरोघरीं दीप अखंड त्यांच्या सरसावुनि वाती
गीत गाति सप्रेमें गोपी सदना येति, जाती.
प्रवर्तोनि गृहकामीं रंगावळि घालूं पाहती;
आनंदकंदा प्रभात झाली उठ सरली राती.
काढिं धार क्षिरपात्र घेउनी धेनू हंबरती;
द्वारिं उभे गोपाळ हांक मारुनि तुजला बाहती.

॥ चाल ॥ हे मुक्ताहार कंठीं घालिं, या रत्नमाला,
हातिं वेत्रयष्टि बरवी, कांबळा घेई काळा.
ममात्मजा मधुसूदना हृषिकेशि जगत्पाळा,
लक्षितातिं वांसुरें हरि धेनुस्तनपानाला,
उठिं लवकरि वनमाळी उदयाचलीं मित्र आला. ॥ २ ॥

विद्यार्थी विद्याभ्यासास्तव सादर गुरुपायीं;
अध्यापन गुरु करिति शिष्यही अध्ययना उदयीं.
याज्ञिक जन कुंडामधिं आहुति टाकितातिं पाहीं
रविप्रभा पडुनियां उजळल्या शुद्ध दिशा दाही.
हे माझे पाडसे सांवळे उठ कृष्णाबाई,
सिद्ध सवें बळिराम घेउनि गोधनें वना जाई.
॥ चाल ॥ मुनिजनमानसहंसा, श्रीमनःकमलभृंगा,
मुरहर पंकजपाणी, पद्मनाभ श्रीरंगा,
शकटांतक सर्वेशा, हे हरि प्रतापतुंगा,
कोटि रविंहुनी तेज आगळे तुझिया वदनाला.
होनाजीबाळ नित्य ध्यातसे हृदयिं नाममाळा. ॥ ३ ॥

# ४. येशूचें पर्वतावरील प्रवचन

आणि मग येशू गॅलिलीमध्यें ईश्वराचा संदेश सांगत फिरूं लागला, व लोकांचे सर्व प्रकारचे रोग तो बरे करूं लागला.

त्याची कीर्ति सीरिआभर पसरली; सर्व प्रकारच्या यातनांनीं पीडिलेले रोगी, भूतबाधा झालेले, वेडपे व पंडुरोगी यांना घेऊन लोक त्याच्याकडे आले; त्या सर्वांना त्यानें बरें केलें.

गॅलिलींतून, डेकॅपोलीहून, जेरूसलेमहून, ज्यूडिआंतून व जॉर्डन नदीच्या पैलतीरावरून लोकांच्या झुंडी त्याच्यामागें चालल्या.

त्या झुंडी पाहून तो पर्वतावर चढला. तेथें बसल्यावर त्याचे शिष्य भोंवतीं जमले. त्यानें आपल्या शिकवणीस आरंभ केलाः—

" जे नम्र वृत्तीचे ते धन्य; कारण स्वर्गाच्या राज्याचे ते धनी होतील.

जे दुःखांनीं गांजले ते धन्य; कारण त्यांचें सांत्वन करण्यांत येईल.

जे सहनशील ते धन्य; कारण पृथ्वीचा वारसा त्यांना मिळेल.

जे पुण्यासाठीं भुकेले व तहानेले ते धन्य; कारण त्यांची तहानभूक शमविण्यांत येईल.

जे दयावंत ते धन्य; कारण त्यांच्यावर ईश्वराचा अनुग्रह होईल.

जे निष्कपट ते धन्य; कारण त्यांना ईश्वराचें दर्शन होईल.

जे शांतता स्थापितात ते धन्य; कारण त्यांना ईश्वराचीं लेंकरें म्हणतील.

जे धर्मासाठीं छळ सोसतात ते धन्य; कारण स्वर्गाच्या राज्याचे ते धनी होतील.

जेव्हां माझे अनुयायी म्हणून लोक तुम्हांला शिव्या देतील, तुमचा छळ करितील, तुमच्यावर हवे ते आळ घेतील तेव्हां तुम्ही धन्य व्हाल.

यांतच आनंद माना; कारण स्वर्गांत याबद्दल तुम्हांला मोठें बक्षीस मिळेल. मागें जे ईश्वराचे प्रेषित होऊन गेले त्यांचा असाच छळ लोकांनीं केला.

धर्मोपदेशकांच्या व कर्मठांच्या धर्मशीलतेपेक्षां तुमची धर्मशीलता जास्त होईल तरच तुमचा स्वर्गांत प्रवेश होईल असें माझें म्हणणें आहे.

'न हन्यात्' अशी प्राचीन धर्माज्ञा तुम्हीं ऐकिली आहे; जो दुसऱ्याचा वध करील त्याला ईश्वरापुढें जाब द्यावा लागेल.

मी म्हणतों, जो आपल्या बांधवांवर निष्कारण रागावेल त्याला, ईश्वरापुढें जाब द्यावा लागेल; जो त्याला 'भिकारड्या' म्हणेल त्याला नरकांत पडावें लागेल.

ईश्वरापुढें नैवेद्य नेला असतां भावाशीं आपलें कांहीं वितुष्ट आलेलें तुला आठवेल तर तो नैवेद्य खालीं ठेवून परत जा; त्या भावाशीं प्रथम सख्य कर, व नंतर येऊन नैवेद्य दाखव.

'खोटी शपथ घेऊं नको, ईश्वराची शपथ घेऊन खरें सांग,' अशी प्राचीन धर्माज्ञा तुम्हीं ऐकिली आहे.

पण मी म्हणतों, कशाचीच शपथ घेऊं नको; स्वर्गाची नको, कारण स्वर्ग म्हणजे ईश्वराचें सिंहासन होय. पृथ्वीची नको, कारण पृथ्वी ईश्वराची पाय ठेवण्याची तिवई होय; जेरूसलेमची नको, कारण तें महान् राजाधिराजाचें शहर होय; स्वतःच्या डोक्याची नको, कारण त्यावरील एकहि केस तुला काळ्याचा पांढरा करितां येत नाहीं.

होय असेल तर होय, नाहीं असेल तर नाहीं एवढेंच म्हणा; यापेक्षां जास्त म्हणणें म्हणजे पाप होईल.

शेजाऱ्यावर प्रेम करावें व शत्रूचा द्वेष करावा हें तुम्हीं ऐकिलें आहे.

पण मी म्हणतों, शत्रूंवर प्रेम करा; जे तुम्हाला शिव्याशाप देतील त्यांचें शुभ चिंतन करा; जे तुमचा द्वेष करितील त्यांचें हित करा; व जे तुम्हांला दुष्टाव्यानें छळतील त्यांना सुख होण्यासाठीं ईश्वराची प्रार्थना करा.

स्वर्गस्थ ईश्वराचीं लेंकरें तुम्ही शोभिलीं पाहिजे; दुष्टांवर व साधूंवर तोच सूर्य उगवतो, व दुर्जनांवर व सज्जनांवर तोच पाऊस पडतो, ही ईश्वराची करणी तुम्हांस माहीत नाहीं काय ?

दान द्यावयाचें तें लोकांपुढें प्रदर्शन न होतां दिलें जावें अशी खबरदारी घ्या, नाहीं तर ईश्वराकडून तुम्हांला बक्षीस मिळणार नाहीं.

- म्हणून जेव्हां दान देशील तेव्हां मनुष्यांच्या स्तुतीला हपापलेल्या भोंदू लोकांप्रमाणें देवळांत व रस्त्यांत वाद्यें वाजवूं नको. त्यांना पाहिजे असतें तें बक्षीस त्यांना मिळतें यांत संशय नाहीं.

पण तूं जेव्हां दान करशील तेव्हां उजव्या हाताची गोष्ट डाव्या हाताला सुद्धां कळूं देऊं नको.

तुझें दान गुप्त राहिलें पाहिजे; आणि मग तुला न कळत तुझीं सर्व कृत्यें पाहणारा ईश्वर तुला सर्वांसमक्ष बक्षीस देईल.

जेव्हां तूं प्रार्थना करिशील तेव्हां भोंदू लोकांप्रमाणें वागूं नको, कारण आपल्याकडे सर्व लोकांनीं पहावें म्हणून पुष्कळ रस्ते मिळण्याच्या ठिकाणीं व देवळांत उभे राहून प्रार्थना करण्यांत त्यांना फुशारकी वाटते. त्यांना पाहिजे असतें तें बक्षीस त्यांना मिळतें यांत संशय नाहीं.

पण जेव्हां तुला प्रार्थना करावयाची असेल तेव्हां आपल्या खोलींत जाऊन खोलीचें दार बंद कर व अदृश्य अशा ईश्वराची एकांतांत प्रार्थना कर; आणि मग तुला न कळत तुझीं कृत्यें पहाणारा तो ईश्वर सर्वांसमक्ष बक्षीस देईल.

आपल्या बांधवांना त्यांच्या अपराधांबद्दल तुम्ही क्षमा कराल तर स्वर्गस्थ ईश्वरहि तुम्हांला क्षमा करील.

पण आपल्या बांधवांना त्यांच्या अपराधांबद्दल जर तुम्ही क्षमा केली नाहीं तर स्वर्गस्थ ईश्वरहि तुम्हांला क्षमा करणार नाहीं.

पृथ्वीवरील मूल्यवान् वस्तूंचा संचय करूं नका; त्यांना कसर लागते, व गंज चढतो आणि चोर येऊन घर फोडून त्या चोरून नेतात.

तर स्वर्गांत मूल्यवान् ठरेल अशाचा संचय करा. त्याला कसर लागत नाहीं, व गंज चढत नाहीं आणि चोरांना घर फोडून तें चोरून नेतां येत नाहीं.

दुसऱ्यांच्या अपराधांची चौकशी करूं नका; कारण मग तुमच्या अपराधांची चौकशी होईल.

ज्या रीतीनें तुम्ही चौकशी कराल त्या रीतीनें तुमची चौकशी होईल; ज्या मापानें तुम्ही द्याल त्याच मापानें तुम्हांला मिळेल.

आणि आपल्या भावाच्या डोळ्यांतलें कुसळ तुला दिसतें; पण स्वतःच्या डोळयांतील मुसळ कसें दिसत नाहीं ?

भावाला कोणत्या तोंडानें तूं म्हणशील 'माझ्या डोळ्यांत मुसळ आहे खरें, पण तुझ्या डोळ्यांतील कुसळ काढूं दे.'

अरे भोंदु मनुष्या ! आधीं आपल्या डोळ्यांतील मुसळ काढून टाक, म्हणजे आपल्या भावाच्या डोळ्यांतील कुसळ काढून टाकण्याइतकें स्पष्ट तुझ्या डोळ्यांना दिसूं लागेल.

माग म्हणजे मिळेल; शोध कर म्हणजे सांपडेल; ठोठाव म्हणजे उघडेल.

जो मागतो त्याला मिळतें; जो शोध करितो त्याला सांपडतें; जो ठोठावतो त्याच्यासाठीं दार उघडतें.

मुलानें खाऊ मागितला असतां त्याच्या हातांत दगड ठेवील असा कोण मनुष्य तुम्हांमध्यें आहे ?

पापी अशा तुम्हांला देखील आपल्या मुलांना चांगले चांगले पदार्थ द्यावयाचें समजतें, तर जे मागावयास येतील त्यांना चांगल्या वस्तू स्वर्गस्थ ईश्वर दिल्याशिवाय राहील काय ?

दुसऱ्यांनीं आपल्याशीं जसें वागावें असें तुम्हांस वाटतें तसें तुम्ही त्यांच्याशीं वागा. हीच धर्माज्ञा, हीच प्रेषितांची शिकवण.

अरुंद दरवाजांतून शिरा. कारण नाशाकडे जाणारा रस्ता व रस्त्याच्या कडेचा दरवाजा रुंद आहे; त्यांतून जाणारे पुष्कळ आहेत.

जीविताकडे जाणारा रस्ता व रस्त्याच्या कडेचा दरवाजा अरुंद आहे; तो ज्यांना सांपडतो असे लोक थोडे आहेत.

खोट्या प्रेषितांच्या नादीं लागूं नका. त्यांचा वेष मेंढरांचा पण कृति खादाड लांडग्यांची असते.

त्यांच्या कृतीच्या परिणामांवरून त्यांची पारख करा. बाभळीवर द्राक्षें व निवडुंगावर अंजिरें कोणास सांपडलीं आहेत काय ?

चांगल्या झाडाला चांगलीं फळें येतात व कुजक्या झाडाला नासकीं फळें येतात.

चांगल्या झाडाला वाईट फळें यावयाचीं नाहींत, व कुजक्या झाडाला चांगलीं फळें यावयाचीं नाहींत.

ज्या झाडाला चांगलीं फळें येत नाहींत, तें तोडून जाळून टाकितात. म्हणून फळांवरून झाडाची परीक्षा तुम्ही केली पाहिजे.

जो माझीं वचनें ऐकेल व त्याप्रमाणें कृति करील त्याला मी खड-काच्या भक्कम पायावर घर उभारणाऱ्या शहाण्या माणसाची उपमा देईन.

पाऊस कोसळला व पूर आला, वारा तुफान सुटला व घरावर बडवूं लागला; पण तें ढासळलें नाहीं, कारण तें खडकावर बांधलें होतें.

जो माझीं वचनें ऐकितो, पण त्यांप्रमाणें कृति करीत नाहीं, त्याची स्थिति वाळूवर घर उभारणाऱ्या मूर्ख मनुष्यासारखी होईल.

पाऊस कोसळला व पूर आला, वारा तुफान सुटला व घरावर बडवूं लागला तेव्हां तें घर पडलें. काय तें धाडकन् कोसळण ! ”

येशूचें प्रवचन संपलें तेव्हां सर्व लोक आश्चर्यानें थक्क झाले !

कारण इतर धर्मोपदेशकांप्रमाणें नव्हे, तर कोणी तरी अधिकारी पुरुष अशा रीतीनें तो बोले.

तो पर्वतावरून खालीं उतरला तेव्हां लोकांच्या झुंडी त्याच्यामागून चालल्या.

## ५. स्फुट अभंग

१

साधूनी बचनाग खाती तोळा तोळा । आणिकांतें डोळा न पाहवें ॥ १ ॥
साधूनी भुजंग धरतील हातीं । आणिकें कांपती देखोनियां ॥ २ ॥
असाध्य तें साध्य करितां सायास । कारण अभ्यास तुका म्हणे ॥ ३ ॥

२

कासया पाषाण पूजिती पीतळ । अष्ट धातू खळ भावें हीन ॥ १ ॥
भावचि कारण भावचि तारण । मोक्षाचें साधन बोलियेलें ॥ २ ॥
काय करिल जपमाळा कंठमाळा । करिसी वेळोवेळां विषयजप ॥ ३ ॥
काय करिसील पंडित होउनी । अक्षराभिमानी थोर होय ॥ ४ ॥
काय करिसील कुशल गायन । अंतरीं मलीन कुबुद्धि ते ॥ ५ ॥
तुका म्हणे भाव नाहीं करी सेवा । तेणें काय देवा योग्य होसी ॥ ६ ॥

३

आशा हे समूळ खाणोनी काढावी । तेव्हांचि गोसावी व्हावें तेणें ॥ १ ॥
नाहीं तरि सुखें असावें संसारीं । फजिती दुसरी करूं नये ॥ २ ॥
आशा मारूनियां जयवंत व्हावें । तेव्हांचि निघावें सर्वांतूनि ॥ ३ ॥
तुका म्हणे जरी योगाची तांतडी । आशेची बींबुडी करीं आधीं ॥ ४ ॥

४

बरें झालें देवा निघालें दिवाळें । बरी या दुष्काळें पीडा केली ॥ १ ॥
अनुतापें तुझें राहिलें चिंतन । झाला हा वमन संवसार ॥ २ ॥
बरें झालें देवा बाईल कर्कशा । बरी हे दुर्दशा जनामध्यें ॥ ३ ॥
बरें झालें जगीं पावलों अपमान । बरें गेलें धन ढोरें गुरें ॥ ४ ॥
बरें झालें नाहीं धरिली लोकलाज । बरा आलों तुज शरण देवा ॥ ५ ॥

बरें झालें तुझें केलें देवाईल । लेकरें बाईल उपेक्षिलीं ॥ ६ ॥
तुका म्हणे बरें व्रत एकादशी । केलें उपवासीं जागरण ॥ ७ ॥

५

जाउनियां तीर्था काय तुवां केलें । चर्म प्रक्षाळिलें वरी वरी ॥ १ ॥
अंतरींचें शुद्ध कासयानें झालें । भूषण त्वां केलें आपणया ॥ २ ॥
वृंदावनफळ घोळिलें साकरा । भीतरील थारा मोडेचिना ॥ ३ ॥
तुका म्हणे नाहीं शांति क्षमा दया । तोंवरी कासया फुंदा तुम्ही ॥ ४ ॥

६

झाली होती काया । बहुत मळीण देवराया ॥ १ ॥
तुझ्या उजळली नामें । चित्त प्रक्षाळिलें प्रेमें ॥ २ ॥
अनुतापें झाला झाडा । प्रारब्धाचा नितोडा ॥ ३ ॥
तुका म्हणे देह पायीं । ठेवूनि झालों उतराई ॥ ४ ॥

७

जप तप ध्यान नलगे धारणा । विठ्ठल कीर्तनामाजीं उभा ॥ १ ॥
राहे माझ्या मना दृढ या वचनीं । आणिक तें मनीं न धरावें ॥ २ ॥
कीर्तनीं समाधि, साधन ते मुद्रा । रहतील थारा धरोनियां ॥ ३ ॥
तुका म्हणे मुक्ति हरिदासांच्या घरीं । वोळगती चारी ऋद्धिसिद्धि ॥ ४ ॥

८

सांगो जाणती शकुन । भूत भविष्य वर्तमान ॥ १ ॥
त्यांचा आम्हांसी कंटाळा । पाहों नावडती डोळां ॥ २ ॥
ऋद्धिसिद्धींचे साधक । वाचासिद्ध होती एक ॥ ३ ॥
तुका म्हणे जाती । पुण्यक्षयें अधोगती ॥ ४ ॥

# ६. आईचा मृत्यु

गंगाबाई अगदीं एकटी पडली होती. आणि तिच्या मनांत नाना प्रकारचे वाईट विचार राहून राहून येऊन तिच्या आधींच उद्विग्न झालेल्या मनाला अतोनात उद्विग्नता आणीत होते. होतां होतां माईसाहेबांच्याविषयीं तिच्या मनांत विचार येऊन तिला अतोनात गहिंवर आला. आणि एकाएकीं मोठ्यानें तिच्या तोंडून पुढील उद्गार बाहेर पडले. "देवा, सोडीव आतां मला, माझं काय ओक्ष उरलं असेल तें त्या माउलीला दे." हा अत्यंत उदार उद्गार तिचे तोंडून बाहेर पडण्यास आणि माईसाहेबांनीं आंत पाऊल टाकण्याला एकच गांठ पडली. तो उद्गार त्या माउलीच्या कानीं पडतांच तिच्या मनाला काय बरें वाटलें असेल? तिच्या मनांत कोणकोणते विचार उचंबळूं लागले असतील? आपण जें सत्कृत्य करीत आहों किंवा दुसऱ्यावर उपकार करीत आहों त्याच्याबद्दल आपल्या तोंडावर कोणीहि स्तुति करील, परंतु आपण नसतांना आपल्याविषयीं एखाद्यानें आपल्यापाशींच अर्थात् अगदीं मनोभावानें "देवा, सोडीव आतां मला, माझं काय ओक्ष उरलं असेल तें त्या माउलीला दे" असें स्पष्ट म्हणावें. यापेक्षां सत्कार्याचें फल तें आणखी काय पाहिजे? गंगाबाईचे ते शब्द ऐकून माईसाहेबांना एक क्षणमात्र समाधान झाल्यासारखें झालें असें म्हटलें तर मनुष्यस्वभावाला केवळ अनुसरून होईल. एक क्षणभर जरी तिला समाधान वाटलें असलें, तरी दुसऱ्या क्षणीं तिला त्या उद्गारांबद्दल अतोनात वाईट वाटलें, आणि तिनें गंगाबाईला आपल्या पोटाशीं धरून म्हटलें, "गंगाबाई, हें अभद्र बोलणं कां बोलतां? तुमच्या पदरीं तीन मुलें, तीं अजून लहान असून तुम्ही अशी मरणाची इच्छा कां करतां?" माईसाहेबांनीं आपले शब्द ऐकिले हें पाहतांच गंगाबाईला थोडेसें चमत्कारिक वाटलें, परंतु वाईट वाटलें नाहीं. त्यांतून माईसाहेबांचे ते शब्द ऐकून तर तिला फारच गहिंवर आला, आणखी ती एकदम त्यांना म्हणाली, "माईसाहेब, माझ्या पोरांच्याबद्दल आतां मला

एक काडीइतकी सुद्धां काळजी वाटत नाहीं. अहो, मी जगून त्यांना काय करणार आहे ? तुमच्या पदरांत आतां त्यांना मीं घातलीं आहेत. आणखी तुम्हीं पण घेतलीं आहेत." "गंगाबाई" माईसाहेब म्हणाल्या, "पुनः असले वाईट विचार मनांत आणूं नका. तीं माझीं आहेत खरीं, पण तुमच्यावांचून त्यांचं कसं बरं होईल ? उगीच असा वेडेपणा करूं नका. आतां चार दिवसांनीं तुम्हीं बऱ्या व्हाल. हें काय असलं ! या काळजीनं तर इतकं सगळं तुमचं दुखणं लांबलं, नाहीं तर कधींच उठलां असतां; कांहीं काळजी करूं नका, नाहींना करणार ?"

परंतु गंगाबाईच्या तोंडून कांहींच उत्तर आलें नाहीं. ती विचार करीत पडली होती. आणखी अशाच प्रकारचीं बोलणीं होत होत संध्याकाळ झाली. रात्र झाली. यशवंतराव घरीं आला. तिघांही मुलांचीं जेवणें झालीं. माईसाहेबांनीं येऊन गंगाबाईला आग्रह करून थोडीशी साबूदाण्याची खीर घातली आणि त्या आपल्या घरीं गेल्या. मुलें निजलीं. गंगाबाईही निजली. तिच्या मनाला काय वाटलें असेल तें असो. ती संध्याकाळपासून अगदीं बोलनाशी झाली. तिला गाढ झोंप लागली. सहा वाजले. कृष्णी प्रथम उठली; आणि तिला कांहीं मजेदार स्वप्न पडलें तें आईला सांगण्यासाठीं म्हणून तिच्याजवळ जाऊन, "आई, आज मला किनई एक सपन पडलं बरं कां ?" असें म्हणून तिला हांका मारूं लागली. परंतु आई ओ देईना. "हें ग काय आई, तूं बोलत कां नाहींस ? अशी कां रागावलीस ?" असें म्हणून ती तिला हालवूं लागली. परंतु आई मुळींच बोलेना. "तिला झोंप लागली असेल, कां ग उगीच त्रास देते आहेस," असें यशवंतराव तिला रागें भरला. पण तिकडे लक्ष न देतां "ऊं, ऊं, हें काय ग आई ? ऊं ऊं मी नाहीं जा," असें म्हणून ती रडूं लागली. बिचारी अज्ञान पोरगी ! खरोखर रडण्याचाच प्रसंग आपणावर आला आहे हें तिला मुळींच समजलें नाहीं.

ज्या आईला आपण नुसती हांक मारल्याबरोबर, "ओ, कृष्णे, बाळ काय म्हणतेस ?" असे गोड शब्द कधींच कानीं पडल्याखेरीज राहिले

नाहींत, ती आई आज आपण रडूं लागलों तरी ओ देत नाहीं, हलविली तरी हलत नाहीं, हें पाहाण्याबरोबर त्या अजाण पोरीच्या मनांत काय बरें आलें असेल? निष्ठुर मृत्यु कसा असतो तें अजून तिला ठाऊक नव्हतें. यामुळें तिला आपली आई मेली असावी, अशी कल्पना तरी कशाला येते आहे? तिला आपलें वाटलें कीं, आई कांहीं कारणानें रुसली आहे, आणि त्यामुळें ती आपल्याशीं बोलत नाहीं. तरी पण आपल्यावर किंवा गोविंदावर आई रुसल्याचा तिला कधीं अनुभव नव्हता. एकदां दोनदां—आणि तीहि नुकती नुकतीच येशादादावरती रुसली होती. तेव्हां या वेळीहि त्याच्यावरच रागावली असून त्याच्यामुळेंच आपल्याशींहि बोलत नाहीं हा विचार तिच्या वेड्या मनांत आला आणि ती आपल्या दादाकडे वळून म्हणते "तुझ्यावर रागावली आहे कारे आई?" हे तिचे अज्ञानाचे शब्द किती विलक्षण बरें? हे शब्द मनामध्यें किती कळवळा उत्पन्न करतात? अग वेडे पोरी, तुझी आई आतां येशादादावरच काय, पण तुम्हां दोघांवर देखील पुरती रागावून गेली आहे. आजपर्यंत तुमच्यावर ती कधीं रुसली नाहीं याचा पुरा वचपाच आतां तिनें काढला. आतां पुनः कधीं दिसायची नाहीं.

कृष्णीचे ते शब्द ऐकून दूर बसलेला यशवंतराव जरा कुऱ्यानें म्हणतो, "हो हो रागावली आहे जा. वात्रट पोरटी कुठली? निजूं दे तिला तशीच. आज दोन दिवसांत तिला चांगली झोंप आली नाहीं. जा अंमळ तूं बाहेर." यशवंतरावानें असें म्हटलें म्हणून कृष्णी थोडीच ऐकते आहे? तिला आईखेरीज क्षणभरसुद्धां होत नसे. आणि त्यांतून ती आपलें गोड स्वप्न आईला सांगण्याविषयीं फार उत्सुक झालेली. पुनः आपल्या आईकडे वळून म्हणते, "बरं, तूं बोलली नाहींस तरी मी तुझ्या कानांत सांगेन?" इतकें बोलून तिनें आपलें तें कोमल, सुंदर व असमंजस मुख त्या निस्तेज, शांत व गंभीर दिसणाऱ्या मुखाजवळ नेलें. तो देखावा कोण विलक्षण! दोनही चेहऱ्यांत

साम्य फार. जन्मल्यानंतर कांहीं वर्षांची सुकुमार, मुग्ध अशी गंगाबाई आणि आयुष्यांतल्या अनंत चिंता—संतापांनीं जळून जळून शेवटीं मरण पावलेली गंगाबाई या दोनीहि त्यावेळीं एकदम अगदीं शेजारीं शेजारीं दिसल्या. एक उत्सुकता, आनंद, मुग्धता व असमंजसपणा यांनीं पूर्ण म्हणून अतिशय चंचल; आणि दुसरी निस्तेजता, दुःख, निराशा यांनीं ग्रासून जाऊन निर्जीव झालेली, अर्थात निश्चल. त्या दोन मूर्तींचा तो विरोध किती हृदयद्रावक होता! जीव आणि मृत्यु यांचाच विरोध तो! तो तसा असल यांत नवल काय? लहान का होईना, परंतु जिवंत आणि सदोदित झुळझुळ वाहणारा झरा, आणि सूर्याच्या निष्ठुर तापानें निर्जल झालेली नदी; अजून पुरती उमलली नाहीं परंतु फार टवटवीत अशी चाफेकळी आणि चांगली फुलून सुगंध पसरविणारें परंतु अरसिकाच्या हातीं पडल्यामुळें त्यानें चोळामोळा करून निर्जीव करून टाकलेलें चाफ्याचेंच फूल! असले विरोध पाहून कोणाचें अंतःकरण द्विधा होणार नाहीं?

त्या लहान पोरीनें आपल्या आईच्या कानाशीं आपलें तोंड नेलें आणि ती त्यांत कांहीं पुटपुटली. तें आईनें ऐकिल्याबरोबर ती खास हंसणार असें वाटूनच काय आपण हंसत हंसत तिच्या तोंडाकडे पाहूं लागली. परंतु तेथें काय आहे? महानिद्रेच्या स्वाधीन झालेल्या त्या चेहऱ्यावर कांहीं फरक होणार आहे? हें झालें तेव्हां मात्र पोरीला फारच चमत्कारिक वाटलें आणि 'दादा, आई नाहींच ना रे उठत' असें केविलवाण्या तोंडानें यशवंतरावास म्हणाली. कृष्णी इतकी खटपट करीत आहे तरी आई उठत नाहीं, याचें आतां त्याला सुद्धां आश्चर्य वाटलें आणि तो आईच्या जवळ जाऊन पाहूं लागला, तों तो विलक्षण चेहरा पाहून सगळ्यांत भयंकर असा विचार एकदम त्याच्या मनांत उभा राहिला. आणि एकदम 'आई' 'आई' असें म्हणून तो ओरडूं लागला. तो कांहीं लहान नव्हता. मरण म्हणजे काय हें त्याला समजतच होतें. आईचा तो निस्तेज, थंडगार चेहरा पाहून तो समजला,

भ्याला आणि घाबरून निराशेनेंच ओरडूं लागला. आईला आपण मुकलों, तिला कितीहि हांका मारल्या तरी ती कांहीं आतां आपल्याला ओ देऊं शकत नाहीं, असें त्याच्या मनाला पक्कें वाटलें. यशवंतराव एवढ्यानें घाबरल्यासारख्या हांका मारतो आहे कां असें वाटूनच काय, माईसाहेब गोविंदाला कडेवर घेऊन आल्या. गरीब बिचाऱ्या त्या माउलीला काडीइतकी देखील शंका आली नव्हती कीं, आजच असें कांहीं होईल. माईसाहेब आंत येण्याबरोबर यशवंतराव आणि कृष्णी दोघेंहि आपापल्या परीनें त्यांच्याकडे फार केविलवाण्या मुद्रेनें पाहून म्हणतात, "पहा हो! आई किती केलं तरी जागीच होत नाहीं. तुम्ही तरी हांका मारा हो!" हे त्या पोरांचे दीनवाणें आणि घाबरलेले शब्द माईसाहेबांच्या कानावर पडत होते, परंतु डोळ्यांनीं खरी स्थिति तेव्हां जाणून त्यांचा ऊर एकदम भरून आला; मोठा थोरला हुंदका एकदम बाहेर पडला; आणखी "बाबांनो, आतां कुठली आई ओ द्यायला!" असा हृदयभेदक उद्गार एकदम बाहेर पडला. त्यांचा धीर खचला व जशाच्या तशाच त्या मटकन् खालीं बसल्या.

## ७. आईची आठवण

प्रेमस्वरूप आई ! वात्सल्यसिंधु आई !
बोलावुं तूज आतां मी कोणत्या उपायीं ?
तूं माय लेंकरूं मी; तूं गाय वासरूं मी;
ताटातुटी जहाली आतां कसें करूं मी ?

गेली दुरी यशोदा टाकूनि येथ कान्हा,
अन् राहिला कधींचा तान्हा तिचा भुका ना ?
तान्ह्यास दूर ठेवी—पान्हा तरीहि वाहे—
जाया सती शिरे जी आगींत, शान्त राहे;

नैष्ठुर्य त्या सतीचें तूं दाविलेंस मातें
अक्षय्य हृत्प्रभूचें सामीप्य साधण्यातें.
नाहीं जगांत झाली आबाळ या जिवाची,
तूझी उणीव चित्तीं आई, तरी हि जाची.

चित्तीं तुझी स्मरेना कांहींच रूपरेखा
आई हवी म्हणूनी सोडी न जीव हेका
विद्याधनप्रतिष्ठा लाभे आतां मला ही
आईविणें परी मी हा पोरकाच राही.

सारें मिळे परन्तू आई पुन्हां न भेटे
तेणें चिताच चित्तीं माझ्या अखंड पेटे.
वाटे इथूनि जावें, तूझ्यापुढें निजावें,
नेत्रीं तुझ्या हसावें, चित्तीं तुझ्या ठसावें,

वक्षीं तुझ्या परी हें केव्हां स्थिरेल डोकें,
देईल शान्तवाया हृत्स्पन्द मन्द झोके ?
घे जन्म तूं फिरूनी, येईन मीहि पोटीं,
खोटी ठरो न देवा, ही एक आस मोठी !

## ८. चोखामेळा

गावा नच मानाचा चोखामेळा महार सामान्य
ज्याच्या करि साधूंचा चोखा मेळा महारसा मान्य !
— मोरोपंत

चोखामेळा हा पंढरपूरच्या वतनदार महारांपैकीं एक महार असून आचारानें अत्यंत थोर सत्पुरुष होता. महीपति आपल्या संतलीलामृताच्या ३० व्या अध्यायांत चोखोबासंबंधानें लिहीत असतां म्हणतोः–

अंत्यज जाती असोनि देह । परी कोमल तयाचें हृदय, ॥
अवघे आत्मवत भासताहे । द्वैत नये चित्तासी ॥
आपुलें आणि परावें बाळ । दोहोंची सारिखी कळवळ, ॥
भजन करीत सर्व काळ । चित्त निश्चळ हरिभजनीं. ॥
सर्वस्वें जोड होतां दानीं । परि असत्य न वदे वाणी, ॥
याच शुद्धतेकरोनी । चक्रपाणी तुष्टला ॥

सारांश, चोखामेळा देहानें जरी अंत्यज होता, तरी त्याचें अत्यंत दयार्द्र अंतःकरण, 'आत्मवत्सर्वभूतानि' अशा प्रकारची बनलेली त्याची चित्तवृत्ति, सदासर्वदा भगवन्नामस्मरणांत गढून गेलेलें त्याचें मन, आणि त्याची गाढ सत्यनिष्ठा पाहिली, म्हणजे जन्मसिद्ध देहानें श्रेष्ठ अशा हजारों लोकांपेक्षां परमेश्वराला तो अधिक प्रिय होता, याबद्दल कोणालाहि आश्चर्य वाटण्याचें कारण नाहीं.

नामदेव, सांवतामाळी, जनमित्र आणि राका यांच्याप्रमाणेंच चोखामेळा हाहि एक गृहस्थाश्रमी संत होता. यावरून पहातां सर्वस्वाचा त्याग करून अरण्यांत जाऊन रहाणें ही गोष्ट संतपणा अंगीं येण्यास आवश्यक आहे, अशी जी पुष्कळांची समजूत आहे, ती चुकीची ठरते. गृहस्थाश्रमी संत चोखोबा यांच्या पत्नीविषयीं संतलीलामृतकार म्हणतातः-

कांता तैसी पतिव्रता । भावें भजे पंढरीनाथा ।
जाणे पतीच्या मनोगता । द्वैत सर्वथा न धरीच. ॥
दरिद्रें दुष्काळें पीडिले जरी । परी त्यासि हानि कदा न करी ।
सर्वस्व दान करावया सुंदरी । चित्तीं उजरी वागवित ॥

अशा रीतीनें एकमेकांच्या स्वभावाला अनुकूल वर्तन करणारें हें दांपत्य सदाचरणांत आणि ईशभजनांत कालक्षेप करीत असतां, एके दिवशीं स्नानादि नित्यकर्म आटोपून चोखोबा महाद्वारीं नामस्मरण करीत बसले होते. इतक्यांत कर्ममार्गाचा पोंचटपणा लोकांच्या निदर्शनाला आणून निष्काम भक्तिमार्गाकडे त्यांचीं मनें वळविणाऱ्या संतांचा छळ करणारे कांहीं ब्राह्मण तेथें आले, आणि त्यांना म्हणाले, " अरे चोख्या,

विठोसि तुझी असती प्रीति
तरी राउळांत नेता तुजप्रती;
दृष्टीस न देखतां रुक्मिणीपति
करिसी भक्ति व्यर्थ कासया ।
विप्रांघरीं निपजलें पक्कान्न
त्या अनसुट पात्रीं न बैसे श्वान;
तेंवि पांडुरंगभक्तीस अधिकारी जाण
अंत्यज याती नसे कीं !

ब्राह्मणांच्या बोलण्यावर चोखोबांनीं उत्तर दिलें, " ब्राह्मणहो, परमेश्वराच्या ठिकाणीं प्रेम असणें, ही गोष्ट महत्त्वाची आहे; त्याच्यावर प्रेम नाहीं, आणि त्याच्या मूर्तीला दिवसांतून दहा वेळां आलिंगन दिलें, तरी त्यापासून काय होणार आहे ? देवावर प्रेम असलें म्हणजे झालें. मूर्तीला भेटण्याची कांहीं आवश्यकता नाहीं. कमलिनीपासून लाखों कोस दूर असणारा सूर्य ज्याप्रमाणें तिचें संरक्षण करतो, चकोरापासून हजारों योजनांच्या अंतरावर असणारा चंद्र जसा त्याचा परामर्श घेतो, किंवा आपल्या पिलांपासून दूर अंतरावर राहूनहि कांसवी जसें त्यांचें संगोपन

करते, तसा परमेश्वर आपल्या भक्तांपासून कितीहि लांब असला तरी त्यांचा सांभाळ करूं शकतो, असें नाहीं कां तुम्हांला वाटत? मी या मूर्तीच्या भेटीला फार आतुर झालों आहे अशी तुमची समजूत पण ती अगदीं चुकीची आहे. तसा प्रकार मुळींच नाहीं. हा पहा मी चाललों." असें म्हणून चोखोबा घरीं निघून गेले.

याच रात्रीं चोखोबा भजनरंगांत दंग असतां, पांडुरंग आपणाला देवळांत बोलावीत आहे असा भास होऊन ते राउळांत गेले, आणि गाभाऱ्यात शिरून त्याच्या मूर्तीशीं बोलूं लागले. गाभाऱ्यांतून येणारा चोखामेळयाचा शब्द ऐकून पुजाऱ्यांची एकच धांदल उडाली. या भूदेवांनीं चोख्या महाराचा हात धरून त्याला बाहेर काढिलें आणि 'तूं देवळांत कां गेलास?' असें दरडावून विचारिलें. तो म्हणालाः— "महाराज, मी आंत गेलों नाहीं. मला पांडुरंगानें आंत नेलें, त्याला मी काय करूं? झाली गोष्ट होऊन गेली, आतां तुम्ही माझा हा अपराध उदारपणें पोटांत घालून मला एकवार क्षमा करा."

पण या बोलण्यानें ब्राह्मणांचें समाधान झालें नाहीं. चोखोबानें देव बाटविला, असें वाटून त्यांनीं त्याजवर शिव्यांचा सारखा भडिमार चालविला. इतक्यांत कोणी एकानें देवाचा हार त्याच्या अंगावर टाकून तो चोरी करण्याकरितांच गाभाऱ्यांत शिरला असावा, असें म्हटलें. आणि 'चोर, चोर' म्हणून ते त्याला लाथाबुक्यांचा मार देऊं लागले. चोखोबांचा वाली काय एक परमेश्वर. मार असह्य होऊन चोखोबांनीं परमेश्वराचा जो धांवा केला, तो त्यांच्याच शब्दांत येथें देतों.

धांव घालीं विठू आतां चालूं नको मंद ॥ ध्रु० ॥
बडवे मज मारिती ऐसा कांहीं तरी अपराध!
विठोबाचा हार तुझे कंठीं कैसा आला?
शिव्या देउनि म्हणती, महारा, देव बाटवीला!
अहो जी महाराज, तुमचे द्वारींचा कुतरा,
नका जी मोकलूं चक्रपाणी, दुजे द्वारा!

जोडुनियां कर चोखा विनवितो देवा !
बोलीला उत्तरीं परी राग नसावा !

चोखोबांचा हा अभंग-त्यानें हंबरडा फोडून देवाला मारलेली ही हांक-किती प्रेमळ आणि हृदयभेदक आहे ! चोखोबांचा जीव घाबरा झाला, पण त्या पाषाणहृदयी लोकांना कांहीं त्यांची दया आली नाहीं. त्यांनीं त्या महाराला खूप बडविलें, आणि तितक्यानेंहि तृप्त न होऊन अखेर बायकांमुलांसुद्धां गांवाबाहेर हांकून लाविलें ! चोखोबांची अशी अवस्था लावून त्या पांडुरंगाच्या मूर्तीला ती चोखामेळयाच्या स्पर्शानें भ्रष्ट झाली असें समजून ते ब्राह्मण आपल्या मंत्रतंत्रानें शुद्ध करूं लागले ! पण देवाला त्यांचा हा उपद्व्याप खपला नाहीं. अभक्त ब्राह्मणांनीं केवळ स्वोदरभरणाप्रीत्यर्थ अर्पण केलेल्या पंचपक्वान्नांच्या नैवेद्यांपेक्षां सदाचारी भक्त चोखोबामहाराच्या घरची दहींभाकर त्याला अधिक गोड वाटून तो चंद्रभागेपलीकडे त्याच्या झोंपडींत जाऊन खुशाल जेवूं लागला !

जनाबाईला ज्याप्रमाणें देव आपल्याबरोबर दळतो असें वाटत होतें, तसेंच चोखोबांची वृत्ति तल्लीन झाली म्हणजे त्यांना तो आपलीं ढोरें ओढतो आणि आपणांबरोबर जेवतो, असें वाटत होतें. अशा स्थितींत पांडुरंग आपल्या घरीं द्वादशीला पारण्याकरितां आला आहे असें समजून चोखोबा त्याजपाशीं आपलें हितगुज सांगत असतां, आणि त्यांची पत्नी त्याला—

पुढें ठेवियेलें पात्र । वाढी कुटुंबी तें अन्न ॥
तुम्हां योग्य नाहीं देवा । गोड करूनीयां जेवा ॥
विदुरा घरच्या पातळ कण्या । खासी माय बापा धन्या ॥
द्रौपदीच्या भाजीपाना । भुललेती नारायणा ॥
तैसी झाली येथें परी । बोले चोखयाची महारी ॥

असें म्हणत असतां, तें बोलणें कांहीं ब्राह्मणांनीं ऐकलें आणि चोखामेळयानें देवाला आपल्या घरीं जेवावयाला घालून बाटविलें, अशी कंडी

सर्व गांवभर पिकविली. अशा रीतीनें देव बाटल्याची बातमी गांवोगांव पसरल्यास आपली पैदास्त बुडेल अशा भीतीनें ताबडतोब—

पुजारी समस्त मिळोनी । सभापत्र केलें त्यांनीं ॥
कीं अंत्यजासि मारिल्यावांचुनी । देव कुणी न पूजावा ॥

अशा रीतीनें देवाला तात्पुरता अपूज्य ठरवून आणि त्यावर बहिष्कार घालून चोखामेळ्याचा पुरा सूड उगविण्याकरितां ते पुजारी पंढरपुरच्या अधिकाऱ्याकडे गेले. त्यांनीं त्याला तें सभापत्र दाखवून सर्व वृत्तांत कळविला, आणि चोख्यामहाराला शिक्षा झाल्यावांचून आम्ही येथून हालणार नाहीं, असें म्हणून आपलीं पागोटीं काढून ते त्याच्या दाराशीं धरणें धरून बसले.

अधिकारी अविचारीच होता. त्यानें ताबडतोब हुकूम करून चोख्या महाराला आपणापुढें कैद करून आणविलें. तो तेथें येतांच 'देवबाटव्या, देवाला बाटविणारा' असें म्हणून सर्वांनीं त्याजवर शिव्यांची लाखोली वाहिली.

चोखोबा शांतपणें त्या सर्वांना म्हणाले: "महाराज, परमेश्वर मनुष्यप्राण्याची भक्ति पहातो, जात पहात नाहीं, असें व्यासादि महर्षींचें म्हणणें आहे. तेव्हां तें आपल्याला मान्य असलेंच पाहिजे. शिवाय दुसरें असें आहे कीं, आपले हस्तपादादि अवयव जरी भिन्न असले, आपल्या चेहऱ्यामोहऱ्याच्या बनावटी जरी अगदीं वेगवेगळया तऱ्हेच्या असल्या, एकंदरींत आपलीं शरीरें जरी परस्परांशीं मिळतीं नसलीं, तरी निरनिराळया जातींत जन्माला आलेल्या आम्हां मनुष्यप्राण्यांचाच काय पण आमच्याप्रमाणेंच पशुपक्ष्यांचाहि आत्मा एकच आहे. तो तुम्हां ब्राह्मणांच्या देहांत जसा आहे, तसाच आम्हां अतिशूद्रांच्याहि देहांत आहे. त्याला वर्ण, जाति वगैरे मनुष्यकृत उपाधि मुळींच बाधूं शकत नाहींत. आम्ही अतिशूद्र जातींत जन्म पावलेले लोक या पृथ्वीच्या पाठीवर रात्रंदिवस वावरत असतों.

पण आमच्या स्पर्शानें ही पवित्र भूमि अपवित्र झाल्याचें कधीं ऐकलें नाहीं. तुम्ही ब्राह्मणजातींत जन्मल्यामुळें मानवी दृष्टीनें पवित्र ठरलेले लोक, आणि आम्ही महार, मांग, चांभार हीन जातींत जन्मल्यामुळें त्याच दृष्टीनें अपवित्र ठरलेले लोक, असे आपण सर्वजण शुद्धोदका भागिरथीमध्यें स्नान करितों; पण आमच्या स्पर्शानें ती गंगामाता अशुद्ध झाली, असें कधीं कोणीं म्हटलें नाहीं ! वायु ब्राह्मणांना तेवढा स्पर्श करतो आणि शूद्रातिशूद्रांपासून दूर रहातो, असें थोडेंच आहे ? असें असतां पृथ्वी, भागीरथी आणि वायु यांना आपण कधीं आपल्या वेदमंत्रांनीं पवित्र करून घेण्याचा खटाटोप केला नाहीं. मग पांडुरंगाची मूर्ति माझ्या स्पर्शानें बाटली, असें समजून आपण ती आपल्या मंत्रतंत्रांनीं शुद्ध करून घेतली ती कां बरें ? पृथ्वी, गंगोदक आणि मारुत हीं जशीं सदा पवित्र आहेत, आत्मा जसा या काल्पनिक स्पर्शजन्य दोषापासून अलिप्त आहे, तसाच--

देवाधिदेव रुक्मिणीपति । त्यासि सारिख्या सकळ याति । तयासि विटाळ कैशा रीति । तुमचे चित्तीं भासतो ? अनंत ब्रह्मांडें भरून जाणा। अलिप्त असे वैकुंठ राणा । तरी वायांच विकल्प धरूनि मना । होतसां दूषणा अधिकारी ॥

हा रुक्मिणीपति देवाधिदेव अनंतब्रह्मांडव्यापक श्रीपांडुरंग सदा पवित्र असून त्याला वर्णगुरु ब्राह्मण आणि श्वपच चांडाल हे सारखेच प्रिय आहेत. "

चोखोबाचें हें विचारपरिप्लुत निर्भीड भाषण ऐकून ब्राह्मणांच्या तळपायांची आग मस्तकाला गेली, आणि ते त्याला म्हणाले: " चोख्या, निर्लज्जा, तूं राऊळांत जाऊन देवाला शिवलास, त्या वेळीं आम्हीं तुला क्षमा करून तूं पुनः तेथें जाऊं नयेस म्हणून तुला फक्त गांवाबाहेर हांकून लाविलें. त्यानंतर तूं देवळांत आला नाहींस हें खरें, पण देवालाच आपल्या घरीं नेऊन भोजन घालूं लागलास ! आमच्या उपकारांची

फार चांगली फेड केलीस ! शिवाय, महा नीच मानलेल्या जातींत तुझा जन्म झाला असतां आम्हां भूदेवांना तूं या ब्रह्मज्ञानाच्या गोष्टी सांगतोस, काय म्हणावें तुला ! ”

अधिकारीसाहेबहि खूप संतापले आणि त्यांनीं देवाला बाटविल्याचा चोखोबांवरील गुन्हा शाबीत धरून त्यांना बैलांकडून ओढवून, ठार मारण्याची शिक्षा दिली ! हा हुकूम ऐकून धरणेकरी ब्राह्मणांना मोठा आनंद झाला, आणि ते आपापलीं पागोटीं चढवून पुढील तयारीला लागले. बैल आले आणि चोखामेळयाच्या पायाला काढण्या बांधून त्या बैलांकडून त्याला ओढून मारण्याची सर्व तयारी झाली ! किती विलक्षण ही शिक्षा ! ही पहाण्याकरितां हजारों लोक जमले. कांहींना मोठा आनंद झाला होता, आणि कांहींजण धर्माच्या ठिकाणीं दिसून आलेला तो विषमभाव पाहून फार हळहळत होते;

तंव अधिकारी बोले उत्तर । वृषभासि असुड मारा निकुर ।
कैसा पावतो याचा ईश्वर । पाहों साचार दृष्टीसी ! ॥

अधिकाऱ्याचा हुकूम झाला आणि बैलांवर चाबकाचे तडाके उडूं लागले. पण चोखोबांचे प्राण वांचवावे अशी देवाचीच इच्छा होती, तेव्हां त्याला कोण मारणार ? बैलांना मारतां मारतां दुष्टांचे हात दुखूं लागले, पण बैल कांहीं चालेनात ! हा चमत्कार पाहून त्या पुजाऱ्यांची सूड घेण्याची इच्छा थोडी मंदावूं लागली होती. इतक्यांत ही बातमी कळून चोखोबांची सहधर्मचारिणी तेथें आली आणि जमलेल्या हजारों लोकांना उद्देशून म्हणाली, “ महाराज, आपण हा काय जुलूम चालविला आहे ? अहो,

देहासि विटाळ म्हणती सकळ,
आत्मा हा निर्मळ शुद्ध बुद्ध !

विटाळाचा संबंध, फार झालें तर या देहापुरताच आहे. देहाला काय तो विटाळ. परमेश्वराचा अंश जो आत्मा तो सदा निर्मळ आणि

शुद्धबुद्ध असा आहे. त्याला विटाळ नाहीं. हें जर खरें, तर प्रत्यक्ष परमेश्वराला–पांडुरंगाला–आमचा विटाळ झाला असें समजून तुम्ही यांना ही शिक्षा देतां हें कसें ?"

चोखोबांप्रमाणेंच त्यांच्या पत्नीचे हे ज्ञानपूर्ण विचार ऐकून आणि तो घडलेला चमत्कार पाहून अधिकाऱ्याचें मत बदललें, आणि त्यानें चोखोबाला निर्दोषी ठरवून सोडून दिलें. ब्राह्मणांनाहि कृतकर्माचा पश्चात्ताप झाला आणि ते म्हणाले:—

"वर्णाभिमानानें अंध होऊन आजपर्यंत आम्ही ब्राह्मणेतरांना तुच्छ मानीत आलों, पण चोखोबा, आज तुमचें आणि तुमच्या या ज्ञानसंपन्न पत्नीचें भाषण ऐकून आमचा तो वृथाभिमान पार नाहींसा झाला. प्रत्यक्ष पांडुरंग तुमचा सहकारी असतां आम्हां यःकश्चित् माणसांच्या हातून तुमचें काय होणार ? पांडुरंग सदा पवित्र आहे अशी आतां आमची खात्री झाली. म्हणून तुम्ही मनांत कांहींएक संकोच न धरितां गाभाऱ्यांत खुशाल त्याचें दर्शन घेत जा !"

## ९. गजेंद्रमोक्ष

गजा दे जो मुक्ती त्वरित विभु नक्रासि दमुनी,
मुनी ज्याला शास्त्रीं हरि म्हणति त्यालाचि नमुनी;
कथा ते संक्षेपें कथिन बरि पक्षींद्रगमना,
मनामध्यें ध्यातों द्विरदवरदा ! दुःखशमना ! ॥ १ ॥

जळीं दांतें नक्र द्विरदपदमांसास्थि उकरी,
करी प्राण त्यागी, सुमति सुचली तों झडकरी.
करी धांवा कीं वो सुलभ वर जो देवनिकरीं
करीं घे अर्पाया कमल, पदपद्में सुखकरी. ॥ २ ॥

' नसे ठावा ब्रह्मा न शिव अथवा श्रीपति हरी,
हरी जो तापातें, उचलुनि कृपासिंधुलहरी,
हरी वाटे काळाकरिस विपती मृत्युभुजगा,
जगाचा तूं ऐसा धनि कवण तो ? पाव मज गा,' ॥ ३ ॥

वदे दुःखी तेव्हां म्हणउनि कळे देवनिकरा,
करावा तो मुक्त स्वशरण गमे श्रीप्रियकरा;
करीं चक्रा शस्त्रा प्रभु उचलि यानीं खगमनीं,
मनीं साक्षी तो ये, गज जळज घे जों स्वनमनीं. ॥ ४ ॥

असा मी सर्वां त्या त्रिदशनिकरां वंद्य सकळां,
कळाया ही ये त्यासह करि तया मुक्त त्रिकळा;
कळा प्रेतप्राय स्मरणकरित्यातें न अवधी,
वधी नक्रातें त्या अवसारें कृपाब्धी निरवधी. ॥ ५ ॥

मृताच्या त्या तोंडामधुनि पद तो हा झडकरी,
करीतें वोढेना, प्रभुच करुणा मागुति करी;
करीं दो पायांतें सह उचलि यानीं सुखकरीं,
करींद्रा सारूप्य त्वरित गति दे मुक्ति निकरीं. ॥ ६ ॥

स्तवी ब्रह्मा शंभु त्रिदशपति तो मुक्तहि नवा,
नवां भक्तीची हे गति दिधलि ज्याला अभिनवा,
न वाटे त्यां सर्वां हरिविण धनी आणिक जगा,
जगाया हे भक्ती प्रभुच म्हणती ईश मज गा. ॥ ७ ॥

भुजा चारी पीतांबरधर असी मूर्ति बरवी,
रवी जाणों हातीं रथचरण ते दीप्ति मिरवी;
गदा एके हातीं जळजयुग दोहीं शुभ करीं,
करींद्रा वैकुंठ त्वरित हरि दे देवनिकरीं. ॥ ८ ॥

गजाची जे मुक्ती क्रमुनि इतरां शक्ति न जनीं,
जनीं गाती त्याला फळ परम या विष्णुभजनीं.
जनीं भक्तस्वामी करि भजक हो ! गाताचि असा '
असारीं संसारीं म्हणुनि विनवी वामन असा. ॥ ९ ॥

# १०. परभाषेंतील शब्दांची योजना

आपली मराठी भाषा ही सध्यां बनत चालली आहे. वर्तमानपत्रें, सभा, मासिक पुस्तकें, ग्रंथ या सर्वांची अभिवृद्धि हीं भाषावृद्धीचीं कारणें होत. यास्तव ही हल्लीं जारीनें चालू असल्यामुळें जसें झाड किंवा प्राण्याचें शरीर वाढतें त्याप्रमाणें महाराष्ट्र भाषेची वाढ हल्लीं सुरू आहे. इंग्रजी विद्येचा अलीकडे फैलाव होऊं लागल्यापासून नवे नवे विचार आपल्या भाषेंतील शब्दांनीं व्यक्त करण्याचें अगत्य पडूं लागलें आहे. तेव्हां या संधीस हा एक मोठा विचार कर्तव्य आहे कीं, परकी भाषांतले शब्द आपल्या भाषेंत घ्यावे कीं नाहीं; व जर घ्यावयाचे तर ते कोणत्या प्रमाणानें घेतले पाहिजेत.

या विषयाच्या संबंधानें कित्येकांची अशी समजूत झालेली दृष्टीस पडते कीं, परभाषेंतले शब्द म्हणून बिलकूल मराठींत घेऊं नये. इंग्रजी, फारशी, अरबी वगैरे सर्व शब्द काढून टाकून निवळ मराठी शब्द योजीत जावें. ही बुद्धि कशामुळें झालेली आहे हें कोणासही समजेलच. अलीकडे आमच्या राष्ट्रांत देशाभिमानाची थोडीशी झुळुक सुटली आहे; यामुळें जुने आचार विचार चांगले, इंग्रज तऱ्हा बिलकूल उपयोगी नाहीं, स्वदेशी कापडच वापरावयाचें वगैरे ग्रह जसे लोकांचे हळूहळू होत चालले आहेत त्याप्रमाणें परभाषेंतील शब्दांवर कांहीं जणांचा कटाक्ष दृष्टीस पडतो. आतां वस्तुतः पहातां स्वभाषेविषयींची पूज्यबुद्धि सर्वथा अप्रशस्त म्हणतां येत नाहीं हें खरें, कां कीं ही बुद्धि भाषादूषणावर अत्यंत मारक होय. ती हृदयांत न वसल्यामुळें आजपर्यंत पुष्कळ ग्रंथकारांनीं व वक्त्यांनीं परकी भाषेच्या पायीं आपल्या भाषेची विटंबना केली. ड्रायडन-नामक प्रख्यात ग्रंथकारानें एके ठिकाणीं म्हटलें आहे कीं, "जर परकी शब्दांची देशभाषेवर फारच गर्दी करून सोडली तर मूळ भाषेस सहाय्य व्हावें तें न होतां त्यांचाच जसा कांहीं मूळ शब्दांवर शिरजोरपणा दिसूं लागतो." तर परभाषेंतील वाजवी शब्दांपेक्षां फाजील शब्द

घेतले म्हणजे येथें जसा इंग्रजांनीं प्रकार केला तसा होऊं लागतो हें उघड आहे. पण या प्रतिबंधास तरी कांहीं मर्यादा अवश्य ठेविलीच पाहिजे. जेथें मूळ भाषेंत शब्दच नाहींत, तेथें परभाषीय शब्दांस निमंत्रण करणें जरूर आहे. उदाहरणार्थ, छापखान्याचा कारखाना घ्या. यांतील परिभाषा अर्थातच सारी इंग्रजी आहे. प्रूफ, स्टीक, प्रेसमन, पायका, प्रायमर, कंपाझिटर, करेक्टर वगैरे सर्व शब्द हे आगगाडीच्या किंवा तारायंत्राच्या परिभाषेप्रमाणें आमच्या भाषेंत रूढ झाल्यासारखेच आहेत. आतां कोणी भाषाभिमानी पुरुषानें उठून 'प्रूफच्या' जागीं 'खर्डा', करेक्टरच्या जागीं 'शोधक' असें जरी कांहीं शब्दांतर केलें तर टैपांचे छप्पन्न प्रकार किंवा रेल्वे इंजिनांतील प्रत्येक भाग अथवा जहाजाच्या शंभर दोऱ्या इतक्यांस नांवें धुंडीत बसणें म्हणजे भगीरथ प्रयत्नच आहेत. शिवाय हा प्रयत्न कितपत सिद्धीस जाईल याविषयीं आम्हांस शंकाच दिसते. संस्कृतांत जरी पाहिलें तरी कित्येक शब्द त्यांतही परभाषेंतलेच येऊन मिसळलेले आहेत. विशेषतः ज्योतिष ग्रंथांतील कित्येक पारिभाषिक शब्द ग्रीक भाषेंतून किंवा प्राचीन मिसरी भाषांतून घेतल्यासारखे दिसतात. अर्वाचीन काळीं मोठ्या योग्यतेस चढलेली जी इंग्रजी भाषा तींत तर हजारों शब्द परभाषांतूनच आलेले आहेत. हें तर काय पण ज्या भाषेनें वरील भाषेंत कांहींना कांहीं साहित्य केलें नाहीं अशी बहुधा थोडकीच सांपडेल. तर यावरून काय समजावयाचें कीं, परभाषांचा मिलाफ हा सर्व भाषांत व्हावयाचाच व तो झाला असतां त्यांत कांहीं मोठें अनिष्ट आहे असेंही नाहीं. इतकें मात्र पाहिजे, कीं जेथें जरूरी नाहीं तेथें वरील भेसळ होऊं देऊं नये; व परभाषांच्या संबंधानें देशी भाषेच्या मूळ पद्धतीस म्हणजे वाक्यरचनेस वगैरे धक्का लागूं नये.

त्यांतून अरबी, फारसी हे शब्द तर आमच्या भाषेला अगदीं खिळूनच गेले आहेत असें म्हणण्यास हरकत नाहीं. लहान थोर, विद्वान्

अविद्वान्, पुरुष बायका या सर्वांच्या तोंडीं जे शब्द आज पिढ्यान् पिढ्या घट्ट बसले आहेत ते आतां कांहीं केल्या निघायचे नाहींत. शिवाय ते निघून हल्लीं निर्वाहही होणार नाहीं. तेव्हां या संबंधानें आग्रह धरिला असतां तो केवळ मूर्खपणाचा दुराग्रह होणार आहे. हे शब्द व महाराष्ट्र भाषा या दोहोंचा जणूं काय एकजीवच होऊन गेला आहे; तो इतका कीं त्यांचा परकेपणा अगदीं बुजून जाऊन ते मूळचे यवनी म्हणून ओळखण्याची सुद्धां पुष्कळ वेळां पंचाईत पडते. फार तर काय, पण येवढे सोंवळे जे महाराष्ट्र कवि त्यांनीं सुद्धां पुष्कळ ठिकाणीं त्यांचा उपयोग केलेला आढळण्यांत येतो. तेव्हां आजपर्यंत जे जे अरबी व फारसी शब्द मराठी भाषेंत येऊन दाखल झाले आहेत त्यांच्याविषयीं सध्यां तर विचारच नाहीं. विचार करावयाचा झाला तर नवीन शब्दांविषयीं; पण यांसही प्रसंग विशेषीं आव्हान करणें अवश्य होईल. जेथें इंग्रजी शब्दांस मराठींत किंवा संस्कृतांत प्रतिशब्द आढळणार नाहीं तेथें वरील दोन भाषांचीच कधीं कधीं प्रार्थना करावी लागेल.

# ११. सुभद्राविवाह

तीर्थें हिंडत गेला धर्मानुज अर्जुन प्रभासाला,
आप्तमुखें निजमातुलकुलवृत्तांतासि ऐकता झाला १
कृष्णानुजा सुभद्रा लग्नाला योग्य जाहली आहे,
तीतें स्वमतें हलधर धृतराष्ट्रसुतासि द्यावया पाहे २
तातादिक म्हणति मनीं ' सुमति खळाला अचक्षुला रत्न
शूद्रास श्रुति देतो राम, न चालेचि यापुढें यत्न ' ३
ऐकुनि मनीं म्हणे ' मज तीर्थस्नायीस जाहली शुद्धि
या सुकृतें ते व्हावी प्राप्त विरक्तास जेंवि सद्बुद्धि ४
निजसुखसिद्धि सुभद्रा साधाया होइन त्रिदंडि यती
प्रिय तीहूनि नसे मज; ती कीं ही रीति गति, अहो नियती ! ' ५
पार्थ त्रिदंडिवेष स्वीकारी हलधरासि वंचाया
युक्तीनें स्वपरविहितहित करितां कपटदोष कंचा या ? ६
द्वारवतींत वसे तो यति वार्षिक चार मासपर्यंत,
हर्यंत:करणासचि ठावा तद्योग जो सपर्यंत ७
मौन, सदा एकांतस्थिति, साधुसमाधियोग, सुविरक्ती,
सक्ति न लोकसमाजीं, लागे पौरांसि पार्थयतिभक्ति ८
रामासहि कळलें कीं योगी मोठा असे म्हणे पाहूं,
आह्मीं ब्रह्मण्य तया आणूं भिक्षेसि शिर पदीं वाहूं ९
तो यति एके दिवशीं बळदेवें आणिला स्वगेहास
पूजुनि सुश्रद्धेनें जेववितां माधवास ये हास १०
यतिदर्शना सुभद्रा येउनि बैसे निजाग्रजाजवळ
न बळ प्रेक्षी, परि यतिहस्तींचा पाहतां गळे कवळ ११
कन्यारत्न हराया अवसर पाहे जसा खरा चोर
घोरप्रताप परि भी भीमानुज, कीं अनंतबळ थोर १२

दामोदर दासा दे अनुमोदन ती हरावया नवरी,
दादास देव दावी दारकरीति स्वयें सदैव बरी १३

ताताला मातेला एकांतीं गुह्य वृत्त हें कळवी,
बळवीरभीतिकोपोपशमोपायासि सांगुनी पळवी १४

अनुकूळ ब्रह्म तसें तों झालें मन्मनोरथा पर्व,
तीर्थस्नान कराया पुरवासी लोक चालले सर्व १५

वर हयरथगजशिबिकारूढ सकल वृष्णिदारजन चाले
झाले सिद्ध वऱ्हाडी तैसे यदुभट; धरा बळें हाले १६

दिव्यरथांत सुभद्रा राकारजनी तसा बळीं शोभे
यन्मुखसुधाकरें नरवरपार्थाशयपयोनिधि क्षोभे १७

तेव्हां धांवुनि बैसे पार्थ सुभद्रारथीं जसा पाटीं,
सुचिरक्षुधित ब्राह्मण हां हां म्हणतांहि वाढिल्या ताटीं १८

समयज्ञ चतुर सेवक धनु तूण तशांत देति आणोनि,
धांवति रक्षक सैनिक कपटयतिकृतात्यनर्थ जाणोनी १९

त्यांतें म्हणे ‘ सुभद्रामुक्ताहर वीर अर्जुन मराल,
समग लक्षहि या परि काक तुम्ही गति विसर्जुन मराल २०

धर्मानुज मी अर्जुन सिंह, तुम्ही शशकिशोर, आटोपा,
या टोपा कवचाच्या भीमा वल्गा उगेचि आटोपा ’ २१

ऐसें नीट दटावुनि जाय सुभद्रा हरूनि तो पार्थ,
मारिति हाका केवळ, नागविला वनिं जसा वणिक् सार्थ २२

सार्थक पार्थ करी, ती कैरविणी ता सुधांशु गौरविता,
सविता बिसिनीसि वरी, कीं भेटे तो गुणज्ञ ती कविता २३

श्रुति सत्क्रिय धर्मपथा शोभविती दंपती तसे स्वरथा,
अन्योन्यप्रिय संगम तो प्रेमळभक्त ती मुकुंदकथा २४

झटिति भटकटक बहु करि 'कन्या नेली' म्हणोनि बोभाट,
वाटे बळासि सांगे जो जो त्या दस्युचाचि तो भाट २५

प्रस्फुरदधरदल प्रभु बलभद्र म्हणे 'खरेंचि सांगा रे,
कोठें तो कपटपटू गांठितसे जो पटांत आंगारे २६

कोठें रथ, मुसळ पुरे, कवच कशाला, धनुष्य राहों द्या,
वत्सेला निजधर्षणकरखळदंडोत्सवासि पाहों द्या' २७

पर्वी अर्णव तैसा भगवान् बळभद्र पुष्कळ क्षोभे
संध्यारागसुरंजितशरदभ्राहूनि फार तो शोभे २८

कोपज्वरभरकंपितकाय प्रभु लोचनें करी शोणें,
होणें पुढें सुदुर्घट वारावें त्या महेश्वरा कोणें २९

जाय हळूच विनयनतकाय चतुर वृष्णिराय देव हरी,
माय सुतार्थ पतीचे काय गुरूचे नमूनि पाय धरी ३०

नमनीं प्रकटवि सहभव सद्गुण शांतिक्षमानुकंपादि,
कंपा दीनसख नुरवि अधरीं, प्रणतींहि भव्य संपादी ३१

हांसे बळभद्र म्हणे कृष्णाक्रूरोद्धवा 'अहो कळलें,
वळलें मन, मत्पद भय सोडा, आदान बंधुचें टळलें ३२

जा जा उठा मुलीला पाहूं वाहूं वरा घरा आणा,
प्राणाधिक तो येना तरि घालाव्या मदंघ्रिच्या आणा ३३

अथवा कशास शासनभय धरुनि मनीं पळेल तो दूर,
शूर ख्यात पळेना नेऊ द्या पारिबर्ह अक्रूर ३४

धाडा भूषा वसनें दासीदासाश्वहस्तिरथरत्नें,
झाला भगीरथाचा पार्थ सखा आजि या महायत्नें' ३५

हें रसिककर्णतर्णकशत तर्पायासि कामधेनुकथा
करिती प्रभुवर अनुचरपरसुखकर अनुसरोनि लोकपथा ३६

# १२. नानक

पंजाब प्रांतांतील लाहोर जिल्ह्यांत नांकाना म्हणून एक खेडेगांव होतें. याच खेड्यास हल्लीं तलवंडी असें म्हणतात. या तलवंडी गांवीं इ. स. १४६९ च्या वैशाख वद्य तृतीयेस पहाटेच्या वेळीं शीख-धर्मप्रस्थापक गुरु नानकाचा जन्म झाला असें शीख ग्रंथावरून दिसून येतें. नानकाच्या पित्याचें नांव काळू व मातुश्रीचें नांव तृप्ता असें होतें. हा जातीनें क्षत्रिय होता.

नानक पांच वर्षांचा असतांनाच तात्त्विक बोल बोलूं लागला होता. पुढें सात वर्षांचा झाल्यावर त्यास रीतीप्रमाणें शाळेंत घातलें. त्याची बुद्धि, धारणाशक्ति, कल्पना वगैरे पाहून त्याचा शिक्षक तर आश्चर्यचकित झाला. शिक्षकानें कांहीं शब्द लिहिण्यास सांगितलें तर तो तत्काळ ते सर्व लिहून प्रत्येक शब्दाचीं आद्याक्षरें घेऊन त्यांची उपदेशपर अशी एक कविता करीत असे. त्या कवितेचें तात्पर्य असें कीं, परमेश्वर एक आहे, त्याचीच एकट्याची भक्ति करणें हा आपल्या मानवांचा धर्म आहे. नानकानें या वयांत केलेलीं काव्येंहि शीखांचा पूज्य ग्रंथ जो ग्रंथसाहेब त्यांत सांपडतात. याप्रमाणें कित्येक दिवस नानक शाळेंत जात असे. एके दिवशीं नानक अभ्यासाकडे लक्ष्य देत नाहीं असें पाहून त्याचा शिक्षक रागावला. तेव्हां नानकानें असें कांहीं ब्रह्मज्ञान सांगितलें कीं. तें ऐकून शिक्षक थक्क झाला, व “ तुझ्या-पेक्षां अधिक निदान मला तरी कांहीं येत नाहीं ” अशी त्यानें स्पष्ट कबुली दिली. नानकानेंहि लागलीच शाळेस रामराम ठोकला.

यानंतर नानकानें पुष्कळ वर्षें विचार करण्यांत घालविलीं. सर्वांस विशेषतः त्याच्या बापास आतां असें वाटूं लागलें कीं, आपला मुलगा वेडसर आहे. या समजुतीनें त्याला फार दुःख झालें. नानकाचा नित्य-क्रम म्हणजे दोनचार वेळां बापाच्या बरोबर जेवावें व सर्व दिवसभर विचार करीत बसावें, असा चालूं झाला.

नानकास नानकी या नांवाची एक बहीण होती. जयराम नांवाच्या इसमाशीं तिचें लग्न झालें होतें. नानकाच्या वयाच्या चौदाव्या वर्षी नानकाचेंही लग्न झालें. त्याच्या पत्नीचें नांव सुलक्षणी असें असून तिचें माहेर गुरुदासपूर जिल्ह्यांतील बटाला गांवीं होतें. हें लग्न नानकाचा मेहुणा जो जयराम यानेंच जुळवून आणिलें असें कित्येकांचें मत आहे. नानकाच्या गृहस्थाश्रमाची फारसी माहिती उपलब्ध नाही. फक्त त्यास या कुटुंबापासून श्रीचंद व लक्ष्मीचंद असे दोन पुत्र झाले, एवढेंच प्रसिद्ध आहे. विवाह झाल्यावर सुद्धां नानकास ढोरें वळण्याचेंच काम करावें लागत असे. एके दिवशीं भर दोन प्रहरीं तो जंगलांत एका झाडाखालीं निजला होता व जनावरें इतस्ततः चरत होती. एक जमीनदार त्याच रस्त्यानें जात असतां तेथें कांहीं वेळ थांबून लक्षपूर्वक नानकाकडे पाहूं लागला तेव्हां त्याला असें दिसून आलें कीं, सृष्टिनियमाप्रमाणें इतर झाडांच्या पडछाया सूर्याच्या विरुद्ध दिशेस होत्या; पण ज्या झाडाखालीं गुरु नानक हा निद्रिस्त होता त्या झाडाची सावली कांहीं तशी नव्हती. नानकास उन लागूं नये अशाच रीतीनें त्याचे शरिरावर ती पडली होती. ( हें झाड अद्यापिहि दाखविण्यांत येतें व तें पूज्य समजून लोक तेथें दर्शनास जात असतात. ) त्या जमीनदारानें ही हकीकत नानकाच्या बापास सांगितली व बजाविलें कीं, " नानक हा कोणीतरी सिद्ध कोटींतील व्यक्ति आहे. जगाविषयीं जें त्याचें औदासीन्य आहे व तो जो एवढा निःस्पृहपणानें वागतो, तो खरोखरीच कोणी महात्मा आहे म्हणून नानकासंबंधीं तूं यत्किंचितहि काळजी करूं नकोस. "

नानकाचा असा क्रम कित्येक दिवस चालला, परंतु उपजीविकेस उपयोगी पडेल असा एकही धंदा त्याचे हातून होईना. त्याच्या मातुश्रीनें व तीर्थरूपांनीं त्यास पुष्कळ प्रकारांनीं सांगन पाहिलें पण व्यर्थ. उलट तो आपलेंच तत्त्वज्ञान त्यांस सांगत असे. एकदा त्याच्या बापानें त्यास शेतकी करण्यास सांगितलें, तेव्हां तो म्हणाला, ' उगीच

जमीन खोदण्यांत काय अर्थ आहे ? वास्तविक शरिराचें करावें शेत; त्यांत सत्कृत्याचें पेरावें बीं; त्याला नामामृताचें घालवें पाणी; आत्म्याला करावें शेतकरी; मग परमेश्वर निर्वाणाचें फळ त्या झाडास देईल. " याप्रमाणें आपल्या सर्व आप्तांना निरनिराळ्या धंद्यांतील तात्त्विक विचार सांगून त्यानें ऐहिक सुखासाठीं कोणताही धंदा करण्याचें नाकारलें. तो वेडा झाला असें समजून वैद्यासहि त्याची प्रकृति दाखविली, परंतु कांहीं उपयोग झाला नाहीं.

नानकानें व्यापार करावा म्हणून त्याच्या बापानें कांहीं रुपये एकदां त्याला दिले. ते घेऊन तो जात असतां रस्त्यांत त्याला कांहीं साधु भेटले व त्यांनीं त्याजवळ कांहीं खाण्यास मागितलें. लागलीच नानकानें जवळचे पैसे खर्चून त्यांच्या भोजनाची व्यवस्था केली. साधु फार खूष झाले, परंतु रुपये नाहींसे झाल्यानें बाप मात्र अतिशय रागावला व त्यानें त्याला घरांतून घालवून दिलें. नानक तेथून जों निघाला तों आपला मेहुणा जयराम यास अवचित भेटला. नानकाची विद्वत्ता त्याला ठाऊक होती, म्हणून, त्यानें मुख्य सुभेदार जो दौलतराय याजवळ त्याची पंडित या नात्यानें शिफारस केली. त्यानेंहि नानकास 'कोठाऱ्या'-ची नोकरी दिली. नानकास जो पगार मिळत असे, त्यांतून स्वतःचें उदरपोषण होऊन जी बचत राहत असे ती तो गरीबांच्या पोषणाकडे खर्च करीत असे. याच वेळीं मर्दाना नांवाचा एक इसम नानकाचा खासगी नोकर म्हणून त्याजवळ राहिला; व तोच त्याचा पट्टशिष्य झाला. हा नानकाजवळ बसून सतार वाजवीत असे व नानक भक्तिपर अशीं स्वकृत पदें म्हणत असे. नानक नेहमीं वेन नदीवर स्नानास जात असे. एके दिवशीं तो गुप्त झाला व तेव्हांच परमेश्वर त्याच्याशीं बोलला असें ग्रंथसाहेबांत लिहलें आहे. परमेश्वरानें यावेळीं नानकास अमृताचा पेला दिला व त्याला आपल्या मतांचा प्रसार करण्यास आपण स्वतः साहाय्य करण्याचें अभिवचन दिलें. यानंतर नानक परत आपल्या घरीं आला व एकसारखें आपल्या इष्ट दैवतेचें भजनपूजन करूं लागला.

नानकाचें दैवी बळ पाहून दौलतखानेंहि गुरु नानकास सर्वस्व अर्पण करून त्याचा शिष्य झाला. नानकानें यावेळीं आपली कोठाऱ्याची नौकरी सोडिली व तो आपल्या मताच्या प्रसारार्थ पर्यटणास निघाला. त्याच्याबरोबर त्याचा पट्टशिष्य मर्दाना काय तो आपल्या सतारीसह होता. उत्तरेस नानकाची स्वारी आपल्या मतांचा प्रसार करीत व विरुद्ध मतवाल्यांशीं वादविवाद करीत हिमालयापर्यंत गेली. कोठें धाकानें तर कोठें नम्रतेनें, कोठें वाद करून तर कोठें युक्तिप्रयुक्तीनें, कोठें मानवी अधिकारानें तर कोठें लोकोत्तर चमत्कारानें नानकानें आपलें म्हणणें, आपलें धार्मिक मत सिद्ध करून ते लोकांस ग्रहण करावयास लाविलें. मोठमोठे मुल्ला, मोठमोठे काझी, व मोठमोठे नास्तिकहि त्याचे शिष्य बनले.

नानकानें काशी, गया, प्रयाग, मक्का, मदिना इत्यादि ठिकाणच्या यात्रा केल्या होत्या. प्रथम सारखा बारा वर्षेपर्यंत त्यानें प्रवास केला; व नंतर मर्दानाच्या आग्रहावरून तो आपल्या जन्मभूमीस आला होता. तेथेंहि फार दिवस न राहतां मातापितरांस भेटून तो पुनः धर्मप्रसारार्थ निघाला. सर्व हिंदुस्थानभर त्यानें पायींच प्रवास केला होता. सिलोनमध्यें तो गेला होता. मुसलमान बादशहा बाबर याचीहि भेट गुरु नानकानें घेतली होती.

नानकानें आपल्या मृत्यूची बातमी कित्येक दिवस आगाऊच देऊन ठेविली होती. अशी बातमी दिल्यामुळें त्याच्या दर्शनास फार लोक जमा झाले होते. इ० स० १५३८ च्या आश्विन वद्य १० मीस नानकाचें देहावसन झालें. खाडूर नांवाच्या गांवीं लहिना नांवाचा एक मनुष्य दुर्गादेवीचा कट्टा उपासक होता. परंतु नानकाच्या उपदेशानें तो शीख झाला व हाच पुढें नानकाच्या मागून त्याच्या गादीवर बसला.

## १३. गौरीशङ्कर आणि मानव

थाम्ब, खालीं उतर, परत जा परत जा !
क्षुद्र जीवा तुझा गर्व वाया ! ॥ ध्रु० ॥

मन्त्रदर्शी मुनी आदरें मज नमुनि
सिद्ध झाले उषःसूक्त गाया
या हिमस्थण्डिलीं भानुकिरणावली
कांपते होत जड बधिर काया
वायु चढतां वरी गुदमरे अन्तरीं
घसरुनी खालतीं धरित पायां
वरुण अभिषेक धरि, आरती वीज करि
माळ घाली गळां इन्द्रराया
सागराधीश तो चळचळां कांपतो
खण्डणी धाडितो तोषवाया
क्षुद्र तूं ! मूढ तूं ! ज्ञानदर्पान्ध तूं !
उतर जा ! हट्ट कां धरिशि वायां ?

*      *      *      *

कां अडविशी गिरिराया, रे ॥ ध्रु० ॥

देह आमुचा जावो राहो, आलों तुज भेटाया
ज्ञानमहोदधि अफाट भरला, उतरलोंत पोहाया
दुर्बल देहांतिल दुर्दम मन सिद्ध विश्व जिंकाया
अनन्त अज्ञाता उकलाया अनन्त आकांक्षा या
खुलें कुरण आम्हांस जगाचें परतविशी कां वायां ?
जिकडे तिकडे ज्ञानरूप परमेश खुणवितो ‘ या ! या ! ’
चढेल तोची पडेल, आम्ही सदा तयार मराया
सोड हिमास्त्रें खुशाल आतां, आलों तुज गांठाया

# १४. साक्रेटिसावरील खटला

ग्रीस देशांत साक्रेटिस म्हणून एक विख्यात तत्त्वज्ञानी होऊन गेला. त्याचा जन्म अथेन्स शहरांत ख्रिस्ती शकापूर्वी ४६९ या वर्षी झाला. याचा बाप मूर्ति करणाऱ्या पाथरवटाचा धंदा करीत असे व आई सुईण होती. अथेनिअन नागरिकांना मिळणारें शारीरिक व मानसिक शिक्षण साक्रेटिसाला मिळालें होतें. लहानपणापासूनच साक्रेटिसाचें लक्ष तत्त्वज्ञान आणि आध्यात्मिक विद्या यांकडे लागलें व विशेषत: मानवी आयुष्याची इतिकर्तव्यता काय हा प्रश्न त्याच्या डोक्यांत घोळूं लागला. या गहन प्रश्नाचें उत्तर त्याच्या मनांत ठरल्यापासूनच तो लोकांना उपदेश करूं लागला व हेंच त्याच्या आयुष्याचें ध्येय बनलें. ग्रीक तरुणांना उपदेश करण्यांत त्यानें आपलें सर्व आयुष्य खर्च केलें; आणि तरुणांना उपदेश करण्याच्या या कार्याबद्दल त्याला शिक्षा झाली.

साक्रेटिसाची शिक्षणपद्धति वादविवादात्मक होती. तो व्याख्यान-रूपानें उपदेश करीत नसे तर भेटेल त्याला त्याच्या विषयाविषयीं उलटसुलट प्रश्न विचारून त्याला कुंठित करी व त्याचें अज्ञान त्याला दाखवून देई. मग त्याला आणखी प्रश्न विचारून त्याच्या जवळून सत्यरूप उत्तरें काढून त्याला उपदेश करी. हा सर्व वादविवाद लोकांच्या देखत चालत असे व कोणत्याहि माणसाला सर्वांदेखत आपली फजिती झालेली खपत नसे. त्यामुळें सर्व धंद्याच्या लोकांचें साक्रेटिसानें वैर संपादन केलें होतें. शिवाय साक्रेटिस हा मोठा सुधारणावादी होता व प्रत्येक चालीचें, प्रत्येक संस्थेचें, प्रत्येक मताचें व प्रचलित कल्पनेचें युक्तिवादानें समर्थन करतां आलें तर ती खरी असें तो म्हणत असे. यामुळें पुराणमताभिमानी लोकांचेंहि वैर त्यानें संपादन केलें होतें. याप्रमाणें त्याच्या आयुष्यामध्यें त्याच्याविरुद्ध वैराचा अग्नि सारखा धुमसत होता. अथेन्सला भोगाव्या लागलेल्या सर्व आपत्तींचें आदिकरण साक्रेटिसाचें शिक्षण अशी लोकांची समजूत झाली. तेव्हां हें मूळच

नाहींसें करून टाकलें पाहिजे असें कित्येकांस वाटून त्यांनीं साक्रेटिसावर फौजदारी खटला करून त्याचा अंत करण्याचा निश्चय केला.

ख्रिस्ती शकापूर्वी ३९९ या वर्षी साक्रेटिसावर खटला झाला. अथेन्सच्या राजकीय सत्तेप्रमाणेंच अथेन्सची न्यायपद्धतीहि पूर्ण लोकसत्तात्मक होती. लिहिलेले कायदे नव्हते व खटला चालविण्यास निष्णात न्यायाधीशहि नसत. सामान्य लोकांची ज्यूरी असे. साक्रेटिसाचे खटल्याचे वेळीं ५०१ ज्यूरर न्यायासनावर बसले होते. खटल्याचा निकाल योग्य व खऱ्या रीतीनें देऊं अशी शपथ घेतल्यावर ज्यूरर लोक चटया आंथरलेल्या लांब बांकावर येऊन बसले. शेजारीं असलेल्या प्लॅटफॉर्मवर वादीप्रतिवादी समोरासमोर ठाकले. कठड्याच्या पलीकडे पुष्कळ प्रेक्षक बसले होते. आरंभीं प्रार्थना होऊन कामाला सुरवात झाली. प्रथम साक्रेटिसावरील आरोप वाचून दाखविण्यांत आला तो असा होता:—

> " साक्रेटिस हा गुन्हेगार आहे. कारण तो संस्थानानें मानलेले देव मानीत नाहीं व त्यानें नवीन देवांचा लोकांत प्रसार केला आहे, आणखी तो तरुणांना बिघडवितो. "

या आरोपाचें समर्थन करणारीं दोन तीन भाषणें साक्रेटिसाच्या प्रतिपक्षांनीं केलीं. नंतर साक्रेटिसाची उत्तर देण्याची पाळी आली. त्याचें भाषण अत्यंत साधें पण अकृत्रिम वक्तृत्वपूर्ण होतें. तो म्हणाला,

" अथीनिअन नागरिकहो ! माझ्या प्रतिपक्षीयांनीं तुमच्या मनावर आपल्या भाषणानें काय परिणाम केला आहे, हें मला सांगतां येत नाहीं. माझ्यासंबंधानें म्हणाल तर मी कोण आहे हें मी बहुतेक विसरून गेलों आहे. इतकें त्यांचें भाषण मोहक व भ्रामक आहे. त्यांच्या भाषणांत सत्याचा अंश क्वचित्‌च सांपडेल ! माझ्यावर मुख्य आक्षेप असा आहे कीं मी तरुणांस शिकवितों, त्यांचीं मनें बिघडवितों आणि त्यांच्याकडून गुरुदक्षिणा घेतों. परंतु हा आक्षेप अगदीं खोटा आहे. असें जर मला करतां आलें असतें तर फार चांगलें होतें. कांहीं लोक आपल्याला मनुष्याच्या कर्तव्यकर्मांचें ज्ञान करून देतां येतें अशी घमेंड

मारतात व अशा तऱ्हेनें पुष्कळ पैसे मिळवितात व तरुण लोक यांचे पाठीमागें लागतात. परंतु मीं अशा तऱ्हेची घमेंड मारली नाहीं किंवा कोणाकडून पैसेहि मिळविले नाहींत !

आतां तुमच्यापैकीं कोणी विचारील, 'साक्रेटिस, ज्या व्यवसायामुळें तुमच्या जिवावर येऊन बेतली, असा व्यवसाय चालू ठेवण्याचें तुमच्या मनांत येतें कसें ?' याला माझें उत्तर म्हणजे माझा सर्व आयुष्यक्रमच होय. कोणत्याही माणसानें आपलें कर्तव्यकर्म आपल्या आयुष्याची पर्वा न करितां केलें पाहिजे. मीं तीन वेळां तुमच्या सेनापतीच्या हाताखालीं काम केलें व या तीनही वेळां मी आपल्या जिवाकडे किंवा सुरक्षितपणाकडे पाहिलें नाहीं. याप्रमाणें सेनापतीची आज्ञा पाळतांना मरणाची भीति मनांत आणली नाहीं, तर हा माझा व्यवसाय मला देवानेंच लावून दिला आहे तेव्हां मी त्याची अवज्ञा कशी करूं ? तुमच्यापेक्षां मी देवाच्या आज्ञेला ज्यास्त मान देतों व जोंपर्यंत माझ्या जिवांत जीव आहे व जोंपर्यंत वाचेंतून शब्द निघत आहेत तोंपर्यंत मी सत्यपरीक्षणाचा व्यवसाय व तुम्हांला उपदेश करण्याचा व्यवसाय सोडणार नाहीं."

साक्रेटिसाचें अशा तऱ्हेचें भाषण झाल्यावर सर्व न्यायाधिशांचीं मतें घेण्यांत आलीं व साक्रेटिसाला २८१ विरुद्ध २२० मतांनीं अपराधी ठरविलें. साक्रेटिसाला देहान्त शासनाची शिक्षा ठोठावण्यांत आली. या शिक्षा ऐकून त्याला मुळींच वाईट वाटलें नाहीं. मात्र आपल्याला अन्यायानें शिक्षा दिल्याबद्दल तुम्हांला पुढें पश्चात्ताप होईल असें साक्रेटिसानें भविष्य सांगितलें.

शेवटीं साक्रेटिस म्हणाला, "आतां वेळ झाली व आपण एथून निघालें पाहिजे. मी मरायला जाणार, आपण जगण्यास जाणार. पण आयुष्य ज्यास्त चांगलें किंवा मृत्यु ज्यास्त चांगला, हें फक्त देवालाच ठाऊक !!"

## १५. नळराजवर्णन

पुण्यश्लोकनृपावळींत पहिला होवोनि जो राहिला ।
जो राजा असतां समस्त महिला विश्रांति शेषाहिला ॥
व्यासोक्तें अवगाहिला बुधजनीं नानागुणीं गाइला ।
जो नामें नळ तत्कथौघ लिहिला तो पाहिजे पाहिला ॥ १ ॥

चौगुणीनें जरि पूर्ण शीतभानू । नळाऐसा तरि कलानिधी वानूं ॥
प्रतापाचा जो मावळे न भानू । तयासारीखा कोण दुजा मानूं ॥ २ ॥

चंद्रासि लागति कळा उपराग येतो ।
गंगेसि भंग बहु पाणउतार होतो ॥
जें होय चूर्ण तरि मौक्तिक तें कशाला ।
नाहीं समान नळराजमहायशाला ॥ ३ ॥

वाजीचें मन जाणता, सकलही राजी शिपाई जया ।
याजी होउनियां द्विजांसि म्हणतो ‘ या जी, धने घ्यावया ’ ॥
त्याजी जो धनदापरी सुकृत जें त्या जीव ऐसें गणी ।
गाजी तो नळ भूप हृप धरुनी गा जी गुणींच्या गणीं ॥ ४ ॥

लोकबंधु जो होय रवीऐसा । कुवलयाला जो सुखद चंद्र जैसा ॥
सांग नोहे तो कुसुमचाप तैसा । निषधरायाशीं तुल्यरूप कैसा ? ॥ ५ ॥

कदा नेणों ओढी शरधिंतुनि काढी शर कदा ।
कदा धन्वीं जोडी वरिवरिहि सोडी तरि कदा ॥
विपक्षाच्या वक्षावरि विवरलक्षास्तव रणीं ।
कळे राजेन्द्राची त्वरित शरसंधानकरणी ॥ ६ ॥

झाले धनी पुढिल याचक या नळाचे ।
येतां फिरोनी समुदाय पथीं तयांचे ॥
मागावयास जन मागिल देखियेले ।
त्यांहींच ते सकळ पूरितकाम केलें ॥ ७ ॥

हे वामनैकपद भूमि, नसोनि जंघी ।
एके दिनींच दिनराज नभास लंघी ॥
वारांशि वानरविलंघित होय तो कीं ।
लोकीं नसे नलयशस्तुलना विलोकीं ॥ ८ ॥

जो पाहे सदसद्विचार हृदयीं, जोपा जनांची करी ।
जो पावे समयीं, विशेष गणिला जो पावनांभीतरीं ॥
सोपा जो सकळां द्विजां सुमतिचा सोपा सदा लाभतो ।
कोपातें न धरीच तो नळ मही–गोपायिता शोभतो ॥ ९ ॥

जो धैर्यें धरसा, सहस्रकरसा तेजें तमा दूरसा ।
जो रत्नाकरसा गभीर, शिग्सा भूयां, यशोहारसा ॥
ज्ञाता जो सरसावला नवरसांमाझारिं शृंगारसा ।
शोभे तामरसाक्ष तो नळ रसानाथ स्तवूं फारसा ॥ १० ॥

## १६. आळशी माणसाची कैफियत

समजा, कीं एका मनुष्याला एक विहीर खोदावयाची आहे. हा मनुष्य उद्योग हेंच आपलें कर्तव्य असें समजणाऱ्यांपैकीं जर असेल तर विहीर खोदण्याचें आपलें काम तो मोठ्या आनंदानें आणि धिम्मेपणानें शेवटास नेईल. परंतु तोच आळशी मनुष्यांच्या वर्गांतला असेल तर त्याला आपलें काम करण्याचा कंटाळा येऊन तें कोणत्या रीतीनें सोपें करतां येईल त्याबद्दल विचार करूं लागेल. आणि ह्याच माणसानें पहिल्यानें रहाटाची कल्पना निःसंशय काढली असली पाहिजे.

विचाराअंतीं तुम्हांस असें दिसून येईल कीं, जगाच्या उत्पत्तीपासून आजपर्यंत जी सुधारणा झाली आहे तिचें श्रेय उद्योगी मनुष्यास देण्यापेक्षां, उद्योग टाळण्याचा यत्न करणाऱ्या आळशी माणसासच देणें योग्य आहे. मी खात्रीपूर्वक सांगतों कीं, गव्हाचीं कणसें तोडण्याच्या यंत्राची कल्पना, तीं कणसें झोडपीत असतां आळशी माणसास सुचली असली पाहिजे. याप्रमाणें कोयत्यानें धान्य कापीत असतां धन्वाकार बनलेल्या आळशी मनुष्यानेंच धान्य कापण्याचें यंत्र शोधून काढलें असलें पाहिजे.

आळशी मनुष्याचे जगावर अनंत उपकार आहेत. ज्याला उद्योगाची आवड आहे तो इकडे तिकडे न पाहतां सारखा उद्योग करीत असतो. परंतु ज्याला उद्योगाची आवड नाहीं त्याला काम करावें लागल्यास तो आपलें काम हलकें कसें करतां येईल याचा विचार करूं लागेल.

सारांश, जगाची सुधारणा म्हणजे आळशी मनुष्याच्या काम चुकविण्याच्या प्रयत्नाचेंच बहुतेक फळ आहे. परंतु तुम्ही जसजसा विचार कराल तसतसा हा सर्व पुरावा खरा, न्याय्य व भक्कम आहे अशी तुमची खातरी होईल.

आळशी मनुष्याची खरोखर ह्या जगामध्यें जी मान्यता असावी ती त्याला मिळालेली नाहीं. आमची लोक नेहमीं थट्टाच करतात, आणि प्रत्येक मूर्ख लेखकास आणि वक्त्यास आम्हांला शिव्या दिल्या-वांचून रहावतच नाहीं. खरोखर हें योग्य आहे काय ?

ज्याला उद्योगाची आवड आहे त्याच्याविषयीं मला कांहीं बोला-वयाचें नाहीं. असा मनुष्य खरोखरच धन्य होय. त्यानें खुशाल आपल्या इच्छेप्रमाणें काम करीत असावें. त्याच्याविरुद्ध मला कांहीं बोलावयाचें नाहीं व लिहावयाचेंहि नाहीं. पण मला सिद्ध करून दाखवावयाचें आहे—आणि हें मीं वर सिद्ध करून दाखविलेंच आहे—तें हेंच कीं, अशा उद्योगी मनुष्यापेक्षां आळशी मनुष्यांनींच जगावर अधिक उपकार केलेले आहेत.

वाफेच्या शक्तीचा शोध वॉटनें कधीं बरें लाविला ? हा शोध लाविला त्यावेळीं तो कांहीं कामांत गुंतलेला होता काय ? नाहीं, तर हे गजश्री सैंपाकघरांतील विस्तवापाशीं शेकत बसले होते. म्हणजे केवळ आल-स्याच्या चैनींत असतांना त्यानें चहादाणीवरील झांकण वर उचलतांना पाहिलें आणि त्यावरून वाफेला वाटेल तेवढें ओझें उचलतां येईल असा शोध त्यानें लाविला; पण ह्यावरून माझ्या म्हणण्याची सत्यताच जास्ती दृढ होते. वॉट जर अत्यंत उद्योगी मनुष्यांपैकीं असता तर अगोदर विस्तवापाशीं आळसाच्या जांभया देत बसलाच नसता. ही वाफेचें यंत्र शोधून काढणाऱ्यांची गोष्ट झाली.

आतां गुरुत्वाकर्षणाचा सिद्धान्त शोधून काढणाऱ्यांविषयीं विचार करूं. वरील शोध न्यूटनानें केव्हां बरें लाविला ? म्हणजे, हा शोध लाविला तेव्हां न्यूटन, लांकडें तोडण्याच्या, संदूक खोदण्याच्या किंवा दुसऱ्या कोणत्या तरी कामांत गढून गेलेला होता काय ? खचित नाहीं. तर त्या वेळीं तो एका जांभाच्या झाडाखालीं स्वस्थ पडलेला होता.

उन्हाळ्यांत संध्याकाळच्या वेळीं अशा रीतीनें एखाद्या झाडाखालीं पडून त्या चैनीचा कधीं अनुभव तुम्हीं घेतला आहे काय ? अशा वेळीं

आकाशांत क्षणोक्षणीं आपला आकार बदलणाऱ्या मेघांना आमच्या कल्पनाशक्तीनें आतां हत्ती बनविला आहे, तर कांहीं वेळानें, त्यालाच सिंह बनवावा, आणखी थोड्या वेळानें, त्याचाच चार घोड्यांचा रथ बनावा, आणि त्या रथांत बसून आपण आकाशांतून आक्रमण करीत असतां पृथ्वीवरील लोकांस तुच्छ मानावें, अशा प्रकारच्या चैनीचा तुम्हांस कधीं अनुभव आहे काय ? गुरुत्वाकर्षणाचा नियम शोधून काढणारे आमचे राजेश्री वरील प्रकारच्या सुखाचा आस्वाद घेत असतां जांभाचें फळ खालीं पडतांना त्यांनीं पाहिलें. तें फळ त्यांच्या तोंडावरच पडलें म्हणून सांगतात आणि तसें असेल तर त्यानें आमच्या तत्त्ववेत्त्याच्या सुखाचा थोडासा भंगच केला ! असो; नंतर आमचे तत्त्ववेत्ते उठून बसले; मेघांना विसरले आणि फिरून पूर्ववत् जमिनीवर पडून त्या झाडाकडे विचारपूर्वक पाहूं लागले आणि स्वभावतः आळशी, अर्थात् चौकस असल्यामुळें, तें फळ खालींच कां पडावें याबद्दल विचार करूं लागले. सारांश, ही विचारमालिका बरीच लांबून तिनें शेवटीं गुरुत्वाकर्षणाचा नियम बसविला.

आतां, न्यूटन जर उद्योगी मनुष्यांपैकीं असता तर आपलें काम टाकून आकाशांतील ढगांची मजा पहाण्याची सवड त्यास मिळतीना आणि तसें झालें असतें तर गुरुत्वाकर्षणाचा नियम निघाल्यापासून जी जगाची प्रगति झाली आहे त्यास एकंदर मानवजात अंतरली असती !

असो, इतर शोधांविषयीं व विशेषेंकरून वाफेच्या यंत्रांत आजमितीपर्यंत वेळोवेळ ज्या सुधारणा होत आल्या आहेत, त्याचा इतिहास म्हणजे काम चुकविण्यासाठीं आळशी माणसानें केलेल्या खटपटींचा इतिहासच होय. पण ही गोष्ट लक्ष्यांत ठेवून आळशी मनुष्याचे योग्य उपकार लोक कधीं स्मरूं लागतील तो सुदिन.

## १७. मूर्तिकार

दृष्टि फेंकित आपुली सभोंवार
फिरत असतां स्वच्छंद मूर्तिकार
शिला दिसली मार्गांत भव्य त्याला
बघुनि तीतें थांबला मुग्ध झाला ॥ १ ॥

काय द्यावा आकार त्या शिलेला
विचारीं या तो कुशल मग्न झाला
मनीं आकृति काढूनि कल्पनेनें
करी सुस्थिर ती शांत चिंतनानें ॥ २ ॥

करीं एक्या टाकीस धरुनि वेगें
शिलेवर तो आघात करूं लागे
स्वकर्तव्यीं संलग्न चित्त होत
इतर सारें विसरला वस्तुजात ॥ ३ ॥

करायाचें ज्या असे महत्कार्य
वचन त्याचें हें सदा शिरोधार्य
जरी उत्तम वाटतें कार्य व्हावें
स्वकार्यातें सर्वस्व तयें द्यावें ॥ ४ ॥

शिलेवर जे हळुहळू होत घाव
दिसूं लागे सत्वरीं तत्प्रभाव
रूप पूर्वीचें जाउनी लयाला
शिला लागे साकार दिसायाला ॥ ५ ॥

दूर सारे जैं कृष्णमेघ होती
रम्य तारे चमकती नभःप्रांतीं
शिलाशकलें त्यापरीं निघुनि गेलीं
सुभग सत्वर बाहेर मूर्ति आली ॥ ६ ॥

मूर्तिकारें काढिली शिलेंतूनी
मूर्ति सुंदर संपन्न अवयवांनीं
तीस पाहुनि कृतकृत्य मनीं झाला
हर्षरंगीं नाचला ! गृहा गेला ॥ ७ ॥

सफल होतां सद्यत्न मानवाचे
मूढजन जो नच हर्षभरें नाचे
शीण त्याचा सकलही लया जाई
कार्य करण्या सामर्थ्य नवें येई ॥ ८ ॥

त्याच ठायीं मग भक्त एक आला
मूर्ति पाहुनि आनंद तया झाला
रम्य देवालय एक रचुनि तेथें
मूर्ति नेउनि ठेविली तयें हातें ॥ ९ ॥

शिला पूर्वी जी एक रूपहीन
तीस देऊं लागले लोक मान
विजन होती जी भूमि एककालीं
तीच पुण्यक्षेत्रभू पुढें झाली ! ॥ १० ॥

क्षुद्र दगडा देवत्व द्यावयाचें
असे मनुजा ! सामर्थ्य तुझें साचें
कसा दीनाहुनि दीन असा होसी ?
मूर्तिकाराचा कां न धडा घेसी ? ॥ ११ ॥

तुझ्या मार्गीं जे दगड आड येती
घाव त्यांवर आपुल्या घाल हातीं
काढ त्यांतुन रमणीय दिव्य मूर्ति
करिल मग ती तव सर्व कामपूर्ती ॥ १२ ॥

# १८. कोण ?

फार प्राचीन काळीं दैवनगरीमध्यें भगदत्त नांवाचा राजा राज्य करीत होता. तो राजा आणि त्याची ती नगरी हीं दोन्हीं त्यांच्या नांवांना साजतील अशींच होतीं; इतकीं कीं, जणूं कांहीं ज्या भगदत्त राजाच्या मातापितरांनीं त्याचें नाव ठेविलें आणि ज्या त्यांच्याही आधींच्या लोकांनीं त्या नगरीचें नामकरण केलें त्या लोकांना भगदत्ताचें व त्याच्या ताब्यांतील नगरीचें भवितव्य अगोदरच माहीत असावें ! तीं नांवें इतकीं सार्थ होतीं असें आम्ही म्हणतों याला कारणहि तसेंच बलवत्तर आहे. कारण त्या राज्याची व्यवस्था–अगर अव्यवस्था–तशीच कांहीं दैवाधीन होती. राजा भगदत्त मोठा श्रद्धाळू, पण त्याची श्रद्धा दैवावर असे. त्याच्या या श्रद्धास्थानांतील एका अधिक मात्रेच्या बेरजेमुळें त्याच्या नगरींतील प्रजेच्या सौख्यांत आणि सुरक्षिततेंत किती वजाबाकी होत होती याची राजा भगदत्तास मुळींच कल्पना नव्हती ! कोणत्याही आरोपीला उघड अगर संशयावरून पकडल्यास, त्याची चौकशी भगदत्त मानवी बुद्धीला गोचर अशा साक्षीपुराव्यावरून करीत नसे, तर आरोपीच्या अपराधाचा अगर निर्दोषित्वाचा न्यायनिवाडा ज्याच्या त्याच्या नशिबाकडून करविला जात असे. या चमत्कृतिजनक न्यायदानाच्या व्यवस्थेसाठीं दैवनरीमध्यें एक भव्य न्यायमंदिर बांधलेलें होतें. त्या मंदिराच्या मध्यभागीं मजबूत कठड्यानें वेष्टित असा एक चौथरा असून, त्या चौथऱ्याच्या खालीं दोन तळघरें असत व त्या तळघरांचीं द्वारें चौथऱ्याच्या जमिनींत बसविलेलीं असत. एका तळघरांत अत्यंत भयंकर असा एक व्याघ्र व दुसऱ्यांत एक तितकीच स्वरूपसुंदर बालिका लपविलेली असे. कोणत्या तळघरांत कोण आहे हें कळण्यास मात्र कोणासही मार्ग नसे. कारण या रहस्यांतच आरोपींची दैवपरीक्षा असे. अशा त्या चौथ-ऱ्यावर आरोपीस आणून सोडण्यांत येई व त्या दोन तळघरांपैकीं कोणत्या तरी एकाचें द्वार उघडण्याची त्यास आज्ञा होई. आरोपीच्या आयुष्याची

दोरी बळकट व त्याच्या सुखाची बाकी त्याच्या नाशिबानें शिल्लक असली, तर त्यास ती बालिका असलेलें तळघर उघडण्याची बुद्धि होई व त्यावरूनच तो पूर्णपणें निरपराधी आहे असा निकाल होऊन त्याचा त्या सौंदर्यलतिकेशीं तेथल्या तेथें, त्याची मर्जी असो वा नसो, विवाह करून देण्यांत येई. परंतु जर का आरोपीच्या दैवानें त्यास दगा दिला तर तो अपराधी ठरून त्याच्या अपराधाचें शासनपत्रही तत्क्षणींच त्या व्याघ्राच्या नखांनीं त्याच्या हृदयत्पटलावर कोरलें जाई.

अशा रीतीनें राजा भगदत्त आपल्या दैवनगरींतील आरोपींचा न्यायनिवाडा मोठ्या दक्षतेनें व प्रामाणिकपणानें करीत असे. त्याची ती न्यायपद्धति विलक्षण तर खरीच; पण तींतही नेहमीं हटकून अन्याय होईल अशी कोणालाही खात्री देतां आली नसती. मानवी न्यायाधिशांच्या हातून तरी नेहमीं न्यायच मिळतो असें कोठें आहे ? कोणाच्या प्रामाणिक गैरसमजामुळें तर कोणाच्या अप्रामाणिक समंजसपणामुळें, कित्येकदां आरोपीच्या पूर्वचारित्र्याचा पगडा अधिक बसून तर कित्येकदां न्यायाधिशाच्या पूर्वग्रहांचा जोर अधिक होऊन; गुन्हेगारास फिर्यादीच्या खर्चासह मुक्तता तर निर्दोषी माणसास दंडासह तुरुंगवास यांचा लाभ होतोच कीं नाहीं ? मग अशा तऱ्हेच्या मनुष्यनिर्मित दैवयोगापेक्षां, ज्यास कांहीं नांवगांव नाहीं अशा दैवयोगावर न्यायदान अवलंबून ठेवण्यांत भगदत्तानें बराच मुत्सद्दीपणा व शहाणपणा दाखविला होता असें कोणी म्हटल्यास तें म्हणणें विचार करण्यासारखें खचित होतें. असो. राजा भगदत्ताच्या न्यायपद्धतीचें वकिली समर्थन करण्यासाठीं ही कथा लिहिली नसून तीमुळें बिचाऱ्या लीलेवर केवढा बिकट प्रसंग ओढवला हें आम्हांस सांगावयाचें आहे.

लीलावतीवर राजा भगदत्ताचें अगदीं प्राणापलीकडे प्रेम होतें. बिचारीची आई निर्वतल्यापासून भगदत्ताला ती आणि तिला भगदत्त यांखेरीज दुसरें कोणी नव्हतें. लीला अगदीं हुबेहूब आपल्या आईची प्रतिमा होती. आधींच राजकन्या आणि त्यांत तरुण आणि सुंदर ! मग ती सगळ्या

दैवनगराची सौभाग्यलक्ष्मी होऊन बसली तर त्यांत काय नवल? लीलावती मूर्तिमंत सौंदर्यलतिका होती व त्या लतिकेच्या आयुष्यांतील तो वसंत ऋतु होता. स्वाभाविकच तिला एका नवीन प्रेमाची पालवी फुटली होती. अगदीं स्पष्ट शब्दांत सांगावयाचें म्हणजे, दैवनगरींतील पराक्रमी व लोकप्रिय सरदार चंद्रोदय यावर लीलेचें प्रेम जडलें होतें, व तोहि तिजवर तितकाच अनुरक्त झाला होता. दोघेंही तरुण, दोघेंही सुस्वरूप व दोघेंहि एकमेकांचीं चहातीं; मग त्यांनीं एकमेकांशीं विवाहबद्ध होण्याची लालसा धरूं नये तर कोणीं धरावी? राजा भगदत्त याचीही सरदार चंद्रोदयावर पूर्ण मर्जी होती. तो त्याला त्याच्या पराक्रमाला व इभ्रतीला साजेल अशाच इतमामानें वागवी. कदाचित हा सारा मानमतराब, चंद्रोदय पराक्रमी व लोकप्रिय होता म्हणूनहि असेल. तें कसेंहि असलें तरी चंद्रोदयाचा थाट फारच अप्रतिम असे हें खरें. त्याला राजवाड्याजवळच एक भव्य बंगला बांधून देण्यांत आला होता. कधीं कधीं राजा भगदत्ताबरोबर भोजन करण्याचा बहुमानहि त्यास मिळत असे. अशा सुप्रसंगांची परिणति लीला—चंद्रोदयांच्या नेत्रमीलनांत होऊन त्यांच्या हृदयांत एकमेकांचीं मधुर चित्रें कायमचीं ठाणीं देऊन बसावीं हें अगदीं स्वाभाविकच होतें. आपल्या ऐश्वर्यप्रदर्शनाच्या व उदारमतवादित्वाच्या भरांत राजा भगदत्ताच्या लक्ष्यांत ही गोष्ट बरेच दिवस आली नव्हती. पण एक दिवस चंद्रोदयाच्या एका अज्ञात शत्रूनें भगदत्ताच्या कानांत विष ओतलें. झालें! राजा भगदत्त अगदीं खवळून गेला. भगदत्त अगदीं न्यायी—त्याच्या प्रामाणिक मताप्रमाणें—न्यायी व प्रेमळ होता खरा; परंतु या जगांत जर त्याला सर्वांत अधिक एखादी प्यारी वस्तु असेल तर ती इभ्रत होती. चंद्रोदय पराक्रमी असेल, सुस्वरूप असेल, सच्छील असेल, आणखी कितीतरी असेल; पण म्हणून काय झालें! इतके सर्व गुण असले म्हणून तो कांहीं राजघराण्यांतला ठरत नव्हता. तो उच्च कुळांतील असेल, पण किती केलें तरी राजघराणें तें राजघराणें! आपला दर्जा विसरून

राजघराण्यांतील एका कुमारिकेवर आणि तेंही खुद्द त्याच्या लीलेवर प्रेम करण्यांत चंद्रोदयानें फारच अक्षम्य अपराध केलेला होता. भगदत्ताचें माथें अगदीं फिरून गेलें. चंद्रोदयाला शासन करण्यांत आपल्या हातून केवढा अन्याय होणार आहे, येवढेंच नव्हे तर त्यामुळें त्याजवर अनुरक्त असलेल्या आपल्या एकुलत्या एक मातृहीन कन्येला दुःखसागरांत लोटून आपण पर्यायानें आपलेंच किती नुकसान करीत आहों, याचाही त्या संतापाच्या भरांत भगदत्ताला विचार राहिला नाहीं. त्यानें बरोबर पंधरा दिवसांनीं चंद्रोदयाच्या अपराधाची चौकशी करण्याचें ठरविलें व तेवढ्या मुदतींत चंद्रोदयानें आपल्या तर्फेच्या दैवी साक्षीपुराव्याची व्यवस्था करावी असें त्यास कळविलें.

बिचारा चंद्रोदय ! बिचारी लीलावती ! दोघेंहि अत्यंत व्यथित होऊन गेलीं. प्रत्यक्ष भगदत्तापुढें चंद्रोदयाच्या दैवाचें काय चालणार ? आणि त्याच्या चौकशीचा निकाल कसाही लागला तरी त्याला त्याचें सुखदुःख काय होतें ! त्याच्या ऐश्वर्याला कळस चढविणारी व त्याच्या पराक्रमाचें, किंबहुना सर्व आयुष्याचें सार्थक करणारी त्याची हृदयदेवता त्याजपासून हिरावून घेतल्यावर त्याला जगणें आणि मरणें यांत कांहींच फरक वाटत नव्हता. आणि चंद्रोदय नाहींसा झाल्यावर लीलावतीला अंधकाराखेरीज काय दिसणार होतें ? लीलावती धीट व धोरणी खरी; पण भगदत्तापुढें तिचें कांहींच चालेना. ती अगदीं व्याकुळ होऊन गेली. तिनें चंद्रोदयाची चौकशी न करण्याविषयीं भगदत्ताची नानाप्रकारें समजूत घालण्याचा यत्न केला. केवळ राजघराण्यांत जन्म न घेण्याच्या दैवी अपराधाखेरीज चंद्रोदयाचे अंगीं दुसरें काय वैगुण्य आहे असा तिनें भगदत्तास सवाल केला. पण भगदत्त मुळीं तिच्या त्या प्रश्नाकडे दुर्लक्षच करी, व एखादे वेळीं फारच त्रासून, ‘ तूं त्याच्यावरील प्रेमानें अंध झालेली असल्यामुळें तुला या राजकारणांतील इभ्रतीचें महत्त्व कळणें शक्य नाहीं, ’ असें जरा ओरडून उत्तर देई व तिला गप्प बसवी. बिचारी लीलाहि आपणांस राजघराण्यांत जन्म घेतल्याच्या

अपराधाबद्दल हें दैवी शासन होत आहे, असें आपलें समाधान करून घेत आपले अश्रू पुशी.

चंद्रोदयाच्या या चौकशीला आतां सारा चार दिवसांचा अवधि होता. लीलावतीच्या हृदयाचें अगदीं पाणी होऊन गेलें. लवकरच आपल्या आयुष्याची अमावास्या होणार, या भीतीच्या कृष्ण छायेनें तिचें हृदय व्याप्त होऊन गेलें. आजपासून पांचव्या दिवशीं चंद्रोदय कोठें असेल ? भूलोकाला कंटाळून तो चंद्र स्वर्गाच्या निर्मल वातावरणांत प्रवेश करील व तेथें आपल्या तेजानें अधिक चमकूं लागेल. पण मग आपली वाट काय? चंद्रोदय निघून गल्यावर या जगांत काय अर्थ उरणार आहे? पण त्यानें व्याघ्राचें तळघर न उघडतां दुसरें उघडलें तर?... कोण? स्नेहमयी? अमात्यांची कन्या? आपल्या—सर्वस्वी आपल्या—चंद्रोदयावर प्रेम करणारी व आपल्या सुखस्वप्नांत व्यत्यय आणूं पाहणारी दुष्ट सवत? कोणालाही न कळणारें तें तळघराचें रहस्य लीलावतीनें मोठ्या प्रयासानें हस्तगत करून घेतलें होतें, व त्या योगानें तिच्या क्षुब्धतेंत अधिकच भर पडली होती. समुद्र शांत खरा पण तो वादळ नसेल तव्हां! स्नेहमयी चंद्रोदयावर निस्सीम प्रेम करीत असे हें लीलेस पूर्ण माहीत होतें, व चंद्रोदयानेंही कित्येकदां तिजकडे स्मितपूर्वक दृष्टिक्षेप केल्याचें तिला पक्कें स्मरत होतें. स्त्रियांच्या अंगीं स्वभावतःच वसत असलेलें संशयपिशाच्च जागृत होण्यास येवढें कारण पुरें होतें. लीलेच्या हृदयांत भयंकर विकारांचें वादळ सुटलें, त्यात मत्सराचा प्रचंड वडवाग्नि भडकला! आपल्या हृदयमंदिरांतील चंद्र अस्त पावून चंद्रोदय हा स्नेहमयीच्या हृदयसिंहासनावर चमकणारा चंद्रोदय ठरणार! लीलावतीस आपलें सर्व शरीर अग्नीचेंच केलें आहे कीं काय असें वाटूं लागलें. आपल्या दुःखाश्रूंची माळ गुंफून ती आपल्या हातांनीं चंद्रोदय स्नेहमयीच्या गळ्यांत घालणार! हें दृश्य लीलेस सहन होईना. त्यापेक्षां—त्यापेक्षां चंद्रोदय कायमचाच नाहींसा झाला तर? लीलेस तेंही दृश्य पहावेना. तिनें

आपले डोळे मिटून घेतले, तों तिच्या मनश्चक्षूंपुढें त्या व्याघ्राचे तीक्ष्ण डोळे काजव्याप्रमाणें चमकूं लागले, तिच्या कानांत चंद्रोदयाची करुण किंकाळी दुमदुमूं लागली. छे छे !! लीलावती ही स्त्री होती. तिचें हृदय त्या भयंकर कल्पनेनें फुटून जाण्याची वेळ आली. आपणापाशीं नाहीं तर नाहीं, चंद्रोदय कोठेंही सुखी असला म्हणजे झालें. पण त्याच्याबरोबर ती दुष्ट स्नेहमयी सुखी होईल त्याची काय वाट? बेहेत्तर आहे आपला चंद्रोदय व्याघ्रमुखीं पडला तरी......लीलेचें चित्त द्विधा झालें. तिला कांहींच सुचेना.

न्यायदानाची घटका येऊन ठेपली. न्यायमंदिर प्रेक्षकांनीं चिकार भरून गेलें होतें. मंदिराच्या एका बाजूस विवाहसमारंभाची तयारी व दुसऱ्या बाजूस अस्थिसंस्काराची व्यवस्था ठेविलेली होती. राजा भगदत्त आपल्या उच्च सिंहासनावर बसला असून त्याच्या शेजारींच राजकन्या लीलावतीचें उच्चासन होतें. तिच्या मुद्रेवर कोणताच मनोविकार दिसत नव्हता. ती एखाद्या दगडी पुतळ्याप्रमाणें निश्चल व स्तब्ध बसली होती चंद्रोदयास मंदिरांत आणण्यांत आलें. त्याचीही मुद्रा निर्विकार परंतु निश्चयी दिसत होती. आपल्या दैवाची परीक्षा पहाण्यापूर्वी राजा भगदत्ताला अभिवादन करण्यासाठीं चंद्रोदय त्याच्याजवळ आला. त्याला मुजरा केल्यावर, आपल्या लाडक्या लीलेला, नव्हे, तर राजकन्या लीलावतीबाईना त्यानें कंपित हस्तानें मुजरा केला व क्षणभर—अगदीं एकच क्षण—तिजकडे अर्थपूर्ण नजरेनें अगदीं रोखून पाहिलें. लीलावती आपल्या दैवाची गुरुकिल्ली हस्तगत करून घेऊन आपणांस योग्य मार्ग दाखविणार याविषयीं चंद्रोदयास मुळींच संशय नव्हता. लीलावतीनें रीतीप्रमाणें मुजरा परत करण्यासाठीं आपला हात वर उचलला व अगदीं सहज लीलेनें बोटें हलवावीं त्याप्रमाणें अंगुलिनिर्देश केला.

चंद्रोदय उमजला. तो सरळ चौथऱ्यावर गेला व त्यानें एका तळघराचें कुलूप काढलें !

आंतून कोण आलें ? वाचक ! निष्ठुर व्याघ्र, कीं कोमल स्नेहमयी ?

## १९. करुणाष्टक

अनुदिन अनुतापें तापलों रामराया !
परम दिनदयाळा नीरसीं मोहमाया. ।
अचपळ मन माझें नावरे आवरीतां;
तुजविण शिण होतो धांव रे धांव आतां ॥ १ ॥

भजनरहित रामा सर्वही जन्म गेला,
स्वजनजनधनाचा व्यर्थ म्यां स्वार्थ केला. ।
रघुपति मति माझी आपुलीशी करावी,
सकळ त्यजुनि भावें कांस तूझी धरावी. ॥ २ ॥

विषयजनितसूखें सौख्य होणार नाहीं,
तुजविण रघुनाथा ओखटें सर्व कांहीं. ।
रघुकुळटिळका रे हीत माझें करावें,
दुरित दुरि हरावें, म्यां स्वरूपीं भरावें. ॥ ३ ॥

तनमनधन माझें राघवा रूप तूझें;
तुजविण मज वाटे सर्व संसार ओझें. ।
प्रचलित न करावी सर्वथा बुद्धि माझी,
अचल भजनलीला लागली आस तूझी. ॥ ४ ॥

चपळपण मनाचें मोडितां मोडवेना;
सकळस्वजनमाया तोडितां तोडवेना. ।
घडि घडि विघडे हा निश्चयो अंतरींचा;
म्हणवुनि करुणा हे बोलतों दीन वाचा. ॥ ५ ॥

जळत हृदय माझें जन्म कोट्यानुकोटी;
मजवरि करुणेचा राघवा पूर लोटी. ।
तळमळ निववी रे राम कारुण्यसिंधू
षडरिपुकुळ माझें तोडिं यांचा विरोधू. ॥ ६ ॥

तुजविण करुणा हे कोण जाणेल माझी ?
शिणत शिणत पोटीं पाहिली वाट तूझी. ।
झडकरि झड घालीं धांव पंचानना रे
तुजविण मज नेते जंबुकी वासना रे. ॥ ७ ॥

स्वजनजनधनाचा कोण संतोष आहे ?
रघुपतिविण आतां चित्त कोठें न राहे. ।
जिवलग जिव घेती, प्रेत सांडोनि देती,
विषय सकळ नेती, मागुता जन्म देती. ॥ ८ ॥

## २०. मराठे व इंग्रज

इंग्रजांचा इकडे ( म्हणजे हिंदुस्थानांत ) येण्यांत मूळ हेतु व्यापाराचा होता, व मराठ्यांनीं जशी दिल्लीच्या पातशाहीची नोकरी बजावतां बजावतां साम्राज्यसत्ता आपल्या हातीं आणली, तसेंच इंग्रजांनीं व्यापार करितां करितां राज्य कमावलें. राज्य हें कदाचित् मूळचें साध्य नसेल, पण निदान व्यापारवृद्धीचें तें एक उत्कृष्ट साधन आहे, ही गोष्ट त्यांना लवकरच कळून आली व तेव्हांपासून ते राज्य कमावण्याच्या उद्योगास लागले. या कामीं त्यांना परिस्थिति बरीच प्रतिकूल होती. मूळ ठिकाण इंग्लंड; हिंदुस्थानास हजारों मैलांवरून केवळ समुद्रमार्गानें यावयाचें; हल्लींप्रमाणें वाफेचीं यंत्रें वगैरे शीघ्र गतींचीं साधनें नव्हतीं; वाटेंत प्रतिस्पर्धी युरोपियन दर्यावर्दी लोकांकडून उपसर्ग लागण्याची भीति; हिंदुस्थानांत मुसलमान, मराठे, यांसारखे प्रबळ लढवय्ये शत्रु; व त्यांना फ्रेंचांसारख्या युरोपियन लोकांची मदत; अशी स्थिति असतां, ईस्ट इंडिया कंपनीच्या पिंपळाची जी मुळी एकदां बंगाल्यांत रुजली तिनें कालान्तरानें सर्व हिंदुस्थानभर राजेरजवाड्यांच्या सत्तेच्या प्रचंड इमारती भराभर उलथून पाडून जमीनदोस्त केल्या !

इंग्रजांना हें जें अनिरुद्ध यश मिळत गेलें, त्यास इंग्रजांचें सुदैव हें तर एक कारण आहेच; पण दैवाइतकेच त्यांच्या अंगचे कांहीं ठळक गुणही कारणीभूत झाले आहेत, हें नाकबूल करण्यांत अर्थ नाहीं. इतिहासाची चर्चा करावयाची, तर ती ऐतिहासिक बुद्धीनेंच केली पाहिजे. तवढ्या वेळेपुरती अभिमानाची भेसळ यांत होऊं देतां उपयोगी नाहीं. निव्वळ ऐतिहासिक दृष्टि लावूनही आपणांस मराठेशाहीविषयीं अभिमान वाटण्यासारखी पुष्कळ जागा आहे. पण इंग्रजांविषयीं बोलण्याचा प्रसंग आला असतां, त्यांच्याही चारित्र्याची परीक्षा आपण निःपक्षपातीपणानें केली पाहिजे; तरच, आम्हांस थोडीबहुत तरी ऐतिहासिक म्हणून दृष्टि आहे असें ठरेल.

इंग्रजांचें सुदैव म्हणून म्हटलें, त्याचीं तीन उदाहरणें तरी आम्हांस सांगतां येतील. तीं अशीं:—इंग्रजांची व मराठ्यांची लढाई प्रत्यक्ष झाली त्याच्या आधीं होण्याची ती टळली. इंग्रजांसंबंधानें महादजी शिंदे व नाना फडणवीस यांना जो संशय आला, तो शिवाजीस किंवा बाजीराव चिमणाजीअप्पा यांस येता, तर त्यांनीं इंग्रजांची मुंबईची वखार व वसाहत केव्हांच उधळून लाविली असती. इंग्रजांच्या सत्तेचें मुख्य केन्द्र पडलें बंगाल्यांत, व तें मराठ्यांचा हात पोंचण्यापलीकडचें होतें. दुसरें, इंग्रज व फ्रेंच यांचें युद्ध जुंपलें व संपलें, तें हिंदी राजे-रजवाड्यांना इंग्रजांचा राज्यलोभ स्पष्टपणें दिसून येण्यापूर्वीं; आणि तिसरें, एकुणिसाव्या शतकांत वायव्य सरहद्दीच्या बाजूस शीख लोकां-सारख्या लढवय्ये लोकांचें राष्ट्र उदयास येऊन त्यानें वायव्येकडील सरहद्दीचा दरवाजा बंद करून टाकला होता. वरील तिन्हींपैकीं एकही गोष्ट जरी विपरीत घडून येती, तरी हिंदुस्थानांतील इंग्रजी राज्यास धोकाच येता; पण स्वतः काळच पक्षपाती बनून त्यानें इंग्रजांचें मोठें साहाय्य केलें. असो; सुदैवाची जोड गुणवानास लाभली, तरच त्याचा झाला तरी खरा उपयोग होतो. नादान मनुष्याला दैव हात देऊन तरी किती देणार ? पण सुदैवाच्या लाभास स्वतःला पात्र करून घेण्यासारखे इंग्रजांच्या अंगचे गुण म्हटले म्हणजे ( १ ) शिस्त व व्यवस्थेची आवड; ( २ ) धिम्मेपणाचा स्वभाव व दूरदृष्टि; ( ३ ) चिकाटी व करारीपणा; ( ४ ) स्वराष्ट्रप्रेम व राष्ट्राच्या कीर्तीची चाड; व ( ५ ) लोकोत्तर कर्तव्यनिष्ठा. वरील प्रकारचे गुण इंग्रजांचे अंगीं होते, म्हणूनच इतक्या प्रतिकूळ परिस्थितींत त्यांना एवढें राज्य मिळ-वितां आलें. इंग्रजांच्या अंगीं लोभ, अन्यायाकडे कानाडोळा करण्याचा स्वभाव, मानभावीपणा, कपटपटुत्व, इत्यादि ठळक दोष नव्हते असें नाहीं; पण मराठ्यांच्या अंगीं हे दोष मुळींच नव्हते, असें कोणासही म्हणतां येणार नाहीं. अर्थात् मराठे व इंग्रज या दोघांच्याही अंगचे समान धर्म हिशोबांत धरण्यांत अर्थ नाहीं. ती दुबेरजी म्हणून टाकूनच

दिली पाहिजे. मराठे व इंग्रज यांच्यामध्यें जर विषमता असेल, तर ती वरील गुणांच्या बाबतींत; आणि वरील गुण मराठ्यांपेक्षां इंग्रजांच्या अंगीं अधिक प्रमाणानें वसत होते. म्हणून आपल्या अंगच्या लोभ, अन्यायबुद्धि, वगैरे दुर्गुणांचाही इंग्रजांस जितका फायदा करून घेतां आला, तितका मराठ्यांस करून घेतां आला नाहीं. या गुणांपैकीं निदान एकदोन गुणांसंबंधानें तरी तत्कालीन मराठ्यांनाही खात्री पटली होती, यांत शंका नाहीं. बाजीरावाचे वेळीं मराठी राज्यांतील बेशिस्तपणाचा खुद्द मराठे राज्यांतील लोकांसच वीट आला होता, व म्हणूनच, बाजीरावशाही नष्ट झाली, तेव्हां कोणाही मराठ्यानें इंग्रजांविरुद्ध हात उचलला नाहीं. पेशव्यांच्या दौलतीएवढी खानदानीची व श्रीमंत दौलत एरवीं लोकांनीं अशी आपल्या डोळ्यांदेखत नष्ट होऊं दिली असती काय? बाजीराव जाऊन इंग्रज आले, ही राष्ट्रास घातक अशी राज्यक्रांति झाली, असें पुण्यांतील लोकांस न वाटतां, आपण अनन्वित कृत्यें करणाऱ्या एका नराधमाच्या त्रासांतून सुटलों, असेंच त्यांच्या मनास वाटत होतें. राजाचा पराभव होऊन, तो देशोधडीस गेला असतां, राजाच्या प्रेमामुळें नव्हे, पण, राष्ट्रप्रेमानें व स्वाभिमानानें, आपल्या राजधानीचें लढून रक्षण केल्याचीं उदाहरणें जगाच्या इतिहासांत किती तरी सांपडतील! पण पुण्यास शनवारच्या वाड्यावरील पेशव्यांचें निशाण काढून टाकून, ज्यानें इंग्रजांचें निशाण लाविलें, तो मनुष्य—त्याला देशाभिमानाच्या दृष्टीनें आतां नीच, अधम, कांहींही म्हणा—पण त्या वेळच्या लोकांना तो उपकर्ता असा वाटल्याशिवाय आपल्या छातीवर लोकांनीं कसा नांदूं दिला असता? कागदोपत्रींचा व दंतकथेचा पुरावा लक्षांत घेतला असतां, आज मर्यादित स्वराज्य मागण्याच्या वेळीं आमची इंग्रजांविषयीं जी आदरबुद्धि आहे, तिच्यापेक्षां शंभर वर्षांपूर्वी हातीं असलेलें स्वराज्य गमावण्याच्या वेळीं तत्कालीन महाराष्ट्रीयांच्या मनांत इंग्रजांविषयीं अधिक आदरबुद्धि वागत होती, असेंच म्हणावें लागतें.

इंग्रज बाजीरावाचें राज्य न घेते, तर पुण्याचे लोक म्हणजे त्यांस तें घेण्यास अर्जच करते, असें नाहीं. पण इंग्रजांनीं तें घेतलेंच तेव्हां मराठे युद्धास प्रवृत्त झाले नाहींत, येवढी गोष्ट खरी. पूर्वी संभाजीच्या पश्चात् मोगलांनीं महाराष्ट्रावर जी झडप घातली, तेव्हां ज्या मराठ्यांनीं वीस वर्षेपर्यंत जिवाचें रान करून स्वातंत्र्यरक्षणार्थ युद्ध केलें, त्यांच्याच चवथ्या पांचव्या पिढीचे वंशज महाराष्ट्रांत यावेळीं होते, व हल्लींप्रमाणें ते तेव्हां निःशस्त्रही नव्हते ! १८५७ च्या पेक्षांही इंग्रजांशीं लढण्यास मराठ्यांना त्यावेळीं अधिक अनुकूल परिस्थिति होती. असें असतां सर्व मराठे घरच्या घरीं स्वस्थ बसले, याचा अर्थ काय करावयाचा ? आतां त्या वेळीं युद्धास प्रवृत्त होणारास हटकून यश आलें असतेंच असें नाहीं; पण, स्वातंत्र्याकरितां बेफाम व जिवावर उदार होऊन, कोणतेंही राष्ट्र लढूं लागतें, तेव्हां तें जयापजयाचा आगाऊ विचार करीत नसतें. बोअर लोक इंग्रजांविरुद्ध किंवा बेल्जन लोक जर्मनांविरुद्ध लढण्यास उभे राहिले, तेव्हां आपण प्रतिपक्ष्यांशीं तुल्यबळ आहों किंवा आपणास हटकून यश येईलच, अशा भावनेनें ते उभे राहिले नाहींत. प्रेसिडेंट क्रूगर यांनीं, “ आम्ही जगास थक्क करूं ” असें जगजाहीर केलें. याचा अर्थ ‘ इंग्रजांचा नाश करून जगास थक्क करून सोडूं’ असा नसून, ‘आपल्या स्वातंत्र्यप्रेममूलक आत्मयज्ञानें थक्क करून सोडूं, ’ असाच याचा अर्थ होता. पण मराठे स्वातंत्र्यास विटले होते म्हणा, किंवा इंग्रज आल्यानें आपला फायदा होईल असें वाटत असल्यामुळें म्हणा, त्यांनीं यत्किंचित्ही हालचाल केली नाहीं. कारण कांहींही असो, तें कार्य घडून आलें एवढें खरें !

## २१. पैसा

“ असे जयाला धन तोचि पंडित
कुलीन तो तोचि गुणी बहुश्रुत
तो मान्य तो सुंदर तो विचक्षण
धनाश्रयें राहाति सर्वही गुण. ”

— वामन पंडित

भाई जगांत सारा, पैसाच एक प्यारा
पैसा असे जिवाचा, स्वर्गापरी निवारा. १

पैसाच दिव्य दृष्टी, पैशांत सर्व सृष्टी
पैशांत अश्रुवृष्टी, स्नेहाळ भाव सारा २

पैशामुळेंच ताई, पैशांत बापमाई
पैसाच मित्र, भाई, पैसाच पुत्रदारा ३

पैशांत शील शक्ती, सौन्दर्य, धर्म, भक्ती
पापामधून मुक्ती, पैशामुळें दरारा ४

पैशामुळें जिव्हाळा, पैशास पुष्पमाळा
पैशामुळें स्तुतीची ये थोरवी अगारा ५

पैसा असेल हातीं सौवर्ण होय माती
पैसाच येथ नीति वा कीर्तिचा नगारा ६

‘ हातीं असेल पैसा या तोंवरीच बैसा ! ’
श्रीनेंच थोर ऐसा केला असे पुकारा ७
पैसा नसेल त्यानें, कां हें जिणें शिणावें !
हा धर्म, कायदा हा; पैशाविणें न थारा. ८

## २२. सुखनिधान व हैबती

( सुखनिधान व बगंभटाच्या वेषांतील हैबती प्रवेश करितात. )

**सुख०**:–कां बगंभट, काय पहाता या किल्ल्याच्या भिंतीवरनं ?

**हैबत०**:–( स्वगत ) अरे होय कीं मी बगंभट ! मी भोळा मनुष्य हें विसरतोंच मधून मधून. ( भटासारखा बोलण्याचा आविर्भाव आणून ) कसचं पाहातों नि कसलं काय ? या किल्ल्यावरनं पुणं दिसतं कां पाहतों सरकार !

**सुख०**:–एव्हांच पुणं पाहून काय करायचं आहे ? पुण्याला जायला अद्यापि पुष्कळ अवकाश आहे !

**हैबत०**:–पुण्याला जायला स्वारीला पुष्कळ अवकाश असेल. पण मला पुण्याचा एव्हांच ध्यास लागला आहे !

**सुख०**:–तो कां ?

**हैबत**:–तें काय सांगूं सरकार ? काल परवां पासून बोरघाटांत लढाई जुंपलेली पाहून छातींत धडकी भरली आहे एक सारखी !

**सुख०**:–पण तुम्ही राजधानींत राहणारे ! लष्करी देखावा तुमच्या डोळ्यांना चांगला ओळखीचा असायचा !

**हैबत०**:–मी राजधानीच्या शहरांत राहणारा खरा ! पण माझ्या जन्मीं नि माझ्या बापजन्मीं प्रत्यक्ष लढाई अशी कुणीहि पाहिली नाहीं ! आम्ही काय बोलूनचालून भिक्षुक आसामी ! बुंदीचे लाडू हेच आमचे आपले तोफांचे गोळे. दर्भाच्या काड्या याच आमच्या तलवारी, भालेन् बरच्या ! चौघड्याचा नगारा हेंच आम्हीं आजवर ऐकलेलें रण-वाद्य ! आम्हालाही चांगला नेम मारतां येतो; पण अंतरपटाच्या आड लपलेल्या वधूवरांच्या डोक्यावर अक्षदा नेमक्या टाकण्यापुरता ! आणि रक्तस्राव म्हणाल तर न्हाव्यानं नख नीट न काढतां जिव्हाळी लावली तर त्यामुळं झालेला, तेव्हां मात्र केव्हां केव्हां दृष्टीस पडतो !

हत्त्याही करण्याचा एकवेळ प्रसंग आला होता मजवर. एका सोमयागांत माझ्याकडं ऋत्विजपणा यायचा होता, पण सोमयागांतलं हौत्र ऋग्वेदानं करावं कीं यजुर्वेदानें करावं असा वाद माजल्यामुळें शौर्य दाखविण्याचा माझ्यावरचा तो प्रसंग टळला.

**सुख०**:—पण तुमच्यां पाहाण्यांत पुण्यावर स्वाऱ्या झाल्या असतील.

**हैबत०**:—होय, पुण्यावर एकदोन स्वाऱ्या झाल्या माझ्या आठवणींत. पण लुटारू लोकांची नुसती आवई उठली कीं, मी नी माझा बाप आपलं सुपं, जातं, टोपलं, पाटावरवंटासुद्धां घेऊन लांब बनेश्वराच्या देवळांत जाऊन दडून बसायाचे. नाहीं म्हणायला नारायणरावसाहेबांचा खून झाला तेव्हां गार्द्यांनीं केलेला दंगा चुकून माझ्या नजरेस पडला. पण काय ? शनिवार वाड्यांतील आरडाओरड कानांवर पडल्याबरोबर मी जो बेशुद्ध पडलों आणि अंगांत ताप भरून निजलों, तो नारायणरावसाहेबांच्या दसपिंडाला नेमका पानावर बसायला अंथरुणावरून उठलों. असले आम्ही शूर ! म्हणून काल परवांपासनं या बोरघाटांत लढाईची धामधूम सुरूं घालेली पाहून धड जीव घेऊन पुण्यास परत जातों कसा असं झालं आहे मला ! आतां सरकार स्वारीसारखा पानपतचा मोहरा वीरपुरुष जवळ असल्यामुळें थोडी भीति कमी होते खरी; तरी पण सरकार पुणं आठवतं तेवढं मात्र खरं ! हें माझ्या संबंधानं झालं. पण आणखी दुसरंही एक कारण आहे सरकार मला पुणं आठवायला !

**सुख०**:—तें काय बरं ?

**हैबत०**:—काय सांगावं सरकार ? तें कारण असं कीं, माझ्या यजमानीणबाईसाहेब माझी फार फार वाट पहात असतील.

**सुख०**:—म्हणजे कोण ?

**हैबत०**:—म्हणजे पार्वती बाईसाहेब !

**सुख०**:—( स्वगत ) खरंच; यानं ही गोष्ट काढली हें एकाअर्थी फार चांगलं झालं. पार्वतीबाई कोण हें मीं डोळ्यांनीं कधीं पाहिलं देखील

नाहीं. आणि दौलतगीर सांगतो त्याप्रमाणं सगळं सुरळीत निभावून जर मी पुण्यास पोंचलों तर सगळ्यांत अवघड प्रसंग यायचा काय तो या बाईशीं. आतां सुदैवानं मीच सदाशिवरावभाऊ असं तिच्या मनानं वेड घेतलं आहे तें माझ्या पथ्यावरच आहे. त्यामुळं तिच्याकडून मला कांहीं एक आडकाठी येणार नाहीं हें उघडच आहे. तरी पण हा बगं-भट तिच्या अगदीं जवळ बारमास रहाणारा विश्वासाचा ब्राह्मण. तेव्हां परक्याकडून सहसा न कळणाऱ्या अशा कांहीं कांहीं खाजगी गोष्टींची माहिती तरी काढावी याच्याकडनं. उपयोगी पडेल !

**हैबत०:**— पार्वतीबाईसाहेबांचं नांव काढल्याबरोबर स्वारी विचारांत कां पडली बरं ! ( उघड ) सरकार, मीं बाईसाहेबांचं नांव काढून आपणाला दुःखाची आठवण करून दिली याची माफी असावी. पण काय सांगू ? त्यांचं दुःख आपल्या रूपानं माझ्या डोळ्यापुढून जातच नाहीं कांहीं केल्या. आणि त्याची आठवण झाली म्हणजे आपल्या तोंडाकडं अस्सं निरखून पहावंसं वाटतं मला.

**सुख०:**– ( स्वगत ) आणि हा माझ्या तोंडाकडे निरखून पाहूं लागला म्हणजे मलाही वाटतं याच्याकडून तोंड फिरवावंसं. माझ्या या दाढी मिशा माझा पुष्कळच बचाव करतात. पण याच्या डोळ्याला डोळा देण्याची छाती होत नाहीं ! काय करावं ( तोंड फिरवतो. )

**हैबत०:**– सरकार, बाईसाहेबांची गोष्ट निघतांच आपण दुःखानं तोंड फिरवलं हें मला कळत कां नाहीं ? पण असं दुःख करून कसं चालणार ? होणाराला तोंड दिलंच पाहिजे ! शिवाय आपल्याला बाईसाहेबांचे निरोप आणि हकीकती सांगून पुण्यास पोंचेपर्यंत चार दिवस धीर देऊन करमणूक करण्यासाठीं त्यांनीं मला मुद्दाम आपणाकडं पाठवलं आहे. म्हणून म्हणतों कीं माझ्याशीं मन मोकळं करून बोलायला सरकारनीं मागं पुढं पाहूं नये !

**सुख०:**— ( स्वगत ) याच्याबरोबर कांहीं तरी बोललंच पाहिजे. ( उघड ) कायरे तिची प्रकृति खुशाल आहेना ? तिला माझ्यामुळं फार कष्ट पडले म्हणतात !

**हैबत०:**—हें अक्षरशः खरं आहे सरकार.( स्वगत ) अरे नीचा अधमा ! त्या साध्वीचा जसा कांहीं तूं नवरा अशा बतावणीनं भाषण करून तूं केलेल्या या गुन्ह्याचं तुला जागच्या जागींच प्रायश्चित्त दिलं असतं. पण गाढवावर बसवून सर्व शहरभर धिंड काढून मग तुला सुळावर चढवायचं तें वांचवून तुला या एकांतांत ठार मारण्याचा उपकार तुझ्यावर मीं काय म्हणून करावा ? ( उघड ) सरकार, बाईसाहेबांची आतां प्रकृति कसली अन् काय ? त्या आपल्या वाटेकडं डोळे लावून नुसत्या जीव धरून बसल्यों आहेत.

**सुख०:**— पण कायहो बगंभट, ती मला आतां इतक्या दिवसांनीं ओळखील कां हो ?

**हैबत०:**— सरकार, कां नाहीं ओळखणार ? ( स्वगत ) तोतया म्हणून. ( उघड ) खरं झांकून कसं राहणार ? ( स्वगत ) आणि खोटंही उघडकीला आल्याशिवाय कसं राहणार ! ( उघड ) पण सरकार आपणालाही माझ्यासारखीच पुण्याची आठवण होत असेल नाहीं ? आणि त्याबरोबर पुण्यांतले आपले आप्तइष्ट, स्नेहीसोबती, नोकरचाकर, सरदार, दरकदार, यांचीहि आपणाला फार आठवण होत असेल !

**सुख०:**— हो हो,आठवण होते म्हणून काय विचारतां ? पुण्यांतली मंडळी माझ्या डोळ्यांपुढनं रात्रंदिवस जात नाहींत.

**हैबत०:**—( स्वगत ) डोळ्यापुढं येतील तेव्हां डोळ्यापुढून जाणार ! ( उघड ) पण सरकार, डोळ्यापुढनं जात नसलीं तरी आपण पुष्कळांची तोंडओळख सुद्धां विसरलां असाल नाहीं ?

**सुख०:**— हो असं तर खरंच. पुष्कळ वर्षं न पाहिल्यानं तसं होणारच.

**हैबत०:**— हो हो,तसं होणारच ! पुष्कळ वर्षं न पाहिलं काय आणि मुळींच न पाहिलं काय दोन्हीं सारखींच ! उलट आपण कुणाला

ओळखलं तरच मी आश्चर्य म्हणेन ! फार काय आपण मलासुद्धां प्रथम ओळखलं नसेल !

**सुख०**:– ( चांचपडत )–हो–हो–

**हैबत०**:– मी सांगतों सरकार नाहींच ओळखलं ( सुखनिधान अं अं करतो. ) नाहींच, नाहींच ! पण म्हटलंना, आपण मला ओळखलं असतं तरच मीं आश्चर्य केलं असतं ! कारण आपण मला पूर्वी पाहिलं असलं तर फारच थोडं पाहिलं असेल.

**सुख०**:– नाहीं, मी तुम्हांला फारसं पाहिल्याचं आठवत नाहीं खरंच.

**हैबत०**:– कशानं कशानं आठवणार ? सगळी प्रजा राजाला ओळखते पण राजा कुठून सगळ्या प्रजेला ओळखणार ? पण सरकार, तसंच म्हणायला गेलं कीं नाहीं, तर मात्र मी आपल्या पाहण्यांत थोडासा असलों तरी मी नेहमीं सरकार स्वारीच्या इतक्या जवळ असें कीं, सरकारला माझी मुळींच आठवण नसेल असं मात्र संभवत नाहीं.

**सुख०**:– नाहीं, तुमची मला मुळींच आठवण नाहीं असं नाहीं कांहीं–पण—

**हैबत०**:– नाहीं–तसं नाहींच होणार ! सरकारस्वारीच्या हातावर मीं देवघरांत इतक्या वेळा तीर्थांचं उदक घातलं आहे, आणि उलट सरकारनीं माझ्या हातावर इतके वेळां दक्षिणेचं उदक घातलं आहे कीं–

**सुख०**:– हो खरंच कीं !

**हैबत०**:– इतक्या वेळां सरकारांनीं पंक्तींत आग्रह करकरून मला जेवावयला वाढलं आहे—

**सुख०**:– हो खरंच कीं–भटजी तुम्ही जेवणार मोठे वस्ताद होता नाहीं ? ताटंच्या ताटं वाढलीं तरी फस्त करीत होता !

**हैबत०**:– ( हंसून ) बरोबर ! अगदीं बरोबर. सरकारस्वारींनीं कसं अगदीं बरोबर सांगितलं. धन्य आहे आपल्या स्मरणशक्तीची !

**सुख०**:– पण भटजी, हल्लीं तुमचं जेवणाचं मान कसं काय आहे ?

**हैबत०**:– कसचे काय आणि कसचं काय ? गेले ते दिवस–सदाशिवरावभाऊसाहेबांबरोबर–तेकसचे परत येतात–सदाशिवरावभाऊ ? नाहीं म्हटलं दिवस ? कसचे परत येतात ! पण मी जेवणार आणि सरकारस्वारी आग्रह करून वाढविणार ही जुनी आठवण झाली कीं काय सरकार, अजूनही हात फुरफुरतात—

**सुख०**:–मोदक खायला अं ?

**हैबत०**:–( स्वगत ) तुला मुष्टीमोदक चारायला. ( उघड ) आणि अजून दांत कसकसतात—

**सुख०**:–लाडू फोडायला कसकसत असतील !

**हैबत०**:–(स्वगत) तुझी नरडी फोडायला हरामखोरा ! ( उघड ) पण ही मेजवानी मिळायला अद्यापि थोडा अवकाश आहे आपण पुण्यास जाऊन पोंचण्याचा ! पण सरकार माझी आपणांला आठवण आहे तशी आपला खास हुजऱ्या हैबती निंबाळकर याचीही आठवण असेलच सरकारस्वारीला !

**सुख०**:–हैबती निंबाळकर ! त्याचीही आठवण आहे थोडीशी !

**हैबत०**:–अलबत्, असणारच ! दिवसभर अठरा घटका जवळ असणारा हैबती त्याची आठवण कशी विसणार ?

**सुख०**:–हो आठवतो खरा. तो अंगानं जरा—

**हैबत०**:–माझ्या अंगा–

**सुख०**:–हो, बरोबर तुझ्या अंगा–

**हैबत०**:–माझ्या दुप्पट अंगलटीएवढा–

**सुख०**:–हो, जवळ जवळ दुप्पट अंगलटीएवढा होता खरा.

**हैबत०**:–( सुस्कारा टाकून ) पण उपयोग काय ? एवढा जवान गडी; पण दुष्ट काळानं त्याचा एकच घांस केला.

**सुख०**:–( दुःखाची बतावणी करून ) एकूण हैबती निंबाळकर मेला म्हणतां अं ?

**हैबत०**:–हो, कित्येक असं म्हणतात खरं.

**सुख०**:–म्हणजे ?

**हैबत०**:–कारण दुसरे कित्येक असं म्हणतात कीं, तो अद्यापि जिवंत आहे ! आणि सरकार, हैबती जिवंत आहे असं म्हणणारांपैकीं मींही एक आहें.

**सुख०**:–पण तो जर खरोखरीच मेला असेल तर तुम्ही जिवंत आहे म्हणून काय होणार ?

**हैबत०**:–पण तो खरोखरच जिवंत असून लोकांनीं मेला मेला म्हणून तरी तो कसा मरणार ? मी आपणांजवळ बोलतों म्हणूनच हैबती जिवंत आहे असं म्हणाना !

**सुख०**:–अहो त्यामुळें माझी एक खात्री पटेल, पण लोकांची कशी पटणार ?

**हैबत०**:–खात्री पटवायला काय कठीण ? खुद्द आपणांसंबंधानं नाहीं कां कारभारी संशय घेत ? तरी पण लोक काय समजतात ? ते आले कीं नाहीं आपणाकडं. मग कसं काय आहे ?

**सुख०**:–पण कायहो बगंभट, खुद्द पुण्यांतल्या लोकांचं मत कसं काय आहे ?

**हैबत०**:–पुण्याच्या लोकांचं मत काय विचारतां सरकार ? त्यांचं मत असं ठाम आहे कीं, सदाशिवरावभाऊसाहेब ते सदाशिवरावभाऊसाहेब; नाहीं म्हणून काय होणार ? मला तर वाटतं, सरकार, कीं आपण पुण्याच्या वेशींत पाऊल ठेवायचा आवकाश कीं, सारा गांव येईल आपल्याला सामोरा ! ( स्वगत ) तोतया हा प्राणी कसा काय असतो हें पहायला ! ( उघड ) आपली गांठ घ्यायला ते उत्सुक झाले आहेत. सदाशिवरावभाऊंची आठवण पुण्याच्या लोकांना पक्की असल्यामुळं

आणि त्यांच्या प्रेमामुळं, काय सांगू सरकार, आपलं नखसुद्धां या लोकांपैकीं एकेकाच्या वांटणीला येणार नाहीं ! ( स्वगत ) याचा जीव घ्यायला. याला लोकांच्या स्वाधीन केला म्हणजे खरोखरच याचा नखा-एवढा तुकडाही एकेकाच्या हातीं लागणार नाहीं !

**सुख०**:–त्यांचं इतकं प्रेम आहे म्हणतां माझ्यावर ?

**हैबत०**:–त्यांचं इतकं प्रेम आहे–सदाशिवरावभाऊंवर ! पण सरकार राहूं दे तें. आपल्याला पुण्याच्या लोकांशीं काय करायचं आहे ? मी आलों तें सगळं काम अजून तसंच राहिलं आहे.

**सुख०**:–तें कोणतें ?

**हैबत०**:–मी इकडं येतांना बाईसाहेबांनीं मला निक्षून सांगितलं आहे कीं, मीं आजपर्यंत सरकारस्वारीची मानसपूजा केली, पण भटजी तुम्ही स्वारीला भेटतांच हे दागिने स्वारीच्या अंगावर घाला. हे पहा सरकार, बाईसाहेबांनीं खुद्द आपल्या हातानं काढून दिले हे दागिने पेटींतून. सरकार, हे आपल्या ओळखीचे असतीलच.

**सुख०**:–दागिने ओळखीचे म्हणून काय विचारतां ? हे दागिने घाल-घालून अंग झिजलं. आणि या अंगावर घालघालून हे दागिने झिजले. मग मी ते कसे नाहीं ओळखणार ?

**हैबत०**:–छेः छेः, नाहीं ओळखणार असं कसं होईल ? हे दागिने घालूं देच मला सरकारस्वारीच्या अंगावर. ( मोत्यांचें पेंडें गळ्यांत घालतो. ) हें मोत्याचं पेंडं झालं, आतां ही बिगबाळी घालायची.

**सुख०**:–काय बिगबाळी ? पण भटजी माझ्या कानाला भोंकं नाहींत ना ?

**हैबत०**:–काय कांनाला भोंक नाहीं ? असं कसं झालं बुवा ?

**सुख०**:–( चरफडून–स्वगत ) अरे अरे घात झाला. ही बिगबाळी कशी आली घात करायला आयत्या वेळीं ? पण नाहीं. कांहीं तरी बात मारून वेळ मारून नेली पाहिजे.

**हैबत०**:–( स्वगत ) अरे नीचा, कसा सांपडलास ? हा बोलूनचालून उत्तर हिंदुस्थानचा राहणारा. याच्या कानाला भोंक कोठून येणार ? ठीक आहे. तुझ्या कानाला भोंक नाहीं तर नसूं दे. गौतमपत्नी अहिल्येची विटंबना तरी इंद्रानं प्रत्यक्ष केली होती. पण थांब पार्वतीबाईसारख्यांची विटंबना करण्याच्या नुसत्या विचाराबद्दल केंसागणिक तुझ्या अंगाला भोंकं न पाडीन तर नांवाचा हैबतीच नव्हे.

**दौलत०**:–( घाईघाईनें प्रवेश करून ) अरे सुखनिधान ( जीभ चावून ) भाऊसाहेब—दैवानं घात केला. बोरघाटांतील लढाईंत आपण हरलों, आतां जीव बचावण्याला पळण्याशिवाय दुसरा मार्ग नाहीं. तेव्हां आपणांला वाट फुटेल तिकडे आपण जा, आणि मीही जातों. हें पहा लोक गडाखालून वर चढलेच.

( ते धांदलीनें निघून जातात. हैबतराव त्याच्या मागोमाग धांवतो तों पडदा पडतो. )

## २३. वनक्रीडा

बोले मुलांप्रति हरी पहिले दिशीं कीं
रात्रींच सिद्ध करणें अशनादि शिंकीं
जाऊं समस्तहि उद्यां वनभोजनातें
पोटांत भाव वधणें अघ दुर्जनातें ॥ १ ॥

एके दिनीं मनिं धरूनि असें हरी तो
चाले प्रभातसमयीं; खळ जो हरीतो
शृंगीरवेंचि करि जागृत मित्रसेना
देणार जागृतिस ज्याविण हो असेना ॥ २ ॥

खडबडोनि समस्तहि धांवले
सहित वत्स हरीप्रति पावले
सकळ खेळति सोडुनि वासुरां
परम कौतुक तें गगनीं सुरां ॥ ३ ॥

वनीं खेळती बाळ ते बल्लवांचे
तुरे खोंविती मस्तकीं पल्लवांचे
फुलांचे गळां घालिती दिव्य हार
स्वनाथासवें ते करीती विहार ॥ ४ ॥

स्वकौशल्य ज्या गुंजमाळांत नाना
गळां घालिती, ते करीती तनाना
शिरीं बांधिती मोरपत्रें विचित्रें
शरीरावरी रेखिती दिव्य चित्रें ॥ ५ ॥

पक्ष्याचिया साउलिच्याच संगें
ते धांवती हास्यरसप्रसंगें
हंसाचिया दाखविती गतीतें
जे लाधले हंसगुरूगतीतें ॥ ६ ॥

धांवोनि लावी पहिलं करातें
श्रेष्ठत्व दे त्या अजि लेंकरातें
जो तो म्हणे लाविन मीच पाणी
धरीन आधीं प्रभु चक्रपाणी ॥ ७ ॥

परोपरी खेळति जी वनांत
अर्पूनि चित्तें जगजींवनांत
धरूनियां मर्कटपुच्छ हातीं
तयां सवें वृक्ष उडों पहाती ॥ ८ ॥

मुखें वासुनी, लोचनभ्रूतटातें
उभारूनियां, वांकुल्या मर्कटातें
अहो दाविती, शब्द तैसे करीती
असे खेळती बाळ निःशंक रीती ॥ ९ ॥

वनीं देखुनी मेघनीळास मोर
प्रमोदें करी नृत्यलीला समोर
तयासारिखे नाचती तोक सारे
खुणावूनि अन्योन्य, कीं तो कसा रे ॥ १० ॥

जसे दांभिक ध्यानमुद्रा धरीती
जनां दाविती ज्ञानही बोधरीती
तशी दाविती ते बकाभ्यासमुद्रा
गडी हांसवीती कृपेच्या समुद्रा ॥ ११ ॥

वदे कृष्ण गोपाळबाळां जनांतें
बसूनी करूं ये स्थळीं भोजनातें
वनीं वत्स सोडा चरायासि पाणी
तयां पाजुनीया म्हणे चक्रपाणी ॥ १२ ॥

बरें, कृष्णजी बोलसी तूं जसा रे
तसें वर्ततों, लक्षितों तूज सारे
असें बोलुनी सोडिती वासुरांतें
नभीं होय आश्चर्य सर्वां सुरांतें ॥ १३ ॥

संतोषतो नंदकुमार साचा
बाळांत तैशा परमा रसाचा
पंक्तीस दे लाभ अजी वनांत
बुद्धी जयांच्या जगजीवनांत ॥ १४ ॥

निजमुख कवणाही आडदृष्टी असेना
रचुनि बसवि ऐसी भोंवतीं बाळसेना
हरिवदन पहाया सर्व दृष्टी भुकेल्या
म्हणुन बहुत पंक्ती मंडलाकार केल्या ॥ १५ ॥

हरी कर्णिकेच्या स्थळीं मध्यभागीं
मुलें भोंवतीं ऱ्हस्व दीर्घे विभागी
लहानापुढें थोर अंभोजपत्रें
अशीं बैसवीलीं भवार्कातपत्रें ॥ १६ ॥

असे कर्णिका अंबुजामाजि जेवीं
मुलांमध्यभागीं बसे कृष्ण, जेवी
मुखीं ग्रास सप्रेम घालूनि हातीं
दहींभात दे, देव लीला पहाती ॥ १७ ॥

## २४. ढवळ्यागवळ्या

झाली! जी गोष्ट करूं कीं नको, करूं कीं नको, याबद्दल आज सतत पांच दिवस नवराबायकोंत एकसारखा तंटा चालला होता ती अत्यंत–अत्यंत दुःखाची गोष्ट–अगदीं अगदीं नाइलाजास्तव करून रामजीबा धायगुडे अतिशय जड अशा पावलांनीं आपल्या घराकडे आला. त्याच्या हातांत एक रुपया होता! पण त्या रुपयाकडे आपली दृष्टि जितकी न जाईल तितकी बरी, असें त्याच्या मनास वाटून त्यानें तो आपला रुपया घेतलेला हात जणूं काय दृष्टीआड व्हावा म्हणून मार्गे धरला होता. जों जों घर जवळ येत चाललें, तों तों त्याची चर्या अधिक अधिकच दुःखित व कावरीबावरी दिसूं लागली. शेतांत काम करून आवशीस घरीं येतांना आजपर्यंत कधींसुद्धां त्याच्या मनाची अशी स्थिति झाली नव्हती. आसूड खांद्यावर टाकून रोज आपल्या ढोरांना हांकीत हांकीत, बरोबर असणाऱ्या आपल्या थोरल्या दोघां पोरांशीं बोलत बोलत अगर एखादें शेतकऱ्याचें आपल्या बैलांना रिझविण्याचें गाणें गात गात, मोठ्या आनंदानें परत यायचा. परंतु आज त्याचा तो आनंद कोणीकडच्या कोणीकडेच गेला होता! आजसा काय? आज सुमारें एक महिना सव्वा महिना झाला, त्या आनंदाला आणि त्याबरोबर त्याच्या कसदार शरीराला एकसारखी ओहोटी लागून त्या दोहोंची बाकी पूज्य होण्याची पाळी आली होती. आनंद तर पार निघून जाऊन आज सुमारें पंधरा दिवस झाले! आणि शरिरांतला कस अगदीं नाहींसा होऊन आतां अगदीं खरोखर हाडें आणि कातडें यांच्यापलीकडे कांहीं म्हटल्या कांहीं शिल्लक राहिलें नाहीं. त्याच्या बैलांखेरीज आणि बायकोखेरीज कोणाच्याही शरिराची त्याच्यासारखी भयंकर स्थिति झालेली नसेल! तीं आपलीं गुरें ज्यांच्यावर आज पंधरा सोळा वर्षें त्यानें आपल्या कुटुंबाचें पोषण केलें, ज्यांना विकण्याचें–थट्टेंतसुद्धां नांव काढलें, तर त्यानें संतापून जावें,

अशीं त्याचीं तीं पोटच्या पोराप्रमाणें वाढविलेलीं गुरें—केवळ हाडें आणि कातडें अशा स्थितीला आलीं हें पाहून त्याचें काळीज तिळतिळ तुटूं लागलें होतें. त्याचीं गुरें—विशेषतः त्याच्या दोन बैलांच्या जोड्या फारच देखण्या, गुबगुबित व पाणीदार असल्यामुळें लोकांचा डोळा त्यांच्यावर फार—फारच असे. आणि तो चिडे यामुळें लोकही त्यांना विकत घेण्याबद्दल मुद्दामच गोष्ट काढीत. अर्थात्च तो फार फार चिडे व तशी गोष्ट काढणारावर आपल्या कुळंबाऊ शिव्यांचा भडिमार करून, कधीं कधीं त्याबरोबर आसुडाच्या माराचाही धाक घाली. पण गेल्या पंधरा दिवसांत तें सर्व गेलें, नव्हे त्यास तें जाऊं द्यावें लागलें. दुसऱ्या कोणी त्यांना विकत घेण्याची गोष्ट काढली, तर त्याला राग येईनासा झाला. इतकेंच नव्हे, तर तीं विकण्याचा अत्यंत—अत्यंत दुःखकारक विचार त्याच्या स्वतःच्या मनांत येऊन त्याच्या अंगावर शहारे येत! तो आपल्याकडून त्या भयंकर विचाराला होतां होईल तों आपल्या अंतःकरणापासून अगदीं दूर सारी. दुसऱ्या कोणी गोष्ट काढल्यास वसकन् त्याच्या अंगावर येई, पण आज नाहीं उद्यां आपल्यावर हा दुर्धर प्रसंग येणार—आपल्या ‘लाल्यापाल्या’ ला आणि ‘ढवळ्यागवळ्या’ ला दुसऱ्याच्या हातीं देण्याची पाळी आपल्यावर येणार, हें त्याच्या मनांत वारंवार आल्याखेरीज राहीना. आपल्या देखत इतरांनीं आपलीं गुरें विकलेलीं त्यानें पाहिलीं. अगदीं पहिल्यानें ज्यांनीं गुरें विकलीं त्यांच्या तोंडावर त्यानें त्यांच्या निर्दयपणाबद्दल अद्वातद्वा शिव्या दिल्या. “आपल्या पोटाला कमी करावं पण आपल्या गुरांना घालावं, पोट भरेना तर त्यांत कांटे भरावे,” असें तो लोकांना बोलला. पण आज तोच दुर्धर प्रसंग त्याच्या स्वतःवर ओढवला. त्याच्याजवळ एकंदर सहा गुरें होतीं. दोन बैलांच्या जोड्या, एक म्हैस आणखी एक गाय. आठच दिवस झाले, वैरण नाहीं यामुळें अशक्त होत होत त्या गाईनें त्याच्या देखत प्राण सोडला. तें पाहून त्याला इतकें दुःख झालें कीं, त्याची स्वतःची आई मेली

तेव्हांसुद्धां इतकें झालें असेल कीं नाहीं कोणास कळे ! त्याच्यासारख्या आडदांड शेतकऱ्याच्या डोळयांतून अश्रू येणें म्हणजे कांहीं सहजा-सहजींची गोष्ट नव्हे; पण ती गाय वैरण नाहीं यामुळें अशक्त होत होत जाऊन तिला उभें राहण्याचीसुद्धां ताकद राहिली नाहीं. कुठें कांहीं गवतकाडी मिळाली तर पहाण्यासाठीं तो बाहेर गेला होता, तो आवशी परत आला आणि मोठ्या मिनतवारीनें कुठून एक पेंढी घेऊन आला होता, ती त्यानें गोठ्यांत नेली. ती पेंढी पाहतांच सगळीं गुरें एकदम उठलीं; प्रत्येकाला वाटलें कीं, आपल्याला पेंढी मिळणार. प्रत्येक गुरूं आपा-पल्या खोल गेलेल्या व निस्तेज डोळयांनीं त्या पेंढीकडे पाहूं लागलें. ती सोमी गायही इतरांच्याबरोबर उठण्याचा प्रयत्न करूं लागली—जेमतेम उठली. रामजीचें त्या गाईविषयीं प्रेम फार. तो साह-जिकच आधीं तिच्याकडे गेला आणि त्यानें ती पेंढी तिच्यापुढें धरली; पण छे ! ती गाय त्या पेंढीला तोंड लावीना. रामजी पुढें झाला आणि त्यानें तिच्या गळयावर हात फिरविला. त्याचा एक चार वर्षांचा मुलगा तितक्यांत तेथें आला होता. तीं त्या पेंढींतल्या दोन काड्या काढून तिच्या तोंडांत घालूं लागला. पण तिनें एक क्षीणसा सुस्कारा टाकून त्या काड्यांपासून तोंड फिरविलें आणि आपली जीभ काढून त्या पोराचा हात तिनें अत्यंत—अत्यंत ममतेनें चाटला. त्याच्या गुदगुल्या होऊन तें पोर मनापासून हंसलें. गाईनें त्या पोराला चाटून, आपला गळा खाजवून ' खा—खा ' करून आपल्याला विनविणाऱ्या रामजीकडे आपल्या निस्तेज परंतु दुःखित नेत्रांनीं पाहिलें. तिच्या त्या दोनही डोळयांत एकेक अश्रुबिंदू दिसला. एकदां तिनें त्याचाही हात चाटला. त्याच्या तोंडाकडे फार फार केविलवाणें पाहिलें. आपल्या-कडून होईल तितक्या मोठ्यानें एक हंबरडा फोडून शेवटीं वर मान केली आणि एकदम जीभ बाहेर काढून रामजीच्या अंगावर मान आणि जमिनीवर शरीर धाडकन् टाकलें. पोरानें घरांत जाऊन ती बातमी सांगितली. अर्थातच बाकीचीं मुलें गोळा झालीं; आणि घरां

तील एक मोठें करतेंसवरतें माणूस गेल्याप्रमाणें सगळें घरदार रडूं लागलें. वर सांगितलेंच आहे कीं, रामजीलासुद्धां अश्रु आंवरेनात. हा प्रसंग झाला, ते दिवसापासून त्याची चित्तवृत्ति मोठी चमत्कारिक झाली. आतां आपलीं गुरें आपल्या देखत मेलेलीं तरी पहावीं लागणार, नाहीं तर तीं कोणाला देऊन टाकावीं लागणार, त्याखेरीज दुसरा मार्ग नाहीं, हें त्याचें त्यालाच दिसून आलें. कोणाला तरी देऊन टाकावीं म्हणून गांवच्या पाटिलकुळकर्ण्याला, इनामदाराला, सावकाराला, सगळ्यांना विचारलें. पण कोणी घेईना. कोण घेतो ? ज्याला त्याला आपआपलीं गुरें होतींच. त्यांची स्थिति कशी होणार याचीच ज्याला त्याला विवंचना. एक दोघांनीं तर त्याची थट्टाच केली कीं, ‘ आतां तुझा दिमाख कुठें गेला ? ’ एकदोघांनीं त्याला ‘ अशीं कोणाला देऊन टाकण्यापेक्षां खाटकाला कां नाहीं विकीत ? चार रुपये तरी येतील ’ असें म्हटलें. त्याला अतिशय वाईट वाटलें. आणि ‘ काय होईल तें होईल, घरींच बांधून ठेवूं’ असें म्हणून तो माघारी आला व आपल्या गोठ्यांत त्यांना बांधून तेथेंच स्वस्थ पडला. बायकोच्या समोर जाण्याचा त्याला धीर होईना. आणखी दोन दिवस गेले. तेव्हां गुरांची विवंचना थोडी मागें पडून पोरांची, आपली व बायकोची विवंचना सुरू झाली. आणि आतां कांहीं पेठेच्या बाजाराला गुरें नेऊन विकण्याखेरीज दुसरा मार्ग नाहींच असें त्याच्या मनांत येऊं लागलें. गांवांत तर कोणी फुकट घेईना आणि आतां फुकट देण्याची कल्पनाही त्याच्या मनांत येईना. जें इतरांनीं केलें तेंच आपण केलें पाहिजे; नाहीं तर आतां मुलेंबाळें जगण्याला मार्ग नाहीं. आपल्या स्वतःच्या पोटाची त्याला पंचाईत काय ? तो स्वतः कुठेंही जाऊन पोट भरील; पण बायकापोरांची वाट काय ? त्यांना खायला घालण्याइतकी मोलमजुरी कुठें मिळणार ? काय करणार ? चार दिवस पुरे इतकेंसुद्धां धान्य आतां घरांत नव्हतें. आजपर्यंत तें मुलांच्या तोंडीं पडण्यासाठीं दोघां नवराबायकोनीं आपल्या पोटाला चिमटा घेऊन चालविलें; पण आतां

धडगत नाहीं, गुरें आपल्याला पोसवणार नाहींत, त्यांचे आपल्या घरीं हाल होतील, असें मनांत येतांच तीं फुकट देऊन टाकण्याचा त्याचा विचार झाला होता; पण आतां त्याच गुरांवर कांहीं पैसा आल्यास पाहावा असा विचार-अत्यंत दुःखप्रद विचार त्याच्या मनांत येऊं लागला. त्यानें अनेक वेळां तो आपल्या मनांत न येण्यासाठीं खटपट केली, पण व्यर्थ. आपल्या मुलांकडे व बायकोकडे लक्ष गेलें, त्यांतून अंगावरलें मूल दुधाकरितां तिला कसें तोडतोडून घेई हें त्याच्या नजरेस पडलें म्हणजे त्याच्या मनांत तो विचार आल्याखेरीज रहातच नसे. शेवटीं एके रात्रीं त्यानें आपला विचार आपल्या बायकोजवळ काढला. त्याबरोबर ती त्याला फडाफडा बोलली आणि आपल्या चार मुलांना विकण्याची गोष्ट नवऱ्यानें काढल्याप्रमाणें तिला दुःख होऊन ती रडत बसली. तिच्या स्वतःच्या मुलांपेक्षां त्या गुरांवर तिचें प्रेम अधिक होतें म्हटलें तरी चालेल. तिनें अगदींच धुडकावून लावलें तेव्हां एक दोन दिवस अर्थात्च तो विचार मागें टाकावा लागला; पण तो किती दिवस मागें टाकणार ? प्रत्येक घटका लोटे ती असें दाखवी की, आतां दुसरें गत्यंतर नाहीं. बैल अधिकअधिक रोडावत चालले. त्या गाईच्या अवस्थेप्रमाणेंच त्यांची अवस्था झाली तर मग काय उपयोग ? असा विचार वारंवार त्याच्या मनांत येऊं लागला आणि पुनः त्यानें आपल्या बायकोजवळ गोष्ट काढली. दोन दिवसांत तिलाही ती आवश्यकता दिसूं लागली. डेऱ्यांतील बाजरी आतां अगदीं तळाला गेली, धान्य झाडून झाडून घेतल्यास जेमतेम दोन किंवा तीन दिवस आपल्याला अगदीं अर्धपोटीं आणि मुलांना बेताबातानें राहतां येईल असें स्पष्ट दिसलें; तथापि तिचें मन तयार होईना. ती तीनतीनदां गोठ्यांत जाई, पुनः आपल्या खोपटांत येई, व पुनः गोठ्यांत जाई, इकडे तिकडे जाई, आणि कुठें एकाद्या झाडाचा पाला ओरबडून आणून त्या बैलांना चारी ! जणूं काय त्यांना तेवढा पाला चारला म्हणजे आतां त्यांना विकण्याची जरूरी तेवढीच दूर झाली !

अशा तऱ्हेनें आणखी एक दिवस तळमळ झाल्यानंतर शेवटीं पुनः रामजीनें गोष्ट काढतांच तिनें आपली अनुमति दिली, पण खाटकाच्या हातीं जाणार नाहीं अशाबद्दल खबरदारी घेऊन मगच विकावीं म्हणून मोठी थोरली अट घातली. ही गोष्ट रात्रीं घडली, आणि उद्यां गुरें शेजारच्या बाजारच्या गांवीं नेऊन विकायचीं असा बेत ठरला; पण नवराबायकोला त्या रात्रीं बिलकूल झोंप नाहीं. एकदां अगदीं कायमचा असा बेत करावा आणि घटकाभरानें दोघांपैकीं कोणी तरी एकानें त्यांत कांहीं तरी अडचण काढून तो बेत ढांसळून पाडावा असें चाललें होतें. तीं गुरें खाटकाच्या हातीं जातील, त्यापेक्षां आपल्या घरीं मेलेलीं बरीं असें जयाबाईचें म्हणणें पडे. आणि मी तीं खाटकाच्या हातीं जाऊं देणार नाहीं, असें रामजी तिला आश्वासन देई; पण पुनः त्याची त्यालाच शंका येई कीं, आपण म्हणतों हें शक्य आहे कसें ? आपण जरी खाटकाला विकलीं नाहींत तरी, तीं पुढें खाटकाकडे कशावरून जाणार नाहींत ? असे अनेक प्रकारचे तर्ककुतर्क परस्परांच्या मनांत येऊन परस्परांचें मधून मधून भांडण होऊन ती रात्र उजागऱ्यांतच गेली.

सकाळीं गुरें सोडून नेण्याची प्रत्यक्ष वेळ येतांच जयाबाईची तर नुसती गडबड उडाली. मुलें, अद्यापि निजलींच होतीं. तीं उठण्याच्या पूर्वीं गुरांना घेऊन जावें, असा रामजीचा बेत. कारण त्या मुलांचाही जीव त्या गुरांवर फार. तीं सोडून विकायला नेतांना त्यांनीं पाहिलें म्हणजे बाकीच्या चौघांना जरी कांहीं कळलें नाहीं, तरी दोघां मोठ्या मुलांना तें कळून तीं एकच आकांत करतील अशी त्याला भीति होती. पण त्या भीतीपेक्षां अधिक भीति उत्पन्न करणारें असलें वर्तन या वेळीं त्याच्या बायकोनें करण्याचा घाट घातला. आपल्या पोटच्या गोळ्यांपैकीं एखादा गोळा ओढून नेण्याला कोणी उभा राहिला असतां जसें आईनें वर्तन करावें, तसें तिनें चालविलें. प्रथम ती आरडली ओरडली नाहीं. "मी नाहीं नेऊं द्यायची माझ्या ढवळ्यागवळ्याला !"

असें म्हणून त्याच्यापुढें तिनें अंग टाकलें. तिची समजूत कोणच्या शब्दांनीं करावी, आणखी काय बोलावें हें त्या बिचाऱ्या नवऱ्याला मुळींसुद्धां समजेना. त्याचें स्वतःचें दुःख त्याला आवरेना, आणि बायकोच्या दुःखानें तर तें अधिकच दुणावलें. त्यानें हळूहळू एकेका गुराचें दावें सोडलें आणि तें सोडतां सोडतां तो आपल्या बायकोची समजूत करीत होता. हो, ना हो, करितां करितां शेवटीं ती कांहीं तरी स्थिरस्थावर झाली, आणि "शेवटीं जातां जातां मी आपल्या हातानें, कांहीं नाहीं तर नाहीं, पण मूठ मूठ बाजरी तरी चारतें, ती चारूं द्या आणखी मग न्या" असें तिनें फार केविलवाणें आवाजानें म्हटलें. पांच मुठी बाजरी म्हणजे या प्रसंगाला काय आहे हें रामजीला समजलें नाहीं असें नाहीं. पण त्या वेळीं 'तेवढेंहि करूं नको' असें बायकोला म्हणणें म्हणजे केवळ तिच्या अंगावर कुऱ्हाडीचा घाव घालण्यापेक्षांही निर्दयपणाचें होणार हें जाणून तो त्या गुरांना पुढें उभें करून स्तब्ध राहिला. गुरांचे पैसे येतील, त्याचे आपण दाणे आणूं ही त्याला उमेद होती.

जयाबाई आपले डोळे पुशीत पुशीत आंत गेली. दोन दिवसांपुरती सुद्धां बाजरी नव्हती. पण तिकडे बिलकुल लक्ष न देतां तिनें चांगल्या भरगच्च अशा पांच मुठी काढल्या आणि त्या आपल्या ओच्यांत घालून त्या गुरांकडे आली. आतां अगदीं झुंजूमुंजू दिसूं लागलें होतें. रात्रींपासून तिनें आकांत केल्यामुळें तिची चर्या किती तरी विलक्षण झाली होती. तिच्या डोळ्यांतून एकसारख्या अश्रुधारा चालल्या होत्या. दुरून तीं उभीं राहिलेलीं गुरें पहातांच ती किंचित् मोठ्यानें स्फुंदूं लागली. आपली ओंजळ भरून तिनें एकएका गुराच्या पुढें करावी, त्यानें थोडेंसें खाल्लें म्हणजे दुसऱ्यापुढें न्यावी. तीं बाजरी खातांना त्या गुरांचा अधीरपणा पाहून तर तिला फारच वाईट वाटलें. बाजरी संपतांच तिनें एका बैलाच्या गळ्यांत मिठी मारली आणि "पिऱ्या! रे पिऱ्या!

तुझे ढवळ्यागवळ्या चालले रे !" असें म्हणून केवढ्या मोठ्यानें तरी गळा काढला !

आतां मात्र धडगत नाहीं. आतां आपण जितक्या लवकर येथून पाय काढावा तेवढा जरूर, असें वाटून रामजीनें जयाबाईला त्या बैलां-पासून सोडविलें. 'अहो कां असा निर्दयपणा करतां ? कां तुम्हांला घरचीं गुरं बघवनात ? आपल्या पोटासाठीं खाटकाला वोपणार ? मी नाहीं जाऊं द्यायची ! मला वोपा. माझ्या पोरांना इका पण......' त्या बाईच्यानें एक शब्द अक्षरसुद्धां उच्चारवेना. तिला कढावर कढ येऊं लागले. इतक्यांत तिचा तो आर्तस्वर ऐकून दोन तीन मुलें उठून बाहेर आलीं; त्यांना पाहतांच बाईच्या आकांतास अगदींच पारावार नाहींसा झाला; आणि तो पाहून तीं मुलें त्या बैलाच्या गळ्याला मिठ्या मारूं लागलीं. रामजीनें आपल्याकडून अगदीं होईल तितकें कठोर मन केलें, पण त्याच्याही डोळ्यांत अश्रू उभे राहिलेच. इतकें आहे, तर नयेच गुरें आज विकूं असें त्याच्या मनांत आलें; पण उपयोग काय ? त्यांना घाला काय ? आपण खा काय ? या प्रश्नांनीं त्याला गत्यंतर ठेवलें नाहीं. तो मवाळपणें बायकांमुलांशीं बोलला, बायकोची त्यानें समजूत घातली, आणि मोठ्या मिनतवारीनें त्यानें तीं अत्यंत केविलवाणीं दिसणारीं गुरें आपल्या घराबाहेर काढलीं. मग वळूनसुद्धां न पहातां त्यानें रस्ता सुधारला. त्यानें मागें पाहिलें नाहीं. पण गुरांनीं—आपल्या अश्रुपूर्ण डोळ्यांनीं कितीदां तरी पाहिलें असेल. जणूं काय आतां घराची आणि त्या माणसांची ही आपली शेवटची दृष्टादृष्ट असें त्यांसही कळून चुकलें होतें ! त्यांचीं पावलें जितकीं जड-पणानें पडत होतीं त्यांच्याहीपेक्षां रामजीबाचें जड अंतःकरण किती तरी अधिक जड झालें होतें. तो चालला होता हें त्याचें त्यालाच ठाऊक. त्याला त्याच्या शेताच्या बाजूनें जावें लागलें त्यांत मोठ्या आशेनें पेरलेल्या, परंतु पाऊस नसल्याकारणानें खुरटलेल्या, जळून खाक झालेल्या आणि यांतच कांहीं उगवलें होतें तें गांवच्या गुरांनीं

खाऊन टाकल्याकारणानें नासधूस झालेल्या शेताकडे पाहून त्यानें दीर्घ उसासा टाकला. आणि काय ही आपली स्थिति ? आतां पुढें होणार कसें ? असे अनेक विचार मनांत येऊन त्या आपल्या नंबराकडे पहात अश्रू गाळीत तो आपल्या गुरांना हांकून घेऊन चालला. न जाणों कदाचित् त्याला आपल्या भरभराटीच्या दिवसाच्या कित्येक आठवणी झाल्या असतील ! बिचारा मान खालीं घालून चालला होता. पूर्वीप्रमाणें त्या बैलांनीं साऱ्या दिवसभर केल्या कष्टांचा परिहार करण्यासाठीं या वेळीं गाणें म्हणण्याची त्याच्या मनाची स्थिति नव्हती आणि तसें गाणें ऐकून झाल्या कष्टांचा परिहार करण्याजोगे त्यांचे सध्यांचे कष्टही नव्हते. तो निमूटपणें चालला होता. वाटेंत त्याच्याच स्थितींत असलेले आणखीही कित्येक शेतकरी चालले होते, परंतु त्यांच्याशीं बोलण्याचीसुद्धां त्याला लाज वाटूं लागली. ज्या गोष्टीकरितां आपण इतरांना हंसलों; ती गोष्ट करण्याचें आपल्या नशिबीं आलें, याचें त्याला राहून राहून वाईट वाटे. तो सरळ गेला तो पेठेंत गेला. आपल्या नशिबीं पांचपंचवीस रुपये तरी येतील असें त्याला पक्कें वाटत होतें; पण बाजारांत पाहतो तों सगसरी पांचशें गुरूं आणि पांच पांच चार चार रुपयाला एक एक गुरूं जाण्याचें त्याचें स्वप्न संपून, पांच पांच गुरें मिळून एक एक रुपया सुद्धां मिळण्याची मारामार जेव्हां त्यानें पाहिली, तेव्हां त्याच्या मनाची काय बरें स्थिति झाली असेल ? त्याच्या मनाला जबरदस्त धक्का बसला. हा भयंकर प्रकार आहे तरी काय ? दोन तीन आण्यांला आपल्या ढवळ्यागवळ्यासारखे बैल ! आपण स्वप्नांत तर नाहींना ! स्वप्नांत खचित नाहीं. आहे हें सर्व अगदीं खरेंच आहे, असें मनांत पक्कें बिंबण्याला त्याला किती-किती तरी वेळ लागला ! इतक्या थोड्या किंमतीला आपलीं गुरें नाहीं विकावयाचीं असा त्यानें एकदां निश्चय केला. पण नाहीं विकावयाचीं तर करावयाचें काय ? चार कोस त्यांना तांगडीत परत नेणें—आणि तेंही त्यांना कांहींसुद्धां खायला न घालतां म्हणजे केवळ अशक्य. तीं वाटेंतच मरणार. घरापर्यंत

एक सुद्धां तगणार नाहीं. तेव्हां विकावींच असा विचार कायम करण्याला त्याला एक प्रहर लागला. दुसरा कांहीं विचार करणें शक्यच नव्हतें. काय करणार ? दुसरा विचार तो करणार कोणचा ? विकायचीं—सगळ्यांचा मिळून एक रुपया आला तरी विकायचीं.

वाचकहो, या शब्दांचा अर्थ तुमच्या लक्षांत पूर्णपणें कधीं तरी येणें शक्य आहे काय ? शेतकऱ्यानें आपल्या मुलांपेक्षांही जास्त प्रेमानें व काळजीनें वाढविलेलीं गुरें एक रुपयाला पांचाप्रमाणें विकण्याची पाळी त्याजवर येणें आणि तीं विकण्यास त्यानें तयार होणें म्हणजे देशाची केवढी दुर्दशा आहे ? याची शहरांत राहणाऱ्या तुम्हांला कल्पना तरी कधीं होते काय ? रामजीला मुळींच बोलवेना. एक बोवा पुष्कळशीं गुरें घेत होता, त्याच्यापुढें तो आपलीं गुरें घेऊन गेला. जें त्याच्या जिभेनें त्याला बोलवेना तें त्यानें डोळ्यानें समजावण्याचा यत्न केला. पण तो उद्मी त्याच्या अंगावर ओरडून म्हणतो, " अरे, हीं मढीं कशाला माझ्यापुढें आणलींस ? चल—चल. घरांतल्या घरांत तूंन् तुझी अव्वा मिळून फाडून खा—जा. " हे कठोर शब्द त्याच्या मनाला अत्यंत—अत्यंत लागले आणि त्याला संताप आला. मग तो काय करणार ! तो मुकाट्यानें आपलीं गुरें माघारीं वळवूं लागला. तेव्हां तो उद्मी मोठ्यानें हंसून म्हणतो, " बरें, आतां आणलीं आहेस तर आण. घे पांची गुरांचे चार आणे, आहे काय त्यांत ! कातडंसुद्धां सोलून काढलं तर धड निघायचं नाहीं. " रामजी एक शब्दसुद्धां बोलला नाहीं. त्याच्या मनाला तो प्रकार पाहून इतका धक्का बसला कीं, कांहीं वर्णन करून सांगणें शक्य नाहीं. हा गुरें घेणारा खाटिक आहे हें त्यानें तेव्हांच ताडलें. त्यानें आपलीं गुरें वळवलींच. त्या उद्म्यानें चार आण्यांचे सहा, सहांचे आठ, आठांचे दहा—बारापर्यंत केले. शेवटीं रुपया केला, त्याला आतां आपलीं गुरें विकायचीं नाहींत असा त्यानें निश्चय केला आणि तेथून पुढें नेलींच. पण तो उद्मी सोडीना. त्यानें त्याच्या हातांत बळेंच रुपाया दिला

आणि गुरें माघारीं वळविलीं. रामजी संतापला व मारायला उठला. शेवटीं लोक मध्यें पडून तें खटलें तोडलें. आतां काय करावें? गुरांचें करावें काय? त्यांची वाट काय लावावी? त्याला कांहीं समजेना! तो सचिंत झाला, विकण्याशिवाय कांहीं मार्गच नव्हता. दुसरें एखादें गिऱ्हाईक येईल म्हणून तो उभा राहिला, तों दुसऱ्या एकानें सव्वा रुपया दिला. त्याचा ढवळ्या त्याचा गवळ्या, त्याचा लाल्यापाल्या चट्र सारे चार चार आण्यावारी विकावे लागले. पण त्याला एवढेंच वाटलें कीं, आपण खाटकाला आपलीं गुरें विकलीं नाहींत. ज्याला त्यानें विकलीं, त्याला विचारलें 'तूं खाटीक नाहींसना, पुढें खाटकाला विकणार नाहींसना?' त्यानें अगदीं त्याच्या गुरांची शपथ घेऊन सांगितलें कीं, आपण खाटीक नाहीं आणि खाटकाला विकणार नाहीं. मग आणखी काय पाहिजे! खाटकाला न विकण्या-विषयींचा त्याचा स्वतःचा निश्चय. आणखी त्यांत जयाबाईचेंही निक्षून सांगणें. सव्वा रुपया हातीं पडतांच त्यानें त्या गुरांच्या पाठी-वरून एकदां हात फिरविला. ढवळ्यागवळ्याच्या माना वर करून आपल्या खांद्यावर ठेवल्या. आणि त्यांना चुचकारून थोपटून त्यानें अत्यंत दुःखानें त्यांचा निरोप घेतला. हातांतला सव्वा रुपया त्याला मोठासा समाधानकारक वाटला नाहीं. त्यानें रुपयाकडे पाहिलें आणि त्याच्या अंगावर शहारे आले. आतां या पैशाचे दाणे घ्यायचे असें मनांत येतांच तर त्याची इतकी विलक्षण स्थिति झाली कीं, कांहीं पुसूं नये. ज्या गुरांच्या जिवावर आज आपण इतके दिवस आनंद केला, त्यांना आज विकून त्या पैशाची बाजरी घेऊन जायची हा नुसता विचार त्याला भयंकर वाटला. त्याला बायकोनें आज दुपारीं खाण्यासाठीं म्हणून भाकरी दिली होती तर तीसुद्धां खाववेना. त्यानें एकदां खाण्याचा यत्न केला, पण तोंडांतल्यातोंडांत घांस फिरूं लागला. शेवटीं तशीच ती त्यानें फडक्यांत बांधली. आपल्याला नाहीं, तरी पोरांना खायला पाहिजे. चार आण्यांचें सव्वाशेर धान्य विकत

घेतलें. रुपया तसाच ठेवला, आणि तो निघाला. आतां त्याचें मन थोडेंसें स्वस्थ झाल्यासारखें दिसलें. तेथून जाण्यापूर्वी आपण आपल्या बैलांचें शेवटचें दर्शन घेऊं असें मनांत येऊन त्यानें इकडे तिकडे पाहिलें, पण तो खरीददार कोठें दिसेना. आणि तो त्या पहिल्या थोरल्या खाटीक उदम्यानें जमविलेला तांडाही तेथून गेला. त्याला आपल्या बैलांची शेवटली दृष्टादृष्ट झाली नाहीं याबद्दल किती तरी वाईट वाटलें, पण काय करणार ?

तो आपल्या पाठीवर ती सव्वाशेर बाजरीची मोटली बांधून मनांत कष्टी होऊन चालला. थोडासा पुढें जातो तों त्यानें तो भला थोरला गुरांचा तांडाच तांडा पाहिला. त्यांत कांहीं आपलीं गुरें नाहींत असें त्याला पक्कें वाटत होतें. पण काय चमत्कार ! तो उसासे टाकीत त्या तांड्याच्या बाजूनें चालला असतां एका गुरानें आपलें डोकें त्याच्या अंगाशीं घासलें, तो वळून पाहतो तों त्याचाच बैल लाल्या ! तें पाहतांच त्याच्या मनाची स्थिति काय बरें झाली असेल ? आपण आपल्या मतानें दुसऱ्याला विकलेले बैल, शेवटीं खाटकाच्या हातीं गेले अं ? आपल्यापासून विकत घेऊन त्या खाटकाला तीं गुरें देणाऱ्या इसमालाही त्यानें शिवीगाळ सुरू केली. पण त्याचा उपयोग एवढाच झाला कीं, मारामारीला सुरुवात होऊन त्या दंगामस्तींत त्याची बिचाऱ्याची बाजरीची मोटली सुटली आणि बाजरी सगळी सांडली. ती त्या बुभुक्षित गुरांनीं तावडतोब खाल्ली आणि पदरांत थोडासा चोप मात्र पडून त्यास वाट धरावी लागली !

अशी एकंदर स्थिति होऊन तो या गोष्टीच्या प्रारंभींच सांगितल्याप्रमाणें अतोनात कष्टी मनानें घरीं आला. एखादें घरचें माणूस मरावें आणि त्यास स्मशानांत पोंचवून परत येतांना मनाची स्थिति होते, तशीच त्याच्या मनाची स्थिति झाली होती. आतां बायकोला सांगावें काय ? गुरें विकलीं तर विकलीं, तींही खाटकाच्या हातांत गेलीं, चार आण्याचें धान्य वायां गेलें आणि शेवटीं एक रुपाया गुरांचा जीव

विकून रक्त विकून मिळविलेला रुपया घेऊन परत आलों. आतां आपली बायको म्हणेल काय ? आणि आपण तिला म्हणावें काय ? ढवळ्यागवळ्या शेवटीं खाटकांच्याच हातीं गेले हें सांगावें कोणच्या तोंडानें ? त्याला कांहीं सुचेना ! जों जों घर जवळ येत चाललें, तों तों त्याचीं पावलें फार जड होत चाललीं ! एक पाऊल उचलून दुसऱ्याच्या पुढें ठेवण्याला त्याला कष्ट पडूं लागले. आपणही त्या गुरांच्या बरोबर कोणीकडे गेलों असतों तर फार चांगलें झालें असतें असें त्याला कितीदां तरी वाटलें. अगदीं जवळ येतांच त्यानें बायकोचें स्फुंदणें अजून चाललें आहे असें ऐकिलें. तेव्हां तर त्याचें पाऊल घरांत पडेचना. तो घराच्या भोंवतीं हिंडूं लागला. तो अगदीं सुनका झालेला गोठा पाहून तर त्याच्या अंगावर अगदीं शहारे उभे रहात. मध्येंच त्याला असा भास होई कीं, ती आपली सोमी गाय त्या गोठ्याच्या अंधाऱ्या कोपऱ्यांतून आपल्या मृत्युकाळीं विलक्षण दिसूं लागलेल्या नेत्रांनीं आपल्याकडे पहात असून माझ्या लाल्याचें काय केलें ? म्हणून विचारीत आहे. तो लाल्या तिचाच पाडा होता. हा विचार मनांत उभा रहातांच त्याच्यानें त्या गोठ्याकडे पहावेना ! एखाद्यानें पैशाच्या लालचीनें एखाद्या गरीब माणसाचा खून करावा आणि मग कृतकर्माचा त्यास पश्चात्ताप व्हावा, त्याप्रमाणें त्याची अवस्था झाली. आपण आपल्या पोराबाळांच्या पोटाची खळगी चार दिवस भरण्यासाठीं आपलीं गुरें खाटकाला नेऊन विकलीं हें फार वाईट कृत्य झालें. यापेक्षां त्यांच्या गळ्याशीं गळा बांधून घेऊन सर्वच एकदम मेलों असतों तर हरकत नव्हती, असे विचार त्याच्या मनांत येऊं लागले. त्याचें त्याच्या गुरांढोरांवर फार-फार प्रेम, पण काय करणार ? नुसत्या प्रेमानें काय होणार होतें ? त्यानें जें काय केलें तें केवळ नाइलाजास्तव. तरी पण अखेरीस इतक्या परिणामावर गोष्टी जाव्या, आपलीं गुरें आपल्या डोळ्यांदेखत आपल्या हातांनीं खाटकाच्या सुऱ्याच्या तडाख्यांत जावींत ! छे ! सगळ्यांत जें काय भयंकर वाटत होतें तें हेंच !

## २५. गुराख्याचें गाणें

कुरणावरती वडाखालती गाई वळत बैसतों ! मजेनें गाई०
स्फटिकापरि निर्मळ हा खळखळ झरा जवळ वाहतो ॥ ध्रु० ॥

पांवा फुंकुनि मंजुळ नादें रान भरुनि टाकतों । हिरवें रान०
आनंदानें डोळे भरतां प्रभुजीला प्रार्थितों ।
गाईमागें रानोरानीं शीळ भरत हिंडतों । कधिंकधिं शीळ०
दऱ्याखोऱ्या राइ ओहळावरी मौज मारितों
उन्हाची भीति कवणाला ?
पाउस काय करिल तो मजला ?
भीतों कोठें मी थंडीला ?
श्रीमंतापरि गरिबा कोठें वाग तो दुखवितो । गरिबा वारा नच दुखवितो
देवाजीवरि सदा हवाला टाकुनि मी राहतों ॥ १ ॥

तृषा लागतां नीर झऱ्याचें ओंजळिनें मी पितों । निर्मळ ओंजळिनें०
क्षुधा लागतां कांदाभाकर यथेच्छ मी जेवतों !
फिरतां फिरतां करवंदेंही तोडुनि मी भक्षितों । रानीं तोडुनि०
काठीनें मी कांटे दाबुनि बोरेंही तोडितों !
धनिका ताट रुप्याचें जरी,
पांचही पक्कानें त्यावरी,
नाहीं गोडि मुखाला परी,
गाईसंगें हिंडूनि रानीं थकुनि सुखें जेवितों । रानीं थकुनि सुखें जेवितों
जाडें भरडें खाउनि धनिकाहूनि अधिक तोषतों ! ॥ २ ॥

पुच्छ उभारुनि थवा गाईंचा ज्यावेळीं नाचतो । मजेनें ज्यावेळिं०
मोरमुगुटबन्सीवाल्यापरि मौज उभा पाहतों !
ओहळावरती थवा तयांचा पाणी जेव्हां पितो । निर्मळ पाणी०
उभा राहुनी प्रेमें त्यांना शीळ अहा घालतों !
कशाला मंदिल मज भरजरी ?
घोंगडी आवडे काळी शिरीं
दंड करिं गाइ राखण्या परी
कुवासना घालिति धिंगा तो महाल मी टाकितों । नृपाचा महाल मी टाकितों
गाईसंगें हवेंत ताज्या नित्यचि मी राहतों ॥ ३ ॥

क्रोध, काम, मद, मत्सर यांहीं गांव सदा गर्जतो । भांडणें गांव०
दूर टाकुनी त्यास शांतिनें सुखें दिवस लोटितों ।
समाधान हा परिस अहा मज रानांतचि लाभतो । अहा मज०
दुःखाच्या लोहास लावितां सुख-सोनें बनवितो ।
चढल्या पडावयाची भीति,
गरिबा अहंकृती काय ती ?
काय करि त्याचें खोटी स्तुती ?
परवशतेच्या बिड्या रुप्याच्या पायांत न बांधितों । मृदुल जरि पायांत०
निजहृदयाचा धनी धरणिचें धनित्व अवमानितों ॥ ४ ॥

## २६. प्रवास

कोऽतिभारः समर्थानां ? किं दूरं व्यवसायिनाम् ?
को विदेशः सविद्यानां ? कः परः प्रियवादिनाम् ?

सांप्रत या पृथ्वीवर मानवजातीस जें एवढें वैभव प्राप्त झालें आहे, तें प्रवासाच्या योगानें झालें आहे असें म्हणण्यास कांहीं हरकत नाहीं. जर प्रत्येक राष्ट्र आप-आपली सीमा न उल्लंघितां आपल्याच ठायीं स्वस्थ बसतें, व दुसऱ्यास आपल्या मुलखांत येऊं न देतें, तर जगाच्या आद्य स्थितींत आणि सांप्रतच्या स्थितींत फारसा फेर पडता ना. प्रायः सर्व राष्ट्रांची मूळचीं समजूत अशीच असे कीं, जें काय आपलें आहे तें आपणांसच असावें, त्यांत परका मनुष्य भागीदार नसावा. हाच हतु मनांत धरून स्पार्टन लोकांचा लैकर्गस म्हणून राज्यव्यवस्थापक होऊन गेला त्यानें तद्देशीय लोकांस परस्थ लोकांशीं व्यापार करण्याची अगदीं बंदी करून टाकिली होती, व तोच प्रकार अजूनपर्यंतही पुष्कळ अंशीं चीन, जपान वगैरे राज्यांत दृष्टीस पडतो. पण हे मनुष्यानें केलेले अटकाव कोठपर्यंत चालणार ? अर्वाचीन तत्त्वज्ञानी लोकांनी असा सिद्धांत केला आहे कीं, जगाच्या रहाटीचा एकंदर रोख सुधारणुकीकडे आहे; त्या रोखाप्रमाणें इतके दिवसपर्यंत सर्व राष्ट्रांत जे जे कोणी प्रतिबंध करून ठेविले ते ते एकामागून एक सर्व मोडत जाऊन, हल्लीं तर त्यांचा प्रायः लयच झाल्यासारखा झाला आहे. असा या प्रतिबंधांचा लय होण्यास अनेक गोष्टी कारणीभूत होतात. त्यांतील मुख्य अशा पाहूं गेलें असतां जिज्ञासा व लोभ या दोन होत. सर्व लोक आपआपल्या मुलुखांत ज्या ज्या गोष्टी पहातात तेवढ्यांनींच त्यांची तृप्तता न होऊन, इतर राष्ट्रांत काय चाललें आहे, तेथील लोक कसे काय आहेत, वगैरे पहाण्याची साहजिक जिज्ञासा त्यांच्या मनांत उत्पन्न होते. मग ती जिज्ञासा तृप्त करण्याकरितां ते लोक परराष्ट्रांत जातात. हें एक झालें. दुसरें असें कीं, कोणी प्रतापशाली राजा आपल्या देशावर

सार्वभौमत्व पावून इतर देशही आपल्या सत्तेखालीं आणावे अशी महत्त्वाकांक्षा मनांत धरतो व इतर राष्ट्रांशीं बळेंच वैर साधून त्यांजवर स्वाऱ्या करतो. या दोहों कारणांच्या विशेषतः दुसऱ्याच कारणाच्या-योगानें, जे देश एकमेकांपासून हजारों कोसांच्या अंतरावर असतात व ज्या देशांचें दळणवळण होण्याची कांहीं कालापूर्वी कोणाच्या मनांत कल्पनाही आली नसेल, त्यांचा परस्पर निकट संबंध होऊन राहिला आहे.

प्रवासास आवश्यक गोष्ट म्हटली म्हणजे धारिष्ट होय. ज्या लोकांस धारिष्ट नाहीं, ज्यांचे विचार आपलें कुटुंब व आपला देश यांहूनें पलीकडे कधीं धजावंतच नाहींत, त्यांच्या मनांत इतर देशीं प्रवास करण्याची बुद्धि येईल कोठून ? जगाच्या इतिहासांत पाहिलें असतां असें आढळतें कीं, ज्या लोकांत धारिष्ट विशेष तेच संपत्तिमान् व ज्ञानसंपन्न असे झाले. इसवी सनाच्या पूर्वीं सुमारें हजार वर्षांमागें एशियामैनर देशांत फिनिशियन म्हणून मोठे धारिष्टवान् लोक होते. त्या लोकांनीं त्यावेळेस जेवढा जगाचा भाग माहीत होता, तेवढ्याशीं व्यापार ठेविला होता. त्या वेळेस नाविककला फार अपूर्ण दशेंत असतांही, ते लोक, सर्व भूमध्यसमुद्र धुंडाळून, ज्या अटलांटिक महासागरास त्या वेळेस लोक पृथ्वीची सीमा समजून त्यांत फार लांबपर्यंत जाण्यास भीत असत, त्या महासागरांत देखील संचार करूं लागले. त्यांनीं ब्रिटिश बेटें—जीं त्या वेळच्या लोकांस फारशीं ठाऊक देखील नव्हतीं—व आफ्रिकेच्या पश्चिम किनाऱ्यावरचीं बेटें, यांशीं बराच व्यापार चालविला होता. सारांश, ते लोक धारिष्टवान् असल्यामुळें त्या वेळीं सर्व राष्ट्र धनाढ्य व विद्यासंपन्न म्हणून गाजत होतें. त्यांनींच कार्थेज, टायर इत्यादि नामांकित शहरें वसविलीं. त्यांच्या मागें कार्थेजच्या लोकांनींही त्यांचा धारिष्टाचा कित्ता बराच उचलला होता. पण पुढें ते लोक राज्याचे चुरशीस लागल्यामुळें त्यांचें पहिलें तेज कमी होऊन शेवटीं त्यांचा अगदीं मोड झाला. त्याहीपुढें जीं ग्रीसचीं

अनेक संस्थानें एकामागून एक अशीं वैभवास चढलीं व पुढें रोमन लोकांचें सर्व जगावर जें स्वामित्व झालें, त्या सर्वांचें बीज तरी धारिष्ट होय.

साहस, उद्योग वगैरे गुणांचा जसजसा लोकांत ऱ्हास होऊं लागतो तसतशी त्या लोकांची बुडती कळा आलीशी समजावी. इंग्रज लोकांच्या उत्कर्षास हेच गुण मुख्यतः कारण झाले आहेत. सन १४९२ या वर्षीं कोलंबसानें मोठ्या अडचणी सोसून अमेरिकाखंडाचा शोध लावला. तेव्हांपासून युरोपामध्यें साहसाचा आवेश सर्व लोकांचे मनांत भरला. पुढें लौकरच पोर्तुगीज लोकांनीं हिंदुस्थानशीं व्यापार करण्यास व तेथील मुलूख काबीज करण्यास आरंभ केला. त्यांच्या मागोमागच डच, इंग्रज, फ्रेंच वगैरे लोकही आले. पुढें इंग्रज लोकांस एथचें सार्वभौमत्व प्राप्त झालें. याप्रमाणें युरोपांतील लोकांचा उत्कर्ष, त्यांचें प्रवास करण्याचें जें साहस, त्यामुळें झाला; व अजूनही किती होईल हें सांगवत नाहीं. कां कीं, त्यांचे नवे नवे शोध प्रतिवर्षीं चाललेच आहेत. या वर्षीं कोणी जहाजें घेऊन आर्टिक महासागरांत ध्रुवाजवळचे प्रदेश पहावयास गेला, पुढच्या वर्षीं कोणी मंगोपार्कासारखा धैर्यवान् पुरुष निर्जन व भयाण अशा आफ्रिकेच्या मध्यभागच्या प्रदेशांत गेला, कोणीं नवीं बेटें शोधून काढण्याकरितां अफाट अशा पासिफिक महासागरांत गेला, अशा गोष्टी दरवर्षास प्रत्यक्ष होत आहेत. तेव्हां अशा साहसी पुरुषांचें ठिकाण जें युरोपखंड, तें हल्लीं संपत्तीचें व विद्येचें भांडार झालें आहे यांत नवल काय?

वरील गोष्टी, मोठमोठ्या राष्ट्रांची स्थिति एकंदरींत पाहतां झाल्या; पण नुसत्या मनुष्याविषयीं पाहिलें तरी प्रवासापासून केवढे नफे होतात! सर्वांस अनुभवावरून हें तर ठाऊकच आहे कीं, पुष्कळ फिरलेला मनुष्य प्रवासामुळें मोठा हुशार होतो. त्यानें अनेक प्रकारचे प्रसंग काढलेले असतात, हजारों गोष्टी स्वतः पाहिलेल्या असतात, व तशाच पुष्कळ

ऐकिलेल्याही असतात. यामुळें तो मनुष्य हरएक कामांत वाकबगार होतो. हे तर केवळ व्यावहारिक नफे झाले. पण तत्त्ववेत्ता आहे, किंवा तशा प्रकारची केवळ स्फूर्ति म्हणून ज्याला आहे, सहृदय कवि— कीं ज्यास सृष्टि चमत्कारमय व आनंदमय भासते—त्यास तर देशाटनापासून मोठे अमूल्य लाभ आहेत. प्राचीन ग्रीक लोकांतील मोठमोठे विद्वान् पुष्कळ देश हिंडले होते. त्यांचा पहिला जो इतिहासकार हिराडोटस तो एशियामैनर, मिसरदेश वगैरे मोठमोठे देश हिंडला होता; व त्या योगानें त्यानें जें ज्ञान संपादिलें त्याच्यामुळें तो एवढा विख्यात ग्रंथकार झाला. त्याप्रमाणेंच सोलन, लैकर्गस म्हणून जे राज्यव्यवस्थापक झाले त्यांनीं देखील आपलें ज्ञानाचें कोठार प्रवसांतच सांठविलें. लैकर्गस तर हिंदुस्थानापर्यंत देखील आला होता असें कितीएक इतिहासकार म्हणतात. त्याचप्रमाणें आमच्या हिंदु लोकांतही जे मोठमोठे विद्वान् होऊन गेले तेही फार प्रवास केलेले असावे यांत संशय नाहीं. सर्व कवींचा मुकुटमणि जो कालिदास तोही मोठा प्रवासी होता असें म्हणतात; व या गोष्टीस हें एक मोठें प्रमाण आहे कीं, ज्या वेळीं आतांप्रमाणें नकाशे वगैरे साधनें नव्हतीं, त्या वेळेस त्यानें आपल्या मेघदूत नामक अतिसुंदर काव्यांत मेघास जो मार्ग रामागिरीपासून तों थेट अलकापुरी—म्हणजे हिमालय पर्वताचें कैलास शिखर—तेथपर्यंत सांगितला आहे, तो अगदीं बेचूक आहे. शिवाय ह्या काव्यामधील पर्वतांचें, नद्यांचें वगैरे जें वर्णन दिलें आहे, तें तरी तीं स्थलें कवीनें स्वतः पाहिल्यावांचून इतकें उत्कृष्ट लिहिलें असेल, हें म्हणणें नीट दिसत नाहीं. अर्वाचीन कालांत जर्मनी देशांत एक हंबोल्ट म्हणून महापंडित होऊन गेला. हा वर पृथ्वींतील चारी खंडें हिंडला व ज्या हिमालय पर्वताच्या शिखराची आम्हांस एथल्या एथें देखील पुरी माहिती नाहीं, त्यावर स्वतः जाऊन त्यानें तेथील सृष्टिचमत्कार आपल्या "कॉसमस्" नांवाच्या प्रख्यात ग्रंथांत लिहून ठेवले आहेत. यावरून त्या पंडिताची जिज्ञासा व प्रवासाविषयींचें साहस हीं स्पष्ट दिसून येतात.

हे गुण प्राचीन हिंदु लोकांत मुळींच नव्हते असें जरी म्हणतां येत नाहीं, तरी कालांतरीं त्यांचा लोप झाला हें स्पष्ट. भर्तृहरीनें आपल्या एका शतकांत म्हटलें आहे कीं, "किं सुखम् ? अप्रवासगमनम्" सुख काय ?—तर प्रवासास न जाणें; आणि हाच अर्वाचीन हिंदु लोकांच्या एकंदर मनाचा रोंख दिसतो. यापासून देशाचें किती अहित झालें आहे हें सर्वांस माहीतच आहे. त्यावर विस्तार करावा असें नाहीं. हल्लीं तर प्रवासाचे श्रम म्हटले म्हणजे नाहींतसेच झाल्यासारखे झाले आहेत. तरी प्रवासापासून मनावर होणारे जे सद्विकार ते तरी निदान होण्यास कांहीं प्रतिबंध नाहीं. सध्यां हिंदुस्थानभर व सर्व पृथ्वीवर हवे तिकडे जाण्यास लोखंडी सडका व आगगाड्या झाल्या आहेत. तर अशी प्रवास करण्याची अत्युत्कृष्ट संधि तरी न गमावतां जे आमचे लोक यापासून आपला नफा करून घेऊं पाहतील त्यांस तो पुष्कळ होण्यासारखा आहे.

## २७. काळाच्या दाढेंतून

" आई ! आई ग ! ! " कुठें तरी मी कण्हलों वळूनी बाजूला
मूर्च्छेमधुनी जागा होतां नवल भासलें चित्ताला !

आज काय ही सर्व मंडळी उशाभोंवतीं जमलेली
पाय शेकती, सुंठ चोळती, टकमक बघती भंवतालीं !

अश्रुमलीना खिन्नमुखीं कां कांता पायगतीं बसली ?
काय जहालें मज समजेना, वृत्ती–बुद्धी बावरली !

क्षीण मनाला विचार इतका असह्य होउनि ये ग्लानी
दूर कुणी ते हळुच पुटपुटे ' कॉलराच हा ! ' ये श्रवणीं

दोनच होते शब्द, परंतू सुरुंग उडाला हृदयांत,
भडका झाला, ठिकऱ्या गेल्या विचारासवें गगनांत !

एकामागुनि एक धांवले विचार, हो कल्लोळ मनीं
एका दुसऱ्या मेळ न उरला, तेल ओततो भ्रम मधुनी !

मूर्च्छा भासे जनास पाहुनि चर्मचक्षु ते मिटलेले
अंतःचक्षूंपुढुनी झरझर भूतकालचे पट गेले !

ज्योत दिव्याची विझतां विझतां वाढे दाहि दिशीं दीप्ती
सकल चेतना मरतां मरतां क्षणांत झाल्या तीक्ष्ण किती !

बालपणाचे शिशुलीलेचे प्रसंग मुद्रित झालेले
चमकत, झरझर उकलत, विरुनी पटामागुनी पट गेले !

विकल गात्र परि खळबळ चित्तीं चित्रित होइल कां कवनीं
शब्द बिचारे दुबळे सगळे, किती सांगतिल गावोनी !

* * *

क्षीण किलकिली दृष्टि उचलली, उचलुनि सर्वजण
गार तनूला बाजेवरती ठेविति बहु जपुन !
आंग जहालें गार किती तें त्यावेळीं कळलें
कढत वाटली ओली गादी-इतकें गारठलें !

हल्लक झाली तनू भासली स्वतांलाच हलकी
भिन्न तनूहुनि मीच वाटलें, उचलितसें वरती !

डॉक्टर घाई करूं लागले, पळाचीहि खोटी
सहन न त्यांना, नवल मन्मना गडबड कां इनकी !

' पाणी तापिव-पुरे-उठा ! हें धरा उंच भांडे, '
निर्विकार मी पहात पडलों निरखित चोहिंकडे.

दो नयनांचें केंद्र न जुळलें दोन वस्तु दिसती
नेत्र हलेना, परी मनानें हिंडतसे भंवतीं !

श्वास, उसासे, उशागती मम पायाच्या जवळी
उत्सुक आतुर भयाकुल गमे दृष्टी त्या काळीं !

बघतां बघतां प्रिय नयनाच्या काळया बुबुळानें
वाढत जातां मला वेढिलें श्यामल पटलानें !

* * *

सुई टोंचतां पुरा शुद्धिवर आलों मग दिसले
क्षारसिंधुची बालप्रतिमा शिरेंतुनी चाले !

रक्त गोठलें परि हळू द्रवलें प्रियजनशोकानें !
रुधिराभिसरण सुरूं पूर्ववत कांहीं कालानें !

* * *

बर्फांहुनि ह्या थंड दरींतुनि उचले वर कोण ?
सुखद उष्णतर वायुथरावर ठेवी निजवून.

प्रतिक्षणीं तें अधिकाधिक मज उंच किती नेतें
कानाशीं मधु मंजुल गाणीं कोण तरी गातें ?

डोळे वळवुनि बघतां मजला दाराशीं दिसले
अंधारांतच दोन चमकले डोळे डबडबले !

पर्जन्याचे दिन न उलगले, त्यांतच उन पडलें
अश्रुधुक्यांतुनि हास्यकरांचें दर्शन शुभ गमलें !

* * *

मना वाटलें पुन्हा उतरलों भूवर स्वजनांत
प्रवास इतका केला केवळ सातच तासांत !

मृत्युद्वाराजवळी जाउनि ठोठावित सुटलों
युद्धसिद्धतानिमग्न मृत्यू; परतुनि मी आलों !

* * *

" शर्थ खरोखर डॉक्टर तुमची, हातुनि सुटलेला
काळमुखांतुनि ओढुनि केला जिवंत मेलेला ? "

विचार झाले सुरूं सारखे ' ओढुनि आणी कोण ? '
' काळमुखांतुनि ' किंवा ' सुखमय जीवनस्वप्नांतून ! '

तरंग, सुखमय बुद्बुद सुंदर कां हा खडतर मार्ग
जीवद्वय हे पंथ क्रमिती, कांटे जागोजाग !

मी ' काळाच्या दाढेंतुनि हा निसटुनि आलों जगतीं '
इतर जनासम वदतों परि नच पटतें तें मम चित्तीं !

## २८. कुत्र्याचा पट्टा

"केवढ्याचा रे तो पट्टा ?" दुकानदाराला तिनें किंमत विचारली.

त्यानें दुकानांतील जिन्नस साफ करण्याच्या फडक्याची काठी एका पट्ट्याकडे दाखवून विचारलें, "हा होय ?"

"तो नाहीं,—"

त्यानें दुसऱ्या पट्ट्याकडे काठी नेली.

"अं ऽ हं ! त्याच्यावरचा."

तिला पाहिजे होता त्याकडे दुकानदाराची काठी जातांच ती एक-दम म्हणाली, "काय रे त्याचं ?"

"बारा आणे."

ती किंमत तिला कल्पनेपलीकडे महाग वाटली. तरी पण लटक्या समाधानाकरितां तिनें पुन्हां एकदां विचारलेंच—"किती ?"

"बारा आणे."

बोटें घालून तिनें ती रक्कम मोजावयास सुरवात केली.

मराठी दुसऱ्या इयत्तेंत नुकतीच गेलेली ती एक परकरी मुलगी होती. दिडकी-दोन दिडक्यांपलीकडे तिच्या हातांत कधीं पैसा खेळला नाहीं. शाळेंत तिचे 'पैसे' झाले होते. 'चौसष्ट पैसे सोळा आणे—सोळा आण्यांचा एक रुपया' तिला तोंडपाठ येत होता. पण व्यवहारांतल्या पैशांकडे अजून तिची पाठच होती; म्हणूनच त्या बारा आण्यांच्या रकमेनें तिची छाती अगदीं दडपून गेली.

शाळेंतून जातां येतां तिनें त्या पट्ट्याकडे कित्येक वेळां पाहिलें असेल. तिच्या बरोबरीच्या इतर मुली कधीं 'रासबिरी' च्या कधीं 'लिंबा' च्या तर कधीं 'रबरा' च्या चाक्या, नाहीं तर बोरू, कागद,

रबर, दगडी किंवा शिसी पेन्सिल घ्यावयास त्या दुकानांत जात. केव्हां केव्हां तीहि त्यांच्याबरोबर असावयाची, पण तिचें सारें लक्ष त्या विशिष्ट पट्ट्याकडे लागलेलें असे. तो पट्टा तिला भारीच आवडला होता.

किती तरी वेळां तिनें तो पट्टा पाहिला असेल ! किती तरी वेळां तिनें त्याची किंमत विचारली असेल ! आणि पुढें पुढें किती तरी वेळां दुकानदारानें तिला झिडकारलें असेल ! !

दुकानदार व्यवहारी होता. तिचा फाजील चौकसपणा त्याला आवडत नसे. कधीं देखील तिनें पैशाची त्याच्याजवळून चाकी घेतली नाहीं. कागद, पेन्सिल, टाक, रबर...कसली, कसलीसुद्धां त्याच्याजवळून खरेदी केली नाहीं. त्या सगळ्या जिनसा घरीं तिला आयत्या मिळत होत्या. महिन्याच्या महिन्याला त्या वस्तू तिचे वडील घरीं आणीत असत. तेव्हां पैची खरेदी न करतां त्या पट्ट्याची तिनें नसती किंमत केलेली त्या दुकानदाराला खपत नसे. पण त्यानें झिडकारलें तरी तो पट्टा पहाण्याचा मोह तिला कधीं आवरतां आला नाहीं.

शाळेंत जातां येतां त्या दुकानांतल्या पट्ट्याकडे पाहिल्याशिवाय तिला चैन पडत नसे. आणि तो पट्टाहि तसाच डोळ्यांत भरण्याजोगा होता. त्याचें चामडें चांगलें कमावलेले आणि नरम होतें. त्याला लावलेले चार बारीक चकचकीत घुंगूर मंजूळ नाद करीत. पातळ पत्र्याच्या तारेची नक्षी, आणि ‘ बकला ’ जवळचा चामड्यास गुंफलेला गोफ त्याची शोभा कल्पनेपलीकडे वाढवीत. आणि एका सुंदर पुठ्ठ्याला तो अडकवलेला असल्यामुळें दुरून भारीच मजेदार दिसे. पुठ्ठ्याला वारा लागला कीं त्याची नक्षी चमकावयाची, आणि हळुहळू घुंगूर वाजावयाचे; त्यामुळें तिला मग भारी आनंद व्हावयाचा.

त्या पट्ट्याकडे पहाण्याचा व बरोबर असलेल्या मैत्रिणींना तो दाखविण्याचा तिला आपला एक छंदच लागला.

तो पट्टा आपण घ्यावा अशी तिची पुष्कळ इच्छा होती. पण एवढी बारा आण्यांची रक्कम तिनें कशी उभी करावयाची ?

खाऊसाठीं दुपारीं आई तिला कधींमधीं एखादा पैसा द्यावयाची. पण खाऊच्या पैशाच्या रोजच्या टकळीनें केव्हां केव्हां आईहि तिच्यावर रागवावयाची; आणि ‘रोज रोज कसला आला ग खाऊ ? चल जा, आज नाहीं मिळायचा पैसा......’असें म्हणून कधीं कधीं ती तिला तशीच शाळेंत लावीत असे.

तरी त्या दुकानांत तो पट्टा पहाण्याचा तिनें आपला क्रम सोडला नाहीं, आणि पोट मारून खाऊचे पैसे जमवावयास ती कांहीं विसरली नाहीं.

होतां होतां एकदांचा चार आण्यांचा खुर्दा तिच्याजवळ जमा झाला. कितीदां तरी ते पैसे तिनें मोजून पाहिले. चार आणे, सोळा पैशांचे चार आणे; बस्स्, एवढेच ? आणखी आठ आणे जमवावयाचे ? अबब ! बरोबर दुप्पट रक्कम पाहिजे अजून !

ते चार आण्यांचे पैसे जमले त्या दिवशीं शाळेंतून येतांना ती त्या दुकानदाराला म्हणाली, “ ए, तो पट्टा देऊन नकोस हं टाकूं कुणाला. बघ, मी तो घेणार आहे विकत. ”

तिला ‘ च्याल्, च्याल् ! ’ करीत दुकानदार आपल्या काठीला गुंडाळलेल्या फडक्यानें दुकानांतील कांचेपेट्या झाडूं लागला.

रस्त्यांत दूर उभी राहून एकाग्र चित्तानें ती त्या पट्ट्याकडे पहात होती.

कांहीं दिवसांनीं तिची मावशी तिच्या आईला भेटावयास आली. जातांना मावशीनें भाचीच्या गालांचे ‘ पापे ’ घेतले आणि तिच्या हातांत एक अधेली ठेवली. त्या अधेलीनें तिची एक निकट इच्छा अकस्मात् पुरी केली !

मावशी निघून गेल्यावर लुगुलुगु जाऊन तिनें आपलें दप्तर सोडलें आणि त्यांतून एक सिगरेटचें ‘ बाकस ’ बाहेर काढलें. त्यांतला खुर्दा पायांमध्यें पसरलेल्या परकरांत तिनें भसूकन् ओतला. एकेक नाणें घेऊन

ती मोजूं लागली. खुर्दा मोजून झाल्यावर त्या रकमेंत तिनें ती नवी अधेली जमा केली. बरोबर बारा आणे आणि तीन पैसे एवढी तिची शिल्लक होती !

तिला पाहिजे असलेली रक्कम एवढ्या लवकर आणि अचानक रीतीनें उभी राहिल्याबद्दल तिला कल्पनेपलीकडे आनंद झाला.

त्या दिवशीं शाळेंत तिचें मुळींसुद्धां लक्ष लागलें नाहीं. केव्हां एकदां शाळा सुटते आणि आपण घरीं जातों असें तिला होऊन गेलें. घंटेचा पहिला टोला कानीं पडतांच दप्तर कसेंबसें गळयांत अडकवीत ती शाळेबाहेर पडली.

धांवत धांवत ती त्या दुकानाकडे गेली. अजूनहि पट्टा दुकानांत आहे या विचारानें तिला भारीच हर्ष झाला. सिगरेट 'बाक्सां'तले पैसे आपल्या चिमकुल्या हातांत घेऊन तिनें ते दुकानदारापुढें केले. त्यानें त्या पुठ्ठ्यांतून तिला तो पट्टा काढून दिला. मधून मधून ती तो पट्टा नुसताच हालवी. त्याचे घुंगूर वाजत तसा तिला मनापासून आनंद होई.

तो पट्टा विकत घेऊनहि तिच्याजवळ तीन पैसे शिल्लक राहिले. त्या तीन पैशांचीं तिनें लहानलहान बिस्किटें घेतलीं; पण त्यांतलें एक सुद्धां तोंडांत टाकलें नाहीं.

आपल्या ' मोत्या 'ला आज पट्टा मिळणार, या विचारांत ती दुडुदुडु घरीं चालली होती. ' मोत्या ' वर तिचा भारीच जीव होता. भात खायला त्याला दांत आले नव्हते तेव्हांपासून दूध पाजून तिनें त्याला वाढविलें होतें. आतां तो मोठा झाला होता, तरी पण तो एक बच्चाच होता; मोठ्या कुत्र्यांत कांहीं जमा नव्हता.

मोत्या म्हणजे तिचा जीव कीं प्राण. त्याच्याभोंवतीं तिचा सगळा ' संसार ' होता. ओट्यावर त्याच्या बिऱ्हाडा शेजारीं तिच्या संसाराचा खेळ मांडलेला असावयाचा. रंगीबेरंगी कापडाचे आणि कांचेचे तुकडे, जत्रेंतन आणलेलीं बाहुलीं, चहाचा लहान सेट, पाळणा, पलंग, बटकुलीं

तिथें नेहमीं पडलेलीं असावयाचीं. डोकें दाबलें कीं ‘ क्यां ’ ‘ क्यां ’ करणारें एक केंसाळ कुत्रेंदेखील ‘ मोत्या ’ ला खेळावयास तिनें जत्रेंतून आणलें होतें. तीं तीन पैशांचीं तिनें एवढीं बिस्किटें घेतलीं तीं देखील मोत्या-बरोबर स्वतः जोडीनें खाण्याकरितां.

मोत्याहि मोठा गुणाचा होता. घरांत तिच्याइतकें दुसऱ्या कुणावर त्याचें प्रेम नव्हतें. ती दिसली कीं त्याच्या शेंपटीची चळवळ सारखी सुरूं व्हावयाची. कान वरखालीं होत. इकडून तिकडे होणाऱ्या त्याच्या पळत्या फेऱ्यांना तर सुमारच नसे.

पट्टा घेऊन पळत पळत ती घरापाशीं आली. अंगणाच्या फाटकाजवळ येतांच रोजच्यासारखी तिनें ‘ मोतीऽ ’ ‘ मोती ’ हांक मारली.

पण त्या दिवशीं तिच्या हांकेला उत्तर मिळालें नाहीं.

अंगणांत, ओस्र्यावर, माजघरांत, मागीलदारीं, माडीवर, गच्चींत सगळी-कडे त्याला धुंडून ती अगदीं दमली, पण तो कांहीं कुठें तिला दिसला नाहीं.

किती तरी वेळां ओस्र्यावरील मोत्याच्या बिऱ्हाडाकडे ती डोका-वून जाई; पण सकाळीं तिनें आणून टाकलेल्या टुवालाखेरीज तिला तेथें कांहीं दिसलें नाहीं. त्या दिवशीं सकाळीं तिनें मोत्याचे काय काय पण लाड केले होते. त्याला मारे न्हाऊं घातला आणि मग स्वतःच्या अंग पुसण्याच्या टुवालानें चांगला स्वच्छ पुसूनहि काढला. दोन्ही हातांनीं त्याला कुरवाळून किती तरी कानगोष्टी मग तिनें त्याच्याशीं केल्या. अगदीं त्याच्या तोंडाजवळ आपलें तोंड नेऊन ती बोलत होती: “ आपण तुला एक शाऽनदार पट्टा आणूं हं ! आणखिन् बिस्कुटं पण घेऊं. आपण किनई दोघं आज जऽऽम्मत करूं…” इत्यादि, इत्यादि.

सकाळीं ओस्र्यावर ती कुत्र्याचे लाड करीत होती—तिकडे लक्ष द्यावयास घरांतल्या वडील माणसांना वेळच नव्हता मुळीं. तीं आपलीं दुसऱ्याच एका उद्योगांत गढून गेलीं होतीं ! बदली झाल्यामुळें त्याच

दिवशीं तिच्या वडिलांच्या हपीसचे साहेब दुसऱ्या गांवीं निघून जावयाचे होते. त्यांना द्यावयाच्या चहाच्या तयारीला सकाळपासून त्या मंडळींची धांवपळ चालली होती.

संध्याकाळीं शाळेंतून ती घरीं यावयाच्या आधींच साहेब त्यांच्या इथून चहा पिऊन गेले होते. स्टेशनवर त्यांना निरोप देऊन नुकतेच तिचे वडील परत आले होते.

घरीं आल्यावर सगळीकडे धुंडून जेव्हां मोती दिसेना तेव्हां तिनें रडून मग आकांत केला.

तिची खूप समजूत करण्याची आईनें शिकस्त केली. दुसरें कुत्रें आणून द्यावयाची वडिलांनीं तिला पुष्कळ आस दाखविली, पण तिच्या डोळ्यांचें पाणी कांहीं खळलें नाहीं, कीं 'मोती ऽ मोती' हा तिचा जप बंद पडला नाहीं. कंटाळून शेवटीं तिच्या वडिलांनीं तिला चांगली झोडपूनहि काढली !

पण ती कांहीं 'मोती'ला विसरली नाहीं.

त्या दिवसापासून तिची खेळकर वृत्ति पार मावळून गेली. कशांत-सुद्धां तिचें मन रमत नसे. रात्रीं झोपेंत मधून मधून ती बरळावयाची, "शाऽन पट्टा आहे, नाहीं मोती ? आवडतो कां रे हा तुला ?"

पण तिचा 'मोती' गेला कुठें ?

तिला उल्हासित ठेवण्याकरितां केलेले सगळे प्रयत्न निष्फळ झाले. तिच्याकरितां किती तरी नवीं कुत्रीं आणलीं होतीं. पण एकाकडेहि तिनें ढुंकूनसुद्धां पाहिलें नाहीं. सारखी ती झुरतच चालली.

तिची तब्बेत आनंदी रहावी म्हणून निरनिराळ्या स्पेशॅलिस्ट डॉक्टरांनीं नाना तऱ्हेचीं नवीं आणि रामबाण औषधें दिलीं; पण एकाचाहि गुण आला नाहीं. खंगत खंगत शेवटीं ती मरणाच्या पंथाला लागलीच !

बदलून गेलेल्या साहेबाच्या शिफारशीनें आलेल्या बढतीच्या पगाराची पहिली रक्कम घेऊन तिचे वडील घरीं आले त्याच दिवशीं तिचें लक्षण कांहीं ठीक दिसेना. अगदीं थोड्या वेळाची ती सोबतीण दिसत होती.

टेबलावर त्यांचीच वाट पहात एक पत्र पडलेलें होतें. आपली बढती केलेल्या त्या उपकारकर्त्या साहेबाचें लखोट्यावरील हस्ताक्षर पहातांच लगबगीनें त्यांनीं तें फोडलें. इतर अवान्तर हकीकतीनंतर अगदीं शेवटीं पत्रांत पुढील मजकूर होता—

" ...... इथें येतांना तुमच्याकडून दिसायला जरा बरें दिसलें म्हणून मोठ्या आवडीनें मीं एक कुत्रें आणलें; पण पहिल्यापासूनच भुंकून भुंकून त्यानें आम्हांला हैराण केलें. खाण्यापिण्याचें तर त्यानें नांवच सोडलेलें दिसलें. आमचा 'मटनपाव' त्याला पचत नव्हता कीं काय कोण जाणे! श्रीमंत अन्नाची त्याला संवय नसावीसें वाटतें. कोंगारून कोंपऱ्यांत पायांमध्यें डोकें खुपसून बसावें, अन् ढुसकलें कीं गुरगुरून एकदम अंगावर यावें, अशी त्याला खोड लागलेली दिसली. असलें चावरें कुत्रें लेंकराबाळांच्या घरांत ठेवणें धास्तीचेंच, म्हणून लागलींच त्याला मीं पांजरपोळांत सोडून दिलें. तिथें तें कालच मेल्याचा मला नुकताच रिपोर्ट आला आहे, यामुळेंच त्याबद्दल लिहिण्याची मला ही आठवण झाली. असो. क. लो. अ. हे विनंति. "

पत्र वाचून झाल्यावर त्यांची नजर बिछान्यावर पडलेल्या मुलीकडे गेली. तिच्या अंगांत बिलकूल त्राण राहिला नव्हता. डोळ्यांची पापणी हालविण्याचीहि तिला शक्ति नव्हती. तरी देखील तो कुत्र्याचा पट्टा हातांत तिनें अगदीं घट्ट धरल्यासारखा दिसत होता! कांहीं तरी बोलण्याकरितां तिच्या ओठांची धडपड चाललेली त्यांना दिसली.

तांतडीनें जाऊन तिच्या ओठांशीं त्यांनीं आपला कान दिला.

अत्यंत खोल आवाजांत अगदीं अस्पष्ट 'मो ऽ ती, मो ऽ ती!' शब्द ऐकल्याचा त्यांना भास झाला. पण तो भासच होता कीं वस्तुस्थिति होती?

## २९. झांशीवाली

रे हिंद्बांधवा ! थांब, या स्थळीं अश्रु दोन ढाळी !
ती पराक्रमाची ज्योत मावळे इथें झांशिवाली ॥

तांबेकुलवीरश्री ती
नेपाळकरांची कीर्ति
हिंद्भूध्वजा जणुं जळती
मर्दांनी राणी लक्ष्मीबाई मूर्त महाकाली !
रे हिंद्बांधवा० ॥ १ ॥

घोड्यावर खंद्या स्वार
हातांत नंगि तरवार
खणखणा करित ती वार
गोऱ्यांची कोंडी फोडित पाडित वीर इथें आली ।
रे हिंद्बांधवा० ॥ २ ॥

कडकडा कडाडे बिजली
इंग्रजी लष्करें थिजलीं
मग कीर्तिरूप ती उरली
ती हिंद्भूमिच्या पराक्रमाची इतिश्रीच झाली !
रे हिंद्बांधवा० ॥ ३ ॥

मिळतील इथें शाहीर
लववितील माना वीर
तरु, झरे ढाळितिल नीर
ह्या दगडा फुटतिल जिभा कथाया कथा सकल कालीं !
रे हिंद्बांधवा० ॥ ४ ॥

# ३०. विद्याचल

मी एके दिवशीं रात्रीं विद्याप्राप्तीच्या उपायांविषयीं, ती प्राप्त झाल्यापासून होणाऱ्या सुखाविषयीं, व ती प्राप्त होण्यास जीं विघ्नें आहेत त्यांविषयीं एकाग्र चित्त करून पडलों असतां मला झोंप लागली, व पुढील चमत्कारिक स्वप्न मीं पाहिलें. तें असें:—

" मी एका अफाट मैदानांत उभा आहें व तेथून दूर अंतरावर उंच व रमणीय पर्वत दिसत आहे. त्यास विद्याचल म्हणत. त्या पर्वतावर जाण्याची उत्कंठा माझ्या मनांत उत्पन्न होऊन मी उभा होतों तेथून तिकडे जाण्यास जवळचा रस्ता कोणता असावा हें मीं पाहूं लागलों असतां कांहीं अंतरावर एक सुंदर उपवन माझ्या दृष्टीस पडलें, व तिकडूनच त्या पर्वताकडे जाण्याची वाट असेल असें वाटून मी त्या उपवनाकडे चालता झालों.

" जवळ जाऊन पाहिलें तों उपवन फारच सुंदर होतें. तेथें जिकडे तिकडे झाडांच्या सुंदर व बेतानें लाविलेल्या रांगा असून सर्व झाडें हिरवीं टवटवीत होतीं, व कितीएक चित्रविचित्र रंगांच्या फुलांनीं व कितीएक उत्तम फलांनीं शोभायमान दिसत होतीं. त्या झाडांच्या मधून रमणीय वाटा होत्या व जागजागीं विश्रांति घेण्याकरितां सुंदर कुंज व गुंफा केल्या होत्या. हें अतिमनोहर उपवन पाहून मला पराकाष्ठेचें समाधान वाटलें व कांहीं वेळ स्वस्थपणें त्यांत विहार करावा असा विचार करून मी इकडे तिकडे त्या स्थलाची अपूर्व शोभा पहात फिरत होतों. फिरतां फिरतां एके ठिकाणीं झुळझुळ वाहणाऱ्या सुंदर ओढ्याच्या कांठीं हिरव्याचार व कोंवळया गवतावर बसलेल्या तीन मूर्ति माझ्या दृष्टीस पडल्या. मग त्यांकडे वळलों व जवळ जाऊन पहातों तों त्यांच्या भव्य व गंभीर मुद्रेवरून व अपूर्व तेजावरून त्या त्या ठिकाणच्या देवता असाव्या असें मला वाटलें. त्या तिघींपैकीं मध्यें जी देवता बसली होती, तिचें नांव

'एकांतवास.' हिची मुद्रा विचारग्रस्त दिसत होती तरी तींत खेद किंवा दुःख यांचें चिन्ह अगदीं नव्हतें. तिच्या उजव्या बाजूस जी होती तिचें नांव 'मौन.' ती तोंडावर तर्जनी ठेवून उगीच बसली होती. डाव्या बाजूस जी देवता होती तिचें नांव 'मनन.' तिचे डोळे अर्धे उघडे व अर्धे मिटले असें असून तिनें वर दृष्टि लाविली होती. या देवतांच्या भव्य मुद्रा आणि अपूर्व व दिव्य तेज पाहून मी अगदीं दिपून गेलों, आणि मोठ्या विनयानें व लीनतेनें हात जोडून उभा राहिलों असतां मधली देवता कृपासूचक मुद्रेनें मजकडे अवलोकन करून अतिमधुर स्वरानें मला म्हणाली, 'अरे तुझ्या मनांतील हेतु मला समजला. विंध्याचलावर जाण्याचें तुझ्या मनांत आहे, नव्हे ? बरें, चल माझ्या मागून. पुष्कळ लोकांस मीं तिकडे पोहोंचविलें आहे व तें करणें माझें कामच आहे. त्या पर्वतावर जाण्यास या माझ्या वनांतूनच बहुतेक सर्वांस जावें लागतें. दुसरी चांगली व निश्चित वाट तिकडे जावयास नाहीं.' मग या अनुग्रहाबद्दल त्या उदार देवतेचा मोठा उपकार मानून मी मोठ्या आनंदानें तिच्या आज्ञेनें चालण्यास सिद्ध होतांच ती पुढें चालली, व तिच्या धोरणानें मी तिच्या मागें चालता झालों. थोड्याच वेळानें आम्ही विंध्याचलाजवळ पोहोंचलों. त्या उपवनाची व त्या पर्वताची शांतता व शोभा पाहून मीं विचारिलें कीं, 'देवि, या अनुपम व पवित्र स्थलीं कोण वास करितात? येथें केवळ सच्छील व सदाचरणी लोकांचा वास असावा, नाहीं बरें?' मार्गदर्शक देवतेनें उत्तर केलें कीं, 'तूं म्हणतोस तें एका प्रकारें खरें आहे. तूं म्हणतोस असल्याच लोकांकरितां मुळीं हें स्थळ निर्माण केलें होतें व सत्ययुगांत तसल्याच लोकांचा येथें प्रवेश होत असे. त्या वेळेस मननशील व लोकहितपरायण असे महान् महान् मुनि या स्थळीं वास करीत. त्यांचा सर्व काळ तत्त्वविचारांत व जगास सुबोध करण्यांत व सन्मार्गी लावण्यांत जात असे. त्यांच्या ठायीं कवि आणि तत्त्वद्रष्टे या संज्ञा यथार्थ होत्या. याप्रमाणें पूर्वस्थिति होती. परंतु अलीकडे कांहीं काळापासून ही सर्व स्थिति बदलून गेली आहे. हल्लीं या स्थळीं दुर्गुणांनीं सद्गुणांचीं सोंगें घेऊन

प्रवेश केला आहे. याकरितां सज्जन मनुष्यांस या स्थलींही फार जपून वागावें लागतें. [बोटानें दाखवून–] तो पहा प्रतिकार 'स्वाभिमान' हें बनावट नांव धारण करून मोठ्या डौलानें कसा फिरत आहे! तशी त्याच्या जवळच महत्त्वाकांक्षा 'कीर्तितृष्णा' हें खोटें नांव धारण करून मोठ्या तोऱ्यानें मिरवत आहे! याप्रमाणें कितीएक दुर्गुणांनीं नानाप्रकारचीं रूपें घेऊन येथें आपला फैलाव मांडला आहे.'

"आम्ही इतक्यांत विद्याचलाचे अगदीं पायथ्याशीं येऊन पोहोंचलों. या ठिकाणीं कितीएक लबाड वाटाडे होते. ते 'या इकडे या, आम्ही तुम्हांस चांगली वाट दाखवितों' असें म्हणून तो पर्वत पहावयास जाणारांच्या पाठीस लागत. त्या सर्वांत 'पोकळ गर्व' या नांवाचा जो वाटाड्या होता, तो तर पराकाष्ठेचा आग्रह करी व मी तुम्हांस अतित्वरेनें व श्रमावांचून वर घेऊन जातों असें सांगे; व पुष्कळ वाटसरूं लोक त्याच्या गप्पा खऱ्या मानून त्याच्या अनुरोधानें जात व ते बापडे त्या पर्वताच्या पायथ्याच्या निबिड झाडींतच नेहमीं गोंधळत असत. असो; मी त्या वाटाड्याच्या मोहक भाषणाकडे लक्ष न देतां पूर्वींच्या देवतेच्या मागोमाग चाललों. पुढें पहातों तों पर्वताच्या माथ्यावर जावयास दोन रस्ते होते व प्रत्येक मार्गाच्या तोंडाशीं एकेक रखवालदार होता. एका रस्त्याच्या नाक्यावर जो रक्षक होता तो त्या रस्त्यानें जाऊं इच्छिणाराची चौकशी करी व ज्यास सरस्वती जन्मतः प्रसन्न आहे असें त्यास आढळे त्यास मात्र तो जाऊं देई. दुसऱ्या रस्त्याच्या नाक्यावर जो रखवालदार होता त्याचें नांव 'व्यासंग'. पहिल्या रस्त्याच्या नाक्यावर नाकारलेल्या सर्व व इतर पुष्कळ दुसऱ्या नाकेवाल्या-जवळ परवानगी मागण्यास येत व तो प्रायः कोणालाही ना म्हणत नसे. परंतु तो परवानगी देण्याविषयीं फारच चेंगटपणा करी; व त्यानें खुला केलेला रस्ता इतका बिकट व भ्रामक असे कीं, जे तो पत्करीत त्यांपैकीं पुष्कळ लौकर किंवा उशीरा कंटाळून परिणामीं पुढें जाण्याविषयीं नाउमेद होऊन मागें फिरत. या रस्त्यानें जाणाऱ्यांपैकीं फारच थोडे पर्वताच्या शिखरास जाऊन पोहोंचत. या दोन रस्त्यांहून निराळा एक तिसरा रस्ता होता

तो वरील दोन्ही रस्ते अंशतः एकत्र होऊन झाला होता. परंतु हा मार्ग गुप्त असे व ज्या दैववान् मनुष्यांस तो सांपडे ते लौकर इष्ट ठिकाणीं जात. असो; मी आपल्या मार्गदर्शक देवतेस म्हणालों कीं, ' हे देवि, मला विंध्याचलाच्या शिखरापर्यंत चढण्याची उमेद वाटत नाहीं. कांहीं उंच चढून तेथून दिसेल तितकाच चमत्कार पाहून आपलें समाधान करून घ्यावें अशी माझी इच्छा आहे. ' तिनें उत्तर केलें कीं, " बाबा, तसें होण्याचा संभव नाहीं. अर्ध्या वाटेवर जाऊन मध्यें थांबलें असतां थांबणारा वरून खालीं एकदम तळाशीं पडतो. तर तुला धैर्य खचूं न देतां शेवटपर्यंत वर चढलें पाहिजे. ' मग तिच्या उत्तेजनानें मीं शिखरापर्यंत तिच्यामागून जाण्याचा दृढनिश्चय केला.

" आम्ही मध्यभागापेक्षां कांहीं वर गेल्यावर आम्हांस शिखर दिसूं लागलें. तेथें दोन मूर्ती प्रथम माझ्या दृष्टीस पडल्या. त्यांत एक तरुण व अत्यंत सुंदर स्त्री होती. ती अत्यंत चपळ होती. तिच्या अंगीं असा कांहीं विलक्षण प्रभाव होता कीं, ती एका निमिषांत अत्यंत दूरच्या प्रदेशांत जाऊन परत येई. ती आपले पोषाख क्षणोक्षणीं बदली. कधीं कधीं ते अत्यंत सुबक, स्वाभाविक व फारच शोभणारे असत व कधीं कधीं ते फारच वेडेविद्रे व उपहासास्पद असत. तिच्या शेजारीं एक पुरुष असे. त्याचें वय प्रौढ असून मुद्रा फार गंभीर असे. तिनें वेडेविद्रे पोषाख व दागिने घातले असतां, आपल्या हातीं एक आरसा असे तो तिजपुढें करून तो तिची चूक तिला दाखवी; व तो उपहासास्पद पोषाख व भूषणें तिच्या अंगावरून हिसकून घेऊन पर्वताखालीं झुगारून देई. तीं खालीं पडल्याबरोबर तेथें फिरणारे खरोखरी अज्ञान परंतु सज्ञानांचा अभिमान बाळणारे तीं खराब भूषणें व वस्त्रें लेऊन मोठ्या दिमाखानें मिरवूं लागत ! या तरुण स्त्रीचें नांव 'कल्पना' व पुरुषाचें नांव 'पक्वविचार.' यांची एक मुलगी होती. तिच्यासारखी मोहक स्वरूपाची स्त्री त्या पर्वतावर दुसरी नजरेस पडली नाहीं. तिचें नांव 'कविता.' ही मुलगी एका उंच आसनावर बसली होती व तें आसन अनेक उत्तम कवींचीं काव्यें एकत्र करून

बनविलें होतें. मग कांहीं वर गेल्यावर पर्वताचा वरील प्रदेश लागला. तेथील शोभा काय वर्णावी ! तेथील हवा शांत व स्वच्छ होती. तेथें सर्वकाळ वसंत वास करितो. आसमंतात् कल्पवृक्षांची बाग लागून गेली होती व जिकडे तिकडे दिव्य परिमल सुटला होता. तेथें दोन टेंकड्यांच्या मध्यें एक सुवर्णाचा विस्तीर्ण व शोभायमान मंडप होता. त्याच्या मध्यभागीं रत्नजडित सिंहासनावर विद्यानाथ जो गणपति तो विराजित होता व त्याच्या शेजारीं वीणापुस्तकधारिणी शारदा बसली होती. पुढें गंधर्वांचें मधुर गायन व अप्सरांचें सुंदर नृत्य चाललें होतें. त्या दिव्य सभेंत विश्वामित्र, उशना, वाल्मीकि, कृष्णद्वैपायन, गणाढ्य, कालिदास, भवभूति, बाण, गोवर्धन आदिकरून कवि आणि जैमिनी, यास्क, कपिल, पतंजलि, गौतम आदिकरून शास्त्रप्रवर्तक बसले होते. पृथ्वीवरील दुसऱ्या देशांतील प्राचीन महाकवि व शास्त्रकर्तेंही तेथें दिसत होते. ही अपूर्व सभा पाहून मी अगदीं चकित झालों, व मला अवर्णनीय आनंद झाला. त्या पर्वतावरून खालच्या लोकांचे व्यापार स्पष्ट नजरेस पडत होते. सदाचरणाचा मार्ग सर्वांच्या जवळ असतां लोभ, मत्सर इत्यादि ठकांच्या मोहजालांत गुंतल्यामुळें बहुतेकांस तो जवळ असून दिसत नसे, व ते बापडे उगीच संकटांत व दुःखांत पडत. हें सर्व त्या पर्वतावरून आम्हांस स्पष्ट दिसत असे. त्यांची ती दुःखावस्था पाहून माझ्या मनास मोठा धक्का बसला व त्या धक्क्याबरोबर मी जागा झालों. "

# ३१. हरिश्चंद्राचा प्रवास

घोर वनांतरीं नृपति। कुमार आणि तारामती। रोहिदास धरूनि हातीं। जातां कैसें वर्तलें॥ १॥ कौशिकदर्पें सहस्ररश्मी। तपों लागला तीव्र व्योमीं। तेणें तेजें पर्वत भूमी। उलों पाहे ते काळीं॥ २॥ केवढें ऋषीचें सामर्थ्य। वरुणें केला निर्वारि पंथ। कूप, सरिता, तडाग समस्त। आर्द्रता लोपली॥ ३॥ कांता कुमार चालतां पंथीं। उष्णें करपली सुकुमार कांती। कडिये कुमार तारामती। घेऊनि चाले नृपसंगें॥ ४॥ रोहिदास म्हणे 'जी ताता। तृषेनें प्राण जाईल आतां'। म्हणोनी कडेबहु खालता। पडोनी लोळे गडबडां॥ ५॥ माता म्हणे 'रे तान्हया। पैल, वृक्षातळीं छाया। तेथें बैसोनिया तोया। आणूनि पाजूं तुजलागीं'॥ ६॥ म्हणोनि गेली तरुतळीं। तंव सूर्यबिंब आलें मध्यमंडळीं। स्वल्प छाया दिसे मूळीं। जाऊनि तेथें बैसली॥ ७॥ रायें शोधिलें सकळ वन। कोठें न मिळे जीवन। परतोनि आला नंदन। होता जेथें मातेशीं॥ ८॥ राजा अवलोकी तयांतें। तंव धुळीमाजी जैसीं प्रेतें। पल्लवें वारा घालुनि हातें। स्पर्शोनि केलीं सावध॥ ९॥ कुमार म्हणे 'द्यावें जीवन'। ऐकोनि रायें उभय नयन। भरुनी म्हणे सखेद वचन। 'पुढें येई डोळसा'॥ १०॥ ऐसें बोलोनी उभय करीं। कवळोनि चालतां पुढारी। विश्वामित्र वनांतरीं। प्रगट झाला द्विजरूपें॥ ११॥ रायें देखोनि केलें नमन। येरे दिधलें आशीर्वचन। म्हणे 'तुझी कीर्ति परिसोन। आलों एथें सकाम'॥ १२॥ राजा म्हणे 'बोलिजे स्वामी'। येरू म्हणे 'तीर्थवासी आम्ही। भार्या सूत समागमीं। चालतां चरण पोळती॥ १३॥ जो देईल पादत्राणें। त्यासी कल्याण नारायणें। कीजे' म्हणतां नरभूषणें। वसनें वोपिली चरणींचीं॥ १४॥ तिघे जणें चालतां चरणीं। तळीं तापली धरणी। माथां पोळती उष्ण किरणीं। अंतर तृषेनें करपलें॥ १५॥ ऐसीं लंघितां वनोपवनें। पुढें विश्वामित्रें वाटिका जीवनें। अति रमणीय प्रपास्थानें। मायामय निर्मिलीं

॥ १६ ॥ विश्वामित्रें रमणीय धाम । पुढें निर्मिलें मनोरम । जें देखतां जाय श्रम । दोष जैसे हरिनामें ॥ १७ ॥ ऐसी ऋषी निर्मी पोहे । नृपवर दुरोनि पाहे । जीवनालागीं लवलाहें । जाता झाला पुढारां ॥ १८ ॥ सुत कांता सांडुनी मागें । मायावनीं पातला वेगें । पोहे जाणुनियां नेघे । राजा फिरे माघारा ॥ १९ ॥ ऐशियापरी प्रपामंदिर । सांडोनि जातां राजेश्वर । तोयपात्र ऋषीश्वर । घेउनि धांवे पाठीशीं ॥ २० ॥ म्हणे 'उभा राहे पांथिका । श्रमें श्रांतलासी घे उदका'। राजा म्हणे 'हें धार्मिका । सेव्य नव्हे सर्वथा' ॥ २१ ॥ ऋषि म्हणे 'तनुभांडवल । रक्षितां सुकृतधन जोडेल । यालागीं बोलती वडील । शरीर रक्षी तो धर्म' ॥ २२ ॥ ऐसें बोलोनि धरिला करीं । म्हणें 'चाल मम मंदिरीं । स्नान सारूनि भोजन करी । नावेक शयनीं पहुडावें' ॥ २३ ॥ 'विश्रांति पावलों समस्त । तुमच्या दर्शनें कृतकृत्य'। एसें बोलोनि नृपनाथ । शीघ्र चामके पुढारां ॥ २४ ॥ तारामती तयापाठीं । चालतां झाली, परम कष्टी । पोई जाणोनियां दृष्टी । मुरडोनियां चालली ॥ २५ ॥ येरीकडे आश्रमांत । ऋषीनें केलें अत्यद्भुत । मायामय नृपनाथ । करूनि बैसवी मंचकीं ॥ २६ ॥ ऋषी म्हणे 'वो पतिव्रते । तुझा पति पाचारी तूंतें । पैल पालवीतसे हातें । मंचकीं बैसूनि मंदिरीं' ॥ २७ ॥ येरी अवलोकीं भीतरीं । रायासि देखे मंचकावरी । चरणसेवा सुंदरी । सुकुमार करीं करिताती ॥ २८ ॥ ऐसें अवलोकितां सती । म्हणे 'हें काय घडलें ! श्रीपति ! । अंधकारामाजी गभस्ती । अडखळोनी पडियेला ॥ २९ ॥ दुष्टदंडना कमळापती । अवतार धरितां भागे चित्तीं, । अस्तमान होतां फिरे गभस्ती । तरी हें ऐसें घडों ये ॥ ३० ॥ कीं पर्वतमस्तकींचें जळ । अधोपंथें धांवे तुंबळ । तें परतोनि पावे मूळ । तरी हें ऐसें घडों ये ॥ ३१ ॥ तैसा राजा सूर्यवंशी । धर्मशील सत्वराशी । क्लेश पावतां पोईशीं । विश्रामेल, हें घडेना ॥ ३२ ॥ असो; मी तंव येथ न घे जीवन'। म्हणोनि केलें पुढारां गमन । विश्वामित्र म्हणे 'कोण । सत्त्व इये सतीचें !' ॥ ३३ ॥ मागें पाहे जंव कौशिक । तंव येतां देखिलें बालक । श्रमें शोषलें वदनां-

बुजक । अंतर तृषेनें करपलें ॥ ३४ ॥ म्हणे ‘ श्रमलासी चालतां पंथीं । या पोहेसी करीं विश्रांती । उदक प्राशूनियां पुढती । गमन करीं बाळका ’ ॥ ३५ ॥ रोहिदास म्हणे ‘ स्वामिया । आम्ही न शिवों ऐसिया तोया । कलंक लागेल आमुचिया । सूर्यवंशालागुनी ’ ॥ ३६ ॥ ऋषीप्रति बोलोनि ऐसें । गमन केलें रोहिदासें । विश्वामित्र निजमानसें । वोवाळीत बाळका ॥ ३७ ॥ येरीकडे वसुधापति । पाहे लंघुनी जातां पंथीं । तया-मागें तारामती । कवळोनि चाले पुत्रातें ॥ ३८ ॥ विश्वामित्रें जाऊनि पुढें । वणवा लाविला चहूंकडे । जळों लागलीं उभीं झाडें । श्वापदपक्ष्यां आकांत ॥ ३९ ॥ धूम्रें दाटलें अंबर । भडके उठती भयंकर । तयांमाजी राजेश्वर । सहपरिवारें सांपडला ॥ ४० ॥ विश्वामित्रें काय केलें । राया रोहिदासा चुकविलें । तारामतीतें सावाइलें । तया वणवियामाघारी ॥ ४१ ॥ मागें पाहे तारामती । पुत्र न देखोनी पडली क्षिती । पुढें पाहे, तंव नृपती । तोही तीतें दिसेना ॥ ४२ ॥ म्हणे ‘ बाळा ! रोहिदासा ! । भेटी देईं बा पाडसा । तुज वेगळया दाही दिशा । वोस वाटती मजलागीं ॥ ४३ ॥ अहा ! सूर्यवंशचूडारत्ना । माझिया प्राणपती निधाना । मजवेगळे सायुज्यसदना । भोगावया गेलेती ॥ ४४ ॥ जया अनळें दाहिला पती । तया वोपीन वपु आहुती ’ । मनेंचि सौभाग्यसंपात्ति । वर्षती झाली पावकीं ॥ ४५ ॥ ब्रह्मरूप भाविला वन्ही । धर्मशिळे उभी राहुनी । उडी टाकावी तंव ते क्षणीं । प्रगट झाला कौशिक ॥ ४६ ॥ वणवा विझवुनी आंगें । सतीसमीप पावला वेगें । म्हणे ‘ तूं कवण कवणाची सांगें । किमर्थे आलीस काननीं ? ’ ॥ ४७ ॥ येरी म्हणे ‘ आम्ही पथिक । माझा पति आणि बाळक । या वणवियामाजी देख । जळोनि मेले कळेना ॥ ४८ ॥ तुम्हीं देखिले असती जरी । कृपेनें सांगिजे उत्तरीं ’ । ऋषी म्हणे ‘ वो ! वनांतरीं । जळोनि पडलीं दोन शवें ’ ॥ ४९ ॥ तारा-मतीस नेऊनि तेथें । दाविता झाला उभय प्रेतें । त्वचा जळोनि पडलीं व्यस्तें । हस्त पाद पसरूनी ॥ ५० ॥ अवलोकुनी पतीचें मढें । म्हणे

'वल्लभा ! पाहे मजकडे । रुसणें सांडोनी बोलिजे तोंडें । गुजगोष्टी मजसवें ॥ ५१ ॥ मजवेगळे उदकपान । तुम्हांसी लागे विषासमान । जीवींचें गुह्य वचन । अखंड सांगा मजलागीं ॥ ५२ ॥ ते तुम्ही आजीं कवण्या गुणें । क्रोध धरिला अंतःकरणें । मौन धरूनियां वचनें । कां न बोलां मजसवें ' ॥ ५३ ॥ रोहिदास कवळोनि पोटीं । ललाट मेळवी ललाटीं । शोक करितां श्वापदें दृष्टी । देखोनि गहिवरें दाटलीं ॥ ५४ ॥ ऐसा विलाप करितां सती । अस्तमाना गेला गभस्ती । ऋषि म्हणे ' आतां किती । शोक करिशी शवांचा ॥ ५५ ॥ आम्हीं परिसिली एक मात । तुम्हांस ऋण असे किंचित ' । येरू म्हणे ' जी ! सत्य । देणें असें ऋषीचें ' ॥ ५६ ॥ येरू म्हणे ' पतीचें ऋण । फेडिते पतिव्रता जाण । तेणें अक्षय स्वर्गभुवन । भोगावया जोडेल ॥ ५७ ॥ आमुच्या गृहीं क्रमूनि निशी । प्रभातीं अग्नि देणें शवांसी । भलतियापरी पति-ऋणासी । हरुनी स्वर्गा धाडिजे ' ॥ ५८ ॥ तारामती म्हणे दयाळा । केवीं सांडूं मी पती आणि बाळा ? । धणीवरी पाहेन डोळां । मुख-कमळें दोघांचीं ' ॥ ५९ ॥ ऐसें ऐकुनियां वचन । अदृश्य झाला तपोधन । कौशिक ऋषीनें विंदाण । काय केलें वनांत ॥ ६० ॥ घोर दाटली इंदुवल्लभा । माजी उडुगणें दाविती शोभा । पिशाचश्वापदांची सभा । प्रेतें देखोनि पातली ॥ ६१ ॥ तयांमाजी विश्वामित्र । व्याघ्ररूप धरूनी क्रूर । महाभयानक पसरोनि वक्त्र । झेंप घाली अवचितीं ॥ ६२ ॥ सतीपुढोनि उभय प्रेतें । वोढूनि नेलीं परौतें । उदर फाडोनी अंत्रें । काढूनि टाकी बीभत्स ॥ ६३ ॥ तारामती म्हणे ' गा ? श्रीपती । धांव धांव या आकांती । कैशी प्राप्त झाली गती । ऐशी वैरिया होऊं नये ॥ ६४ ॥ जन्मल्या देहासी मरण । कदा न चुके ब्रह्मव-चन । परी त्या ब्राह्मणाचें ऋण । फिटलें नाहीं आमुतें ॥ ६५ ॥ असो पुढें जन्म घेतां । ऋषिऋण फेडूं सर्वथा । मी पतिसवें पतिव्रता । गमन करीन अविलंबें ' ॥ ६६ ॥ म्हणवुनि नयन झांकिले । पंचप्राणांतें आकर्षिलें ।

प्राण द्यावा तंव सुचलें । ज्ञानदृष्टी कौशिका ॥ ६७ ॥ तारामती सांडील प्राण । आमुचें जाईल प्रतिज्ञावचन । म्हणोनि आणी दोघे जण । पति पुत्र तीपुढें ॥ ६८ ॥ कैंचा व्याघ्र? कैंचा वणवा ? ॥ जैसा मृगाब्धीचा हेलावा । कीं दुष्ट स्वप्न भोगितां जीवा । वोडंबरीसारिखें ॥ ६९ ॥ राजा म्हणे 'सौभाग्यसरिते । किमर्थ शोक सांग मातें'। येरी म्हणे 'तुम्हांतें । पुनर्जन्म देखिलें ॥ ७० ॥ तुम्हीं जळोनि मेलेति वणवां । कवळोनी बैसल्यें उभय शवां । परम दुःख वाटलें जीवा । शंका वाटे सांगतां ॥ ७१ ॥ यालागीं झांकिलें नयन । हृदयीं स्मरला नारायण । परिसोनि तुमचें वचन । नेत्र उघडोनि पाहिलें' ॥ ७२ ॥ राजा म्हणे 'वैकुंठपाळ । ऐशींच विघ्नें भंगुनी सकल । मोक्षपदीं स्थापील अढळ । सत्त्व देखोनि आमुचें' ॥ ७३ ॥ यापरी लोटला एक मास । राजा न लभे सुखाचा लेश । दुःखावेगळें निमिष । जाऊं नेदी कौशिक ॥ ७४ ॥ भूपाळसत्त्व शुद्धरत्न । कौशिककोप न गणीं घन । मशकनाशिकीच्या प्रभंजनें । मेरू जैसा न हाले ॥ ७५ ॥

*

# ३२. श्री थोरले माधवरावसाहेब पेशवे

पानिपताच्या मैदानावर मराठी फौजा मोडल्या ती हकीकत सर्वांच्या डोळ्यांना पाणी आणणारी आहे.

कौरवपांडवसंगरतांडव । द्वापरकालीं होय अती ।
तसे मराठेगिलचे साचे । कलींत लढले पानपतीं ।

हा गडकऱ्यांचा कटाव पुष्कळ मुलांना पाठ येतच असेल. श्री शिवाजी महाराजांनीं मराठी राज्याचा प्रचंड वृक्ष लावला. त्याला पानिपतावर कीडच लागली म्हणाना. तरी पण आणखी सुमारें पन्नास वर्षे आपलें मराठी राज्य तसेंच तगलें. पैकीं बारा वर्षे तें थोरले माधवरावसाहेब पेशवे यांनींच श्रमानें आणि नेकीनें सांभाळिलें. ती कथा आणि त्यांचें चरित्र आपण ध्यानांत ठेवण्यासारखें आहे.

पानिपताचा धक्का बसला आणि त्या वेडांत नानासाहेब पेशव्यांनीं पर्वतीवर प्राण सोडला. नानासाहेबांच्या धाकट्या भावाचें नांव दादासाहेब. हेच राघोबादादा पेशवे. नानासाहेबांचा वडील मुलगा विश्वासराव. हा पानिपतावर गारद झाला. मधला माधवराव आणि धाकटा नारायणराव. हे दोघे एकामागून एक पेशवाईच्या गादीवर बसले. माधवरावाचा जन्म इ० स. १७४५ त झाला. त्याच्या आईचें नांव गोपिकाबाई. ही रास्त्यांच्या घराण्यांतील. ही फार कारस्थानी व हुषार बायको होती. माधवराव अगदीं तिच्या आज्ञेंत वागे.

रीतीप्रमाणें माधवरावास पेशवाईचीं वस्त्रें श्री छत्रपति महाराज यांनीं दिलीं. त्यावेळीं रायाचें वय अवघें सतरा होतें. खरा कारभार दादासाहेबांचे हातीं होता. सखारामबापू बोकील हा अनुभविक मुत्सद्दी दादासाहेबांचा कारभार करी.

पानिपतावर मराठे मोडले तेव्हां मराठ्यांच्या शत्रूंचा आनंद गगनांत माईना. ते चोहोंकडून मराठी राज्यावर उठले. उत्तरेकडे तर मराठ्यांची भीतिच उडाली होती. दाक्षिणेंत त्यांचा हाडवैरी निजाम वाटच पहात होता.

निजामाच्या जोडीला या वेळीं एक नवीन शत्रु मराठ्यांस उत्पन्न झाला. हाच हैदर नाईक. मूळ हा सैन्यांतला एक लहानसा नाईक; पण फार धाडसी, हुषार व हिकमती होता. त्यामुळें त्यानें म्हैसूरचें हिंदु राज्य बळकावून घशांत टाकिलें. त्याचें चरित्र श्रवणीय आहे. तो बुद्धीनें चलाख व आठवणीचा धड होता. थोड्याच दिवसांत साऱ्या दक्षिणेंत त्यानें आपली जरब बसविली. तो बांका शिपाई व खंदा सेनापति होता. त्याचें सैन्य जय्यत तयार असे. लांब लांब मजला करण्यांत तो राघोबादादाची बरोबरी करण्यासारखा होता तोफा—दारूगोळा यांवर त्याची सारी मदार होती. मराठ्यांना एवढा चिवट व खबरदार शत्रु दुसरा क्वचित्च भेटला असेल. असल्या धेंडाचीहि माधवरायानें पक्की व पुरी खोड मोडली.

माधवरायानें हैदर व निजाम यांची तेव्हांच चटणी केली असती. परंतु घरच्या दुहीमुळें सर्व नासलें. या दुहीचें मूळ माधवरायाचा चुलता रघुनाथरावदादा. हा जातीचा शूर खरा पण याचा सारा भोळा व खुळा कारभार. जसें ऐकावें तसें बोलावें. "श्रीमंत दादासाहेबांचें आवशीस बोलणें एक आणि पहांटेस बोलणें एक." शहाण्या मुत्सद्यांपेक्षांही शिष्यशागीर्दांचा भरंवसा यांना अधिक वाटे. उरळीजवळ निजामाला मराठ्यांनीं पुरा कोंडला होता. तेव्हां याच दादासाहेबांची फूस होती म्हणून त्याला फायदेशीर तह ठरला. ही गोष्ट पुष्कळ मराठी सरदारांना आवडली नाहीं. सखाराम भगवंत बोकील दादांच्या गळ्यांतील ताईत. जुना मुरलेला व कावेबाज खेळया तो! कारस्थानांत त्याचा हात धरील असा कोणीच मातबर नव्हता. असला हा सखारामपंत कारभारी नको म्हणून त्रिंबकराव मामा पेठे, गोपाळ गोविंद पटवर्धन, बाबूजी नाईक बारामतीकर वगैरे सरदारांच्या फार आग्रहामुळें दादा व सखाराम बापू यांनीं कारभारांतून आंग काढल्यासारखें केलें. मग गोपिकाबाईच्या संमतीनें मामा पेठे व बाबुराव फडणीस कारभारी झाले. त्यांनीं पहिल्या झटक्यासरशीं हैदरचा समाचार घेण्याचें ठरविलें. हैदरनें मराठ्यांचें "स्वरूप नेलें.

होतें. " तो फार " प्रबल " झाला होता. तेव्हां त्याजवर पेशव्यांनीं आपला मोर्चा फिरविला आणि तुंगभद्रेपावेतों आपला दाब बसवून माधवराव परतला. इतक्यांत सखारामबापूनें गुप्तपणें आपसांतल्या भांडणाची तयारी पक्की केली. आबा पुरंदरे, विठ्ठल शिवदेव विंचूरकर, कृष्णराव पारसनीस, नारो शंकर राजेबहाद्दर वगैरे मोठमोठे सरदार बापूनें युक्तीनें आपल्या ( दादांच्या ) कटांत ओढले. पेठे, पटवर्धन, रास्ते, नाईक, फडणीस वगैरे इतर सरदार गोपिकाबाईच्या पक्षांत राहिले. म्हणजे आतां राज्यांत दोन तट स्पष्ट झाले. बिचारा माधवराव लहान खरा, पण फार शहाणा होता. " घरांतच कलह पूर्वी जो नाहीं जहाला तो होईल " अशी भीति त्याला फार होती. त्याला वाटे, दादासाहेब " स्वच्छ अंतःकरण, स्फटिकवत् आहेत; " त्यांचा " दुःसंग दूर करावा " म्हणजे झालें. यामुळें दादासाहेबांशीं फाटावें हें त्याला मनापासून पटत नव्हतें.

या वेळीं माधवरायाचें वय सारें अठरा वर्षांचें होतें. परंतु शहाणपण मोठें. त्यानें आईस या वेळीं पत्र लिहिलें तें लाख वेळां वाचलें तरी तृप्ति होत नाहीं इतकें तें सुंदर आहे. तो लिहितो " कारभारी यांचे पेचामुळें आमचे दौलतेच्या तणावा तुटत चालल्या. पहिल्यापासून राखिलें असतें तर सर्वहि आपआपला कारभार करून लगामीं रहाते. तें न झाल्यामुळें सर्व मुलूख बुडाला ... ... ... ... ... लोक फितूर फार झाले. धन्याचें वजन राहिलें नाहीं. शत्रू बलवत्तर झाले. तथापि पैसा असता तरी सर्वहीं गोष्टी इतकेही पेच संभाळून नीट होत्या त्यास पैसा नाही. पैसा नाहीं तेव्हां फौज कशावर ठेवावी ? फौज नाहीं, दौलत कशी राहणार ? असें बारीक बारीक पाहतां सारें अवघडच आहे. प्रस्तुत तीर्थरूप राजश्री दादासाहेब व आम्ही एक झालों हीच गोष्ट एका करोडीची जाहली ! ! " पण ही चुलत्यापुतण्याची एकी फार दिवस टिकली नाहीं. कारण सर्वांचीं मनें तितकीं थोर व साफ नव्हतीं. कारभार हातीं येतांच दादांनीं पटवर्धन, पेठे वगैरे विरुद्ध पक्षाच्या मंडळीकडून सारे

अधिकार काढून घेतले आणि आपल्या पक्षाच्या मंडळीस दिले. त्यामुळें गोपाळराव पटवर्धन, भवानराव प्रतिनिधि, गमाजी यमाजी इत्यादि मंडळी रुसली आणि निजामाकडे गेली. निजामचा दिवाण राजा विठ्ठल सुंदर यानें सर्वांस आश्रय दिला.

अखेर खुद्द पुण्यावर निजामाची धाड आली. नारो आप्पाजी तुळशी-बागवाले हा पुण्याचा कारभारी होता. त्यानें खंडणी कबूल केली. "श्रीमंतांचें धर्मराज्य रक्षण करावें हें श्रेयस्कर" हें जाणून मोंगलास मिळालेले पटवर्धन वगैरे मराठे सरदार यांनीं पुणें राखावें म्हणून खटपट केली. पण ती फुकट गेली. त्यांचें ऐकतो कोण ? सारें पुणें फुटलें, लोक पळाले, तरी तमाम मावळ वगैरे मुलुखांत फौजा शिरल्या. इकडील कांहीं मराठेच मोंगलांस सामील. त्यामुळें मातबरांचा तपास मोंगलांना लागला व पैका त्यांनीं भारी उकळला. खुद्द नाना फडनवीस एका वस्त्रानिशीं सुटला ! नारो आप्पाजीनें गोपाळराव-दादा पटवर्धनास लिहिलें, "दादा, पुण्यांतील देव एक लहान मोठा राहिला नाहीं. महादेवाच्या पिंडी व मूर्ती, गणपती, हणमंत सर्व फोडले. पर्वतीस हेंच केलें. सरकारचा वाडा, धर्मशाळा चाळीस हजार ब्राह्मण निवाऱ्यास बसावयाच्या जळाल्या ... ... फरासखाना श्रीमंतांचा अगदीं लाख रुपयांचा, तह झाला म्हणून तसाच ठेवला. तो तह जाहालियावर लुटला ... ...जाळणें पोळणें तों सीमाच नाहीं...आपण त्यांचा (मोंगलांचा) भरंवसा मानून लिहिलें म्हणून (आम्ही) असें ढिलाईनें राहिलों. सर्वनाश झाला. असो, तुमचाही उपाय काय जेथवर होईल तेथवर करिता." असो, "पृथ्वी प्रलय झाला, गोरगरीबें बुडालीं" मग सर्वांचे डोळे उघडले. अरेरे, आपसांतील फुटीमुळें गोष्टी कोणत्या थराला गेल्या ! इतक्यांत पावसाळा आला. तेव्हां मोंगल व पेशवे छावणीस जाऊं लागले. तोंच जानोजीनें मोंगल गोदेवर आहे, संधि साधून त्याला सफाई बुडवावा असा इषारा पेशव्यास दिला. लागलीच पेशवे जलदी करून निजामाच्या पाठीवर चालले. "उत्तम तह, मध्यम लढाई, कनिष्ट पलायन" या तिहीं-पैकीं शेवटचा पळण्याचा मार्ग निजामानें पसंत केला. गोदेला पाणी

वढलें होतें तरी तसाच नदीपार झाला. मात्र त्याची अर्धी फौज मागें राहिली. ती घेऊन राजा विठ्ठल सुंदर ठासून राक्षसभुवनावर उभा राहिला. त्यावर पेशवे पडले. " मोठी लढाई झाली. श्रीकृपेनें विठ्ठल सुंदर, विनायकदास कंदारकर, गोपाळसिंग अगदीं ठार झाले. याखेरीज मुरादखान, पिंगळे, पाटणकर, बाबूराव, जंगी वगैरे बेवीस सरदार पाडाव झाले. यश मोठें आलें. पुढें गंगा उतरून निजामअल्लीखान पळून औरंगाबादेस गेला. मोंगलास या तऱ्हेची जरब कधींच बसली नव्हती. विठ्ठलपंतासारखा कारभारी इतबारी मर्द मोंगलास मिळणें नाहीं... "

निजामाचा असा पक्का बंदोबस्त झाला. दादाहि गोडींत आले. तेव्हां चतुर माधवरावानें पुनः हैदराचा समाचार घेण्याचें ठरविलें. हैदर फार शिरजोरी करीत होता. बहादर खरा. इंग्रज, मराठे आणि निजाम या तीन बलाढ्य शत्रूंनीं जंग जंग पछाडलें पण हैदर सर्वांना पुरून उरला. मात्र मराठे एकचित्त असते तर हैदर सफाई बुडविते यांत संशय नाहीं. माधवराव तर आतां हात धुऊन त्याच्या पाठीस लागला. लागोपाठ तीनचार स्वाऱ्या हैदरावर त्यानें केल्या. हैदरानें शर्थ केली. तथापि मराठ्यांनीं त्यास सडकून मार दिला. त्याचें नुकसान फार झालें. " या उपरी हैदरनाइकांनीं झुंजावें ही कांहीं बाकी राहिली नाहीं. " परंतु माधवरावास वाटलें त्यापेक्षां हैदर फार चिकट व धिम्मा होता.

घरचे शत्रु व बाहेरचे शत्रु यांचा असा मोड केला, तेव्हां रावसाहेबांचा चहूंकडे चांगलाच वचक बसला. दादा माघारीं घरीं आले तों पुनः त्यांचें डोकें फिरलें व त्यांनीं राज्यांत वांटणी मागितली. " राज्य कोणाचें ? वांटून देणार कोण ? आमच्यानें वाटवत नाहीं. सर्व राज्य तुमचेंच आहे. आम्हीं चार बारगीर तसे तुम्हांजवळ असो. " असा साफ जबाब रायांनीं केला. मग दादा उगे राहिले.

नंतर मग दादांना हिंदुस्थानाचे स्वारीस पाठविलें. तिकडे मल्हारबांचा पराजय इंग्रजांनीं केला होता. त्यामुळें मल्हारबा ' खट्टे ' झालेले होते. हे इंग्रज दिवसेंदिवस बळावत चालले होते. कोल्हापुरकरांचा

मालवणचा आरमारी किल्ला यांनीं बळजबरीनें याच सुमारास घेतला. "मोठी वाईट गोष्ट ज्राहली. महास्थळ लौकिकाचें गेलें. इंग्रज देशास समीप जाहला. टोपीकर फार बळावला. इंग्रज याणें बळ धरिलें तरी कोंकणांत अपाय ही चिंता वाटती. दरबारीं कांहीं चर्चा होती न होती हें नकळे." अशी काळजी गोपाळरावांचे वडील गोविंद हरी या पोक्त मुत्सद्याला पडली. तथापि "फारच शेंफारला, वाढलें मोडतच आहे" या अभिमानावरच मंडळी गेली. परंतु पुढें इंगा फिरला तेव्हां मात्र चक्क झालें असेल. असो, दादा वर गेले. मल्हारबांची त्यांची भेट झाली. इतक्यांत मल्हारराव होळकर आटपले. माधवरावाचे "चित्तास परम खेद जाहला. मातबर सरदार मोठे दाबाचे होते." दादांनीं ही मोहीम व्यर्थ हालविली. गोहदेस वेढा घालून ते बसले, उगाच आग्रहास पेटले आणि खर्चीखालीं आले. अखेर विशेष कांहीं फत्ते न होतां दादा परतले.

पुण्यास माधवरावानें दरबारी काम फार कसोशीनें सुरू केलें होतं. झाडून साऱ्या प्रांतांचे हिशेब त्यानें आणविले. लबाड मामलेदार सांपडले, त्यांस कडक शिक्षा दिल्या. लोक चळचळां कांपूं लागले. असा धाक बसवला व बंदोबस्त केला.

दादा हिंदुस्थानांतून आले आणि पुनः त्यांच्या अंगांत वांटणीचें भूत संचारलें. गोविंद शिवराम खाजगीवाले यांनीं मध्यस्थी केली. पण चुलत्यापुतण्यांचे संशय जाईतना. मग कुरडगांवीं दोघांच्या भेटी झाल्या. 'पंचवीस लक्ष रुपये देतो' म्हणतांच दादा ताळ्यावर आले. पण इतक्यावरच थांबलें नाहीं. दादांनीं बंडच केलें. मग धोडपच्या किल्ल्यांत त्यांस माधवरावांनीं गांठिलें. पकडून शनिवारच्या वाड्यांत कैदेंत ठेवावें लागलें. योग्य शिक्षा झाली. दादासाहेबांचा कारभार घरबुडवा होता.

सन १७६९—७० त विसाजी कृष्ण बिनीवाले आणि रामचंद्र गणेश कानडे यांस रावसाहेबांनीं उत्तरेस पाठविलें. त्यांच्या बरोबर पन्नास हजार फौज जमली. महादजी शिंदे व तुकोजी होळकर वर

होतेच. मग या मराठी फौजांनीं जाटाचा पराभव केला. बुंदेलखंडांतील व राजपुतान्यांतील राजांची खोड मोडली. मराठ्यांना पानिपतावर बुडविणारा मुख्य कळसूत्री नजीबखान रोहिला. हा मराठ्यांचा हाडवैरी. याचा सूड घ्यावयाचा. पण दिल्लीचा बादशहा शाहाअलम इंग्रजाकडे गेला होता. त्याला आणण्याला नजीब उपयोगी होता म्हणून मराठ्यांनीं नजीबाशीं मैत्री केली. शाहाआलमाला मराठ्यांनीं दिल्लीच्या तक्तावर बसविलें. मराठ्यांचा अंमल आज दहा वर्षांनीं पुनः दिल्लीवर बसला. पठाणांचा पुढारी अहंमदखान बंगष व रोहिल्यांचा पुढारी हाफिझ रहिमत हेहि मराठ्यांचे पानिपतावरचे जुने दुष्मन्. त्यांचा आतां मराठ्यांनीं हां हां म्हणतां धुव्वा उडविला.

पण मराठ्यांचें नशीब फुटलें होतें. निजाम नमला होता, हैदर हरला होता, व बादशहा त्यांच्या ताब्यांत आला होता. पानिपतची जखम अशी भरून येत चालली होती. तोंच पुनः मराठी राज्यावर आकाशांतून कुऱ्हाड पडली. माधवरावास क्षयानें पछाडलें. ते थेऊरास आले. वैद्य रणछोड, गंगाविष्णु, सर्वांनीं पराकाष्ठा केली. ब्राह्मणभोजनें घातलीं, दानधर्म केले, अनुष्ठानें बसविलीं, हरप्रकार झाले पण फुकट. रायाला वेदना फार होत. म्हणत कीं " खंजीर द्या, सोसत नाहीं, खुपसून मरतों. " मामा, नाना, बापू सर्व मंडळी जमली. सर्वांच्या तोंडचें पाणी पळालें. दादांना कैदेंतून सोडविलें. बापूंना कारभारी केलें. नारायणरावाला रावसाहेबांनीं चार हिताच्या गोष्टी सांगितल्या. आपली पतिव्रता बायको रमाबाई हिला सती जाण्याची अनुज्ञा दिली. सावकारांना बोलावलें. त्यांच्या कर्जाच्या फेडीची व्यवस्था केली. आपण हिंदु, तेव्हां काशीप्रयाग सोडवा म्हणून मंडळीस रावसाहेबांनीं शपथ घातली. हरिपंत फडक्यांवर लोभ फार, त्याला आपलें श्रीवर्धनचें वतन लावून दिलें. कोणास मनाई नाहीं तेव्हां हजारों लोक श्रीमंतांच्या दर्शनाला लोटले. सर्व निरवानिरव केली आणि कार्तिक वद्य अष्टमी शके १६९४ सन १७७२ बुधवारीं प्रातःकाळीं सहा घटका दिवस असतां हा लोक रायांनीं सोडला. "स्मृतींत

गजानन गजानन म्हणत मोठ्या योग्याप्रमाणें नेत्रद्वारें प्राण गेला." रमाबाई आधींच दूध व गोमूत्र पिऊन होती. ती धर्मशिळेवर उभी राहिली. दानधर्म केले. सर्वांचे निरोप तिनें घेतले व सती गेली. "सूर्य मंडळ भेदोन गेली. प्रजेचें छत्र गेलें." मराठी राज्याची आशा व वैभव गेलें! आकाश कोसळलें!!

मर्त गेली. पण कीर्त राहिली. एका पोवाड्यांत म्हटलें आहे:—

एकछत्र करुनि गेले माधवराव ।
थरथरां कांपत होते अष्ट उमराव ।
बसविले हस्तनापुर राज्य पाच्छाव !
दादासि मोकळें केलें राज्य कराव ।
तुटली आयुष्याची दोरी नाहीं उपाव ॥

हें माधवरावांचें चरित्र पहा! त्यांची ममता पहा! त्यांचें शौर्य आठवा! त्यांची शिस्त, त्यांचा न्याय कसा कडक! त्यांची कळकळ केवढी थोर! शब्द कसा कायम! वडिलांचा व विद्वानांचा कसा ते मान राखीत! गुणिजनांचा गुण कसा वाढवीत! लुच्चयालफंग्यांना शिक्षेची जरब कशी बसवीत! अहोरात्र प्रजेच्या कल्याणासाठीं कसे झटत! एकजूट राखावी म्हणून किती तळमळत! ईश्वरावर त्यांची केवढी अढळ निष्ठा होती! त्यांचा धर्म कसा, धाक कसा, धीर केवढा, धोरण कसें! एकेक गुण लाखाचा! म्हणून त्यांना लोक अवतारी पुरुष मानीत.

## ३३. संशयरत्नमाला

उठतां बहु त्वरेनें 'कोठें जातां' असें तुम्हां देवी ॥
पुसती झाली जाणों, पुसतां ज्ञाता पुढें न पद ठेवी ॥ १ ॥
किंवा नारद आला आलापीत स्वकीय सच्चरितें ॥
प्रेमळ गीत तुम्हांला हरि हरिणापरिस बहुत वश करितें ॥ २ ॥
कीं माझें दुर्दैव प्रभुच्या मार्गीत आडवें पडलें ॥
शरणागतभयशमना यास्तव येणें तुझें नसे घडलें ॥ ३ ॥
किंवा मजहुनि दुसरा कोणी बहु दीन दास आढळला ॥
तच्छुभदैवसमीरें त्यावरि करुणाघन प्रभू वळला ॥ ४ ॥
प्रायः सुमुहूर्ताचा शोध करायासि लागला वेळ ॥
होय महत् कार्य परि प्रभुचा तों नित्य सहज हा खेळ ॥ ५ ॥
किंवा तुज एकाकी पाहुनि खळ दैत्य आडवे आले ॥
फुटतां सागर सिकतासेतूचें काय त्यापुढें चाले ॥ ६ ॥
किंवा तुज गुंतविलें भजकीं, परि ते दयार्द्र या रंकीं ॥
उद्धरित्यासि न सज्जन गुंतविती गाय कष्टतां पंकीं ॥ ७ ॥
किंवा चुकतें कांहीं स्तवनीं तेणेंचि मागुता बससी
तरि हें मन्मूर्खत्व प्रभु तूं दोषज्ञ ही तसा नससी ॥ ८ ॥
कीं न श्रवणीं गेली ही माझी हाक, हा कसा तर्क ॥
कशि गुरुजनीं सतीची शिवला ज्या कुमुदिनीस असदर्क ॥ ९ ॥
अथवा स्वस्थचि अससी कीं घेतो नाम रक्षणीं शूर ॥
हें सत्य परि प्रबळहि बळ दुर्बळ जरि रणीं धणी दूर ॥ १० ॥
कीं भीतो भ्रांत वृथा मृगजळमग्नासि काय तारावें ॥
सत्याचि हें परि शिशुचें भय जाया बागुलासि मारावें ॥ ११ ॥
कीं कांहीं व्रतनियमीं बोलों चालों नये असें झालें ॥
तरि दीनरक्षणाहुनि अधिकफळव्रत कधीं मना आलें ॥ १२ ॥

कीं हाक ऐकतांचि प्रभुला हा रक्षणार्हसें वाटे ॥
वाटे या दुःशीलग्रीष्मीं तव नव दयानदी आटे ॥ १३ ॥
किंवा पुराणपुरुषा संप्रति बहु भागलासि या कामीं ॥
तुज नीज लागली तों सजलों मारावयासि हांका मी ॥ १४ ॥
किंवा बरी परीक्षा केल्यावांचूनि न प्रसाद करा ॥
तरि वरि तसाच आंतहि उगाळितां कोळसा प्रयास करा ॥ १५ ॥
कीं धाडिलें पुढें निजनाम करो सर्व सिद्धता आधीं ॥
ऐसें प्रभो म्हणावें तरि तुमचीं चरणसारसें साधीं ॥ १६ ॥
कीं आर्जविला नामप्रतिनिधि हा अमृत उधळितो स्वैर ॥
न पुसे, न भी, न ऐके यास्तव दोघांत लागलें वैर ॥ १७ ॥
कीं संप्रति अभय दिलें कलिला चालावया बरें राज्य ॥
परि कोण प्राणि सदय शिंपील बळें दवानळीं आज्य ॥ १८ ॥
किंवा म्हणसि समर्थोऽहं कर्तुमकर्तुमन्यथाकर्तुं ॥
दीनावनाविळें क्षण देइल दयिता दया कशी वर्तु ॥ १९ ॥
कीं अक्षक्रीडेनें हरिलें मन, सर्व कार्य जी चुकवी ॥
तरि बद्धमूळ एकचि भजदवनव्यसन वर्णिती सुकवी ॥ २० ॥
कीं वैकुंठीं पुष्कळ भक्त, तिळ स्थळ नसे नसावेंची ॥
बसवा पुरें, पुरे कां म्हणतां, धनवंत कण कसा वेंची ॥ २१ ॥
कीं बहु काळ विसरला फारचि संकोचला सखा लाजे ॥
येत असेल हळु हळू म्हणुनचि एकहि न पादुका वाजे ॥ २२ ॥
कीं नाम स्पर्शमणि स्पर्शे परि काय करिल खापर मी ॥
सदयहि घालील कसा दुर्दैवाला सुखीं सखा परमीं ॥ २३ ॥
कीं प्रथम मदपराधें तारूं ना म्हणुनि वाहिल्या आणा ॥
प्रभुजी पुरे प्रतिज्ञा, भारतरणवृत्त तें मनीं आणा ॥ २४ ॥
कीं याचकांसि देतां सरले चारीहि मुक्तिधनराशी ॥
भक्तिच मज द्या, द्यावें देवाला अमृत, योग्य न नराशीं ॥ २५ ॥
कीं मागें गुप्त उभा अससि प्रेमें उभारुनी बाहे ॥
तरि काय बाळकाचें तूं सादर बोल ऐकशी बा हे ॥ २६ ॥

# ३४. हिमालयवर्णन

भव्य अशा सृष्ट किंवा कृत्रिम वस्तूंचें अवलोकन करून जिज्ञासा तृप्त करण्याची हौस सर्वांस असते. पण अतिपरिचियामुळें सन्निध असलेल्या प्रेक्षणीय व वर्णनीय वस्तूंची आपल्या हातून अनेक वेळां अवज्ञा होते; आणि त्या अवज्ञेमुळें त्या वस्तूंच्या दर्शनापासून होणाऱ्या ज्ञानास व आनंदास आपण अंतरतों. हिमालय, सिंधु, गंगा, विंध्य, ब्रह्मपुत्र, सह्याद्रि वगैरे प्रचंड गिरिनद्या अत्यंत प्रेक्षणीय व वर्णनीय असून आमचें लक्ष त्यांकडे जात नाहीं हा चमत्कार नव्हे काय ?

हिंदुस्थानच्या नकाशाकडे पाहिलें असतां, सर्वांआधीं डोळयांत भरणारी हिमालयपर्वताची आकृति होय. या पर्वतामुळें आमचें जें हित होत आहे, त्याची खरी कल्पना फारच थोड्यांस असेल. हा आमच्या उत्तर सीमेवर नसता तर सिंधु, गंगा, ब्रह्मपुत्र वगैरे आमच्या मोठमोठ्या नद्या आमच्या कधींच दृष्टीस न पडत्या, व कदाचित् बंगाल प्रांतही अस्तित्वांत न येता. ज्याप्रमाणें अरबी समुद्र आणि बंगालचा उपसागर यांच्या सान्निध्यामुळें भरतखंडाच्या दक्षिणत्रिकोणार्धाचें नैसर्गिक परिघानें संरक्षण होत आहे त्याप्रमाणें या त्रिकोणाच्या पायाचें म्हणजे उत्तरेचें, आणि या पायाच्या वायव्य व ईशान्य कोनांचें संरक्षण या हिमालयरूप प्रचंड सृष्टतटानें होत आहे. हिंदुस्थानच्या उत्तरप्रदेशाची लांबी कमींत कमी १५०० मैल आहे, व तितक्या लांबीचा दुर्गम तट आमच्या सुदैवानें आम्हांस प्राप्त झाला आहे. असा तट चीन देशाच्या उत्तरेस नसल्यामुळें तेथील लोकांस पुरातन काळीं किती त्रास झाला असावा, हें त्यांनीं तेथें बांधलेल्या विलक्षण भिंतीवरून व्यक्त होतें. आमचा हिमालय जर आम्हांस नसता, तर चिनी लोकांप्रमाणें आम्हांसही लाखों गुलाम शेंपन्नास वर्षें आमच्या उत्तर सीमेचा बंदोबस्त करण्याकरतां राबवावे लागले असते. पण तितका त्रास, निर्दयपणा व खर्च करूनही, जितकी निर्भयता

आतां आहे तितकी आम्हांस कधींही प्राप्त झाली नसती. इतकेंच नाहीं, तर हवा, सुपीकता इत्यादिकांच्या संबंधानें हिमालयाकडून आम्हांवर हजारों वर्षे जे उपकार होत आहेत, तसले त्या मनुष्यकृत भिंताडाकडून कधींच न होते! हिमालय हें एका पर्वताचें नांव आहे व तो हिंदुस्थानाच्या उत्तरेस आहे, एवढेंच ज्यास ठाऊक आहे, त्यास सह्य, विन्ध्य या पर्वतांच्या घटनेवरून असें वाटणार आहे कीं, पृथ्वीच्या त्या विशाल 'मानदंडा' ची रचनाही सामान्य पर्वतासारखीच असावी; पण वास्तविक तशी स्थिति नाहीं. ज्याप्रमाणें हिमालयाचा विस्तार, त्याची उंची, त्यावरील प्राणी, वनस्पति व जमिनी हीं सारीं इतर पर्वतस्थ वस्तूंपेक्षां भिन्न आहेत, त्याचप्रमाणें त्याची रचनाही इतरांच्या रचनेहून फार निराळी आहे. हिमालय हा एक पर्वत नाहीं. तो दोन पर्वतांच्या रांगांनीं झालेला गिरिद्रोण आहे. विमानांत बसून फार उंच गेल्यावर, त्याकडे खालीं वांकून पाहिल्यास तो केळीच्या पानाच्या अफाट दुटाकी द्रोणाप्रमाणें दिसेल. या द्रोणाची एक बाजू हिंदुस्थानाकडे आहे व दुसरी तिबेटाकडे आहे. हिंदुस्थानाकडील बाजू दुसऱ्या बाजूपेक्षां अधिक उंच आहे. हिंदुस्थानाकडूनच या पर्वताची कल्पना जर मनांत आणली तर ज्याची धार हिंदुस्थानाच्या दक्षिणेकडे टेकविली आहे असा एक हा अतिविशाल अमरखड्ग किंवा खंजीर आहे, असें वाटेल. या बाजूस साहेब लोक हिमालयाची दक्षिण भिंत व दुसऱ्या बाजूस उत्तर भिंत म्हणतात. दक्षिण भिंतींत किंवा बाजूंत जीं शिखरें आहेत त्यांची उंची पृथ्वीवरील कोणत्याही शैलशिखराच्या उंचीहून अधिक आहे. हीं शिखरें या बाजूच्या मध्याच्या सुमारास आहेत. सर्वांत उंच शिखरास आमचे लोक गौरीशंकर व इंग्रज लोक मौंट एव्हरेस्ट असें म्हणतात. गौरीशंकराची उंची समुद्रपृष्ठभागापासून २९०५० फुटांहून अधिक आहे. याच्या खालोखाल कांचनगंगा नांवाचें जें दुसरें शिखर आहे, त्याची उंचीदेखील २८००० फुटांपेक्षां अधिक आहे. तेव्हां यांपैकीं कोणत्यावरही जाण्याचा प्रयत्न करणें म्हणजे वातावरणांत

ओळंब्याच्या दोरीस धरून पांच सहा मैलांचा प्रवास करण्यासारखें होय. वातावरणांत जों जों वर जावें तों तों अधिकाधिक थंडी लागते, हें सर्वांना ठाऊक आहेच, व थंडीनें पाणी गोठतें हेंही कोणास ठाऊक नाहीं असें नाहीं. तेव्हां हीं शिखरें नेहमीं हिमाच्छादित म्हणजे बर्फावृत कां असतात, हें सहज लक्षांत येणार आहे. आतां कोणी अशी शंका घेतील कीं, इतक्या उंचीवर एवढा विस्तार झांकण्यासारखें पाणी तरी कोठून येतें? थोडासा विचार केला असतां या शंकेचें समाधान ज्याचें त्यास सहज करतां येणार आहे. बंगालचा उपसागर बंगाल्यास लागून आहे, व या उपसागराच्या विस्तीर्ण विस्तारावर भगवान् सूर्यनारायण आपल्या सहस्ररश्मींनीं नित्य प्रकाशून त्याच्या पाण्याची वाफ करतो. ही वाफ वायुरूपानें बंगालच्यां उपसागरापासून हिमालयापर्यंत वातावरणांतील उच्च प्रदेशांत भटकत असते. वैशाखमास उलटून गेला, आणि दक्षिण ध्रुवाकडून सोंसाट्याचा थंड वारा वाहूं लागला, म्हणजे या आकाशस्थ बाष्पराशींचे सहज सजल मेघ होतात, आणि ते त्याच वेगानें बंगाल प्रांतावर पर्जन्यवृष्टि करीत करीत हिमालयाच्या दक्षिण भिंतीवर धडाधड आदळूं लागतात. त्यांतल्या त्यांत जे बरेच वर असतात ते पलीकडे निसटून निघतात, आणि दक्षिण भिंतीच्या तिबेटाकडील बाजूवर थोडासा वर्षाव करून पुढें पळ काढतात. द्रोण्युदराचें उल्लंघन होईतोंपर्यंत त्यांस आपण आपला रस्ता अडविणाऱ्याच्या कचाट्यांतून सुटलों, असें वाटत असतें. पण त्यांचा हा भ्रम लौकरच नाहींसा होतो. द्रोणीच्या दुसऱ्या बाजूस जाऊन पोहोंचल्याबरोबर दक्षिण भिंतीसारखीच तिकडेही प्रचंड आडवी भिंत लागते, व तिचा भेद करून निघून जाण्यासाठीं ते तीवर मत्त मतंगजांप्रमाणें टकरा देऊं लागतात. पण तिच्या अभेद्य स्थिरत्वापुढें त्यांचें कांहींएक न चालून, ते रडकुंडीस येतात, आणि त्यांच्या डोळ्यांतून अश्रुधारा चालूं लागून, त्यांच्या वर्षाव्रानें त्या बाजूवर वाहूं लागणाऱ्या अश्रुजलाचे लोट द्रोणींत पडूं लागतात. पुढें निसटून जाणाऱ्या ढगांची ही दशा झाली.

पण ज्यांच्या आड मोठमोठीं शिखरें येतात त्यांची त्यांच्या इतर बंधूंहूनही विशेष कष्टमय स्थिति होते. या शिखरावर जी कडक थंडी असते तीमुळें या शिखरांच्या आसमंतात् येणाऱ्या ढगांची जलावस्था नाहींशी होऊन त्यांस पाषाणघनता येते, आणि शिखरांभोंवतीं ते बर्फाचा थर करून राहातात. पुढें सुदैवानें उष्ण मासांत सूर्यास त्यांची कींव आली तर तो त्यांस तेथून सोडविण्याचा प्रयत्न करतो, आणि या त्याच्या प्रयत्नास थोडेंबहुत यश आल्यास ते या किंवा त्या बाजूस घसरत जाऊन इकडील नदीप्रवाहांत, अथवा तिकडील द्रोण्युदरांत जाऊन पडतात, व येथें नद्युदकाशीं एकरूप होऊन आपला जनक जा नदीपति त्याच्याशीं रूपांतरानें येऊन दाखल होतात. हिमालयाच्या उत्तर भिंतीस लागून असलेले काराकोरम वगैरे तिबेटाचे दक्षिण डोंगर आणि सैबेरियाच्या व त्याच्या दरम्यान असलेले क्यूएनल्यूटन नांवाचे डोंगर, चीनचे पर्वत, व हिंदुकुश वगैरे पर्वत आणि खुद्द हिमालय—या सर्वांचा मध्यबिंदु काश्मीरच्या वायव्येस पामीर नांवाचा जो अत्युच्च घाटमाथा आहे, तो आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. या मध्यबिंदूपासून या पर्वतांच्या रांगा विषम त्रिज्यांप्रमाणें आशियाखंडरूप वर्तुलाच्या परिघापर्यंत जाऊन भिडतात. बंगालच्या उपसागरांत व बंगाल प्रांतांत जेवढ्या पाण्याची वाफ होते तेवढी सारी वर गेल्यावर, पर्जन्यरूपानें बंगालच्या मैदानांत किंवा हिमालयाच्या दक्षिणोत्तर भिंतींच्या तीन बाजूंवर फिरून उतरते, किंवा तीपैकीं कांहींचें बर्फ होऊन तेंही उन्हाळ्यांत पुनः हिंदुस्थानाकडे वहात येणाऱ्या नद्यांतच पडतें. यामुळें हिमालयावर जितका पाऊस पडतो, तितका पृथ्वीवर दुसऱ्या कोणत्याही ठिकाणीं पडत नाहीं. अलीकडे या पावसाच्या संबंधानें जीं बिनचूक मापें घेतलीं आहेत, त्यावरून या पर्वतावर प्रतिवर्षीं सरासरीनें ५२३ इंच पाऊस पडत असावा, असें दिसून आलें आहे, व १८६१ त कांहीं विशेष कारणामुळें ८०५ इंच पाऊस पडल्याचा सरकारी दप्तरांत दाखला आहे !

## ३५. रायगडावर काय आहे

राष्ट्राचा इतिहास पूर्ण करणें कर्तव्य हें आपुलें
ज्याच्या निर्मल हृत्पटावर असे हें स्पष्ट रेखाटलें
त्यांनीं रायगडीं प्रवास करुनी घालावयाला भर
त्यामध्यें निजबुद्धिला रमवुनी व्हावें सदा तत्पर १

तेथें काय असे गडावर असें आणा न चित्तीं कदा
तेथें काय नसे मनास अपुल्या ऐसें पुसावें सदा
केलें राज्य शिवाजिनें बनवुनी जें वर्णनीय स्थल
तेथें काय कमी तयास पडतें सद्बुद्धिचें ज्या बल ? २

येतां तो इतिहासकार वरती लेखांप्रती जीववी
कोठें काय असे बघून नयनीं चित्तांत तें सांठवी
भ्रांती दूर करी बघून अवघें, सत्यास घे शोधुनी
या यत्नें शिवरायवृत्त सगळें लोकांस दे सांगुनी ३

येई येथ चरित्रकार तरि तो संजीवनी मेळवी
सांगाड्यामधिं चेतना भरुनिया त्यालागिं तो खेळवी
डोळ्यांनीं बघतां स्थळें मतिलता घे चारुता ती नवी
काळोखांतिल वस्तुला नव जसें सौंदर्य देता रवी ४

आला तो जरि चित्रकार वरती चित्रें जुनीं रंगवी
किंवा नूतन योजुनी निजमनीं काढूनियां दाखवी
टोंकाच्या वरुनी निघे हिरकणी धैर्यें तळीं यावया
किंवा यत्न करी महार वरती जाण्यास काढी तया ५

हर्म्याचा अवशेष भाग लिहुनी दावील तो सज्जनां
किंवा जीर्ण समाधि चित्रिं लिहुनी बोधील त्यांच्या मना
किंवा तो इतिहास रम्य जिववी जो जाहलासे जुना
लोकांचें रमवून चित्त सहजीं मोहील जिज्ञासुंना ६

कोणी कल्पक येथ ये तरि लिही कादंबऱ्या सुंदर
वाचाया झटतील लोक सगळे ठेवूनिया आदर
दावी धीर उदात्त वृत्ति सगळ्या लोकां शिवाच्या जरी
कर्तव्यास करून धन्यपण तो घेईल लोकीं तरी ७

कोणी नाटककार येउनि वरी पाही समाधीप्रती
होतां दर्शन निर्मळीं शिवगुणीं रंगेल त्याची मती
शृंगारादिक सज्जनप्रियरसां त्याच्या चरित्रीं भरी
प्रेमें नूतन नाटकांस रचुनी तल्लीन लोकां करी ८

येथें ये कवि दर्शनार्थ तरि तो चित्तांत दुःखें भरे
भग्ना पाहुनिया समाधि जल तन्नेत्रांतुनी पाझरे
स्फूर्तीचे फुटतील नूतन गमे वाणीस त्याच्या झरे
जैसा पाहुन चंद्रकांत विधुला प्रेमामुळें पाझरे ९

पूर्वीचा इतिहास रम्य सगळा चित्तांत त्याच्या स्फुरे
त्याची लीन मति क्षणीं शिवगुणीं रंगूनिया नावरे
त्याची चित्रचरित्रगायनरसीं वाणी शिवाच्या शिरे
चाखाया रस त्यांतला रसिक ते होतील कीं घाबरे १०

जिज्ञासावशजाल होऊन तरी ज्ञानार्थ जोडाल कीं
प्रेमानें जरि जाल येथ भर ती घालाल मोठी सुखीं
कर्तव्यास मनीं धराल तरि दे उत्साह तुम्हांप्रती
टाका आळस जा वरी बघुन घ्या नेत्रीं शिवाच्या कृती ११

# ३६. धूमकेतु

ग्रह आणि त्यांचे उपग्रह गोल असून ध्रुवांकडे कांहींसे कमीजास्त चपटे झालेले दृष्टीस पडतात. त्यांच्या कक्षा व गति नियमित आहेत. आज अमूक ग्रह कोठें दृष्टीस पडेल इतकेंच निश्चितपणें सांगतां येतें असें नव्हे; तर तो ग्रह एक महिन्यापूर्वीं किंवा शंभर वर्षांपूर्वीं कोठें होता आणि पुढें शंभर किंवा हजार वर्षांनीं कोठें असेल, हेंहि गणित करून खात्रीपूर्वक अगोदर वर्तवितां तेतें. परंतु शेंडेनक्षत्रें किंवा धुमकेतु असें ज्या आकाशस्थ पदार्थांस आपण म्हणतों, त्यांचें सर्वच कांहीं विलक्षण! कित्येक शेंडेनक्षत्रें आकाशांत अकस्मात् आपल्या दृष्टीस पडतात. हीं कोठून आलीं हें कळत नाहीं, व हीं कोणीकडे जाणार हेंहि समजत नाहीं. एकवेळ आपल्या सूर्याजवळ येऊन त्याला वळसा घालून पुन्हा हीं परत गेलीं व एकदा अंतरिक्षांत अंतर्धान पावलीं, म्हणजे हीं पुनरपि मनुष्य जातीच्या कधींही दृष्टीस पडत नाहींत. कांहीं शेंडेनक्षत्रें अशीं आहेत कीं, एक फेरा सूर्याभोंवतीं केल्यावर कांहीं वर्षें मात्र तीं आपणास दिसत नाहींत. आणि जेव्हां तीं पुन्हां दुसरा फेरा करण्याकरितां सूर्याकडे येतात, तेव्हां तीं फिरून आपल्या दृष्टीस पडतात. धूमकेतूंच्या आकृति नाना तऱ्हेच्या असतात. कांहींच्या आकृति पाहतां पाहतां सुद्धां मोठ्या विलक्षण रीतीनें बदलतात. अशा एकाद्या शेंडेनक्षत्राचें चित्र काढण्यास जर एकादा चितारी बसला, तर त्याचें चित्र पुरें झालें न झालें तोंच तें शेंडेनक्षत्र अगदीं निराळ्या आकृतीचें दिसूं लागेल!

अत्यंत दूर अशा अंतरिक्षाचे प्रदेशांत प्रवास करीत असतां सूर्याच्या आकर्षणानें ओढलीं जाऊन हीं शेंडेनक्षत्रें सूर्याकडे येऊं लागतात. प्रथम त्यांची गति फारच मंद असते; परंतु जसजशीं हीं सूर्याच्या जवळ येऊं लागतात, तसतशी त्यांची गति अधिक अधिक होत जाते. सूर्याच्या जवळ त्यांची गति इतकी मोठी होते कीं, तिचा वेग आगगाडीच्या वेगाच्या २०००० पट असतो. आणि कधीं कधीं तर सूर्याच्या

जवळील भागांत एका सेकंदांत ३०० ते ३५० मैल जाण्याइतकी त्यांची गति वाढते. सूर्यापासून परत जातांना शेंडेनक्षत्रांची गति मंद मंद होत जाते. ती इतकी कीं, शेवटीं एका सेकंदांत फक्त ९–१० फूट जाण्याइतकी गति त्यांच्यांत उरते. जणूं काय सूर्याच्या जवळील प्रदेशांत अत्यंत वेगानें चालल्यामुळें हीं शेंडेनक्षत्रें अगदीं थकून जातात, आणि त्यांच्यानें पुढें दर सेकंदांत ९।१० फुटांपेक्षां अधिक प्रवास करवत नाहीं.

शेंडेनक्षत्राचा जो तेजस्वी लहानसा भाग दिसतो त्यास शेंडेनक्षत्राचें डोकें असें म्हणतात किंवा शेंडेनक्षत्राचा तारा असें म्हणतात. या डोक्यासभोंवतींच कांहींसें कमी तेजस्वी अशा थरांचें एक पटल असतें आणि त्यापासूनच शेंडेनक्षत्राची शेंडी फुटलेली असते. शेंडीचा भाग अत्यंत विरल व हलका असतो. शेंडेनक्षत्राच्या आकृति नानाप्रकारच्या चमत्कारिक असतात, हें नुकतेंच सांगितलें आहे. कांहीं शेंडेनक्षत्रांस तीनतीन, चारचार व त्याहूनहि अधिक शेंड्या असतात. कित्येक शेंडेनक्षत्रांस शेंडी मुळींच नसून डोकें मात्र असतें. आणि कांहींस तर शेंडी नसते व डोकेंहि नसतें. धुक्याचा गोलाकार झालेला भाग जसा दिसावा तशीं हीं शेंडेनक्षत्रें दिसतात. ज्यांस शेंडी नसते, आणि ज्यांस शेंडी व डोकेंहि नसतें, अशीं शेंडेनक्षत्रें दुर्बिणींतून मात्र दिसतात, एरवीं दिसत नाहींत.

शेंडेनक्षत्राच्या शेंडीचा एक चमत्कार आहे. ही शेंडी सूर्याच्या उलट दिशेस नेहमीं फिरलेली असते. प्रथम जेव्हां शेंडेनक्षत्र दृष्टीस पडूं लागतें, तेव्हां त्याची शेंडी अगदीं लहान असते, किंवा मुळींच नसते असें म्हटलें तरी चालेल. परंतु जसजसें शेंडेनक्षत्र सूर्याच्या जवळ जवळ येऊं लागतें, तसतशी ही शेंडी वाढत जाते, आणि पुढें वाढतां वाढतां लक्षावधी मैल लांब होते. सूर्याच्या जवळ येऊन त्याला वळसा घालून जेव्हां शेंडेनक्षत्र परत जाऊं लागतें, तेव्हां त्याची शेंडी कमी कमी होत जाते. आणि शेवटीं जसें

तें शिखाहीन अशा स्थितींत प्रथम आपणास दृष्टीस पडतें तसें तें शिखाहीन होऊन आपणांस दिसेनासें होतें. यावरून असें अनुमान काढिलें आहे कीं, शेंडेनक्षत्रें हीं जसजशीं सूर्याच्या जवळ येऊं लागतात, तसतशीं त्यांवरील विरल द्रव्यें सूर्याच्या उष्णतेनें जळून त्यांचा धूर कित्येक मैलपर्यंत एकसारखा अंतरिक्षांत वहात जातो. हें अनुमान जर खरें असेल, तर प्राचीन हिंदु ज्योतिष्यांनीं शेंडेनक्षत्रास "धूमकेतु" ( धुराची पताका धारण करणारा आकाशस्थ पदार्थ ) असें जें नांव दिलें तें अगदीं यथार्थ आहे. शेंडेनक्षत्रांच्या कक्षा-सूर्याभोंवतीं फिरण्याचे मार्ग—ग्रहांच्या कक्षांपेक्षां अत्यंत दीर्घ वर्तुलाकार आहेत. कांहींच्या कक्षा तर इतक्या दीर्घ वर्तुलाकार आहेत कीं, एकवेळ सूर्याजवळ येऊन परत गेल्यावर पुन्हां सूर्याकडे येण्यास त्यांस हजारों, लक्षावधि वर्षें लागावींत असें अनुमान निघतें; आणि कित्येक तर फिरून सूर्याकडे मुळींच येऊं शकणार नाहींत असें म्हणतात. ज्या शेंडेनक्षत्रांच्या कक्षा कळल्या आहेत तीं शेंडेनक्षत्रें एक वेळ फिरून गेल्यावर पुन्हां सूर्याकडे केव्हां येतील हें बहुतेक निश्चितपणें सांगतां येतें.

शेंडेनक्षत्रांवरील पदार्थ कोणत्या स्थितींत आहेत याविषयीं विद्वानांचीं भिन्न भिन्न मतें आहेत. तथापि, इतकें खरें आहे कीं, शेंडेनक्षत्रें ग्रहाप्रमाणें जड नाहींत; तीं फार हलकीं व विरल आहेत. ग्रहाचें, उपग्रहाचें, आणि सूर्याचें वजन काढितां येतें, परंतु कांहीं केलें तरी शेंडेनक्षत्रांचें वजन काढितां येत नाहीं. यावरून शेंडेनक्षत्रें हीं ज्या पदार्थांचीं झालेलीं आहेत, ते पदार्थ अत्यंत विरल असावेत हें उघड आहे. तसेंच, शेंडेनक्षत्रांच्या कित्येक हजार मैलपर्यंत जाड अशा शेंडींतूनही पलीकडचे तारे स्पष्ट दृष्टीस पडतात. परंतु १००—२०० फुटांच्या जाडीच्या ढगांनीं तारेच काय पण आपला प्रचंड सूर्य देखील आच्छादिला जाऊन दिसेनासा होतो. यावरून ढगांपेक्षांही शेंकडोंपट—हजारोंपट—विरल अशा द्रव्यांचीं शेंडेनक्षत्रें व त्यांच्या शेंड्या बनलेल्या आहेत हें सिद्ध होतें.

कित्येक शेंडेनक्षत्रांच्या कक्षा व प्रदक्षिणेचा काळ हीं कळलीं आहेत. एंकीचें शेंडेनक्षत्र हें त्यांपैकीं एक आहे. एंकी या नांवाच्या प्रसिद्ध ज्योतिषानें एक धूमकेतु दुर्बिणीच्या साहाय्यानें शोधून काढला, व सूर्याभोंवतीं त्याची एक प्रदक्षिणा होण्यास किती काळ लागतो हें वर्तविलें. म्हणून यास एंकीचा धूमकेतू किंवा एंकीचें शेंडेनक्षत्र म्हणतात. या शेंडेनक्षत्राची कक्षा चांगली कळली आहे. त्यावरून त्याच्या प्रदक्षिणेचा काळ समजला आहे. सूर्याभोंवतीं फिरण्यास या शेंडेनक्षत्रास सुमारें ३$\frac{1}{3}$ वर्षें लागतात. एंकीच्या शेंडेनक्षत्राची कक्षा एका बाजूस गुरूच्या कक्षेच्या जवळजवळ गेली आहे, व दुसऱ्या बाजूस बुधाच्या कक्षेच्याही आंत सूर्याच्या जवळजवळ आली आहे. म्हणून हें शेंडेनक्षत्र सूर्यापासून अत्यंत दूर असतें, तेव्हां ३८ कोटी ७० लक्ष मैलांवर असतें; आणि सूर्याचें जवळ येतें, तेव्हां फक्त ३ कोटी २० लक्ष मैलांवर असतें. हें शेंडेनक्षत्र नुसत्या डोळ्यांनीं दिसत नाहीं. दुर्बिणीनें मात्र दिसतें. यास शेंडी नाहीं व डोकेंही नाहीं. धुक्याच्या गोळ्यासारखें हें दिसतें.

हॅलेच्या शेंडेनक्षत्रास सूर्याभोंवतीं फिरण्यास सुमारें ७५ ७६ वर्षें लागतात. या शेंडेनक्षत्राच्या प्रदक्षिणेचा काळ हॅले या नामांकित इंग्लिश ज्योतिषानें गणित करून काढिला. म्हणून यास हॅलेचें शेंडेनक्षत्र म्हणतात. हें शेंडेनक्षत्र सन १८३५ सालीं दृष्टीस पडलें होतें. पुनः सन १९१० सालीं दृष्टीस पडलें. याची कक्षा एका बाजूस इतकी लांब गेली आहे कीं, सूर्यमालेंतील अत्यंत शेवटला ग्रह जो नेपृच्यून त्याच्या कक्षेच्याहि पलीकडे दूर हें शेंडेनक्षत्र जातें. जेव्हां शेंडेनक्षत्र सूर्यापासून अत्यंत दूर जातें, तेव्हां तें ३ अब्ज २० कोटी मैल अंतरावर असतें; आणि जेव्हां सूर्याच्या अगदीं जवळ येतें तेव्हां फक्त ५$\frac{1}{2}$ कोटी मैल दूर असतें.

सन १६८० सालीं एक मोठें शेंडेनक्षत्र दृष्टीस पडलें होतें. हें सूर्याच्या इतकें जवळ गेलें होतें कीं, त्यावरून गणित करून प्रख्यात

ज्योतिषी न्यूटन यानें असें अनुमान केलें कीं, या शेंडेनक्षत्रास सूर्याभोंवतीं एक फेरा करण्यास सुमारें ८९१४ वर्षे लागतील! म्हणजे हें शेंडेनक्षत्र इ. स. १०४८४ या वर्षी पुन्हा मानवी प्राण्यांस दृष्टीस पडेल! सन १८४४ सालीं जें शेंडेनक्षत्र पाहाण्यांत आलें, त्याविषयीं गणितानें असें काढलें आहे कीं, या शेंडेनक्षत्रास पुन्हा सूर्याकडे येण्यास एक लक्षाहूनहि अधिक वर्षे लागतील! हें गणित जर कदाचित् बरोबर असेल तर या शेंडेनक्षत्राचें दर्शन इ. स. १०१८४४ या सालीं जे मनुष्यप्राणी असतील त्यांस होणार! हा एक लक्ष वर्षांचा प्रदक्षिणा-काळ जर खरा असेल, तर सूर्यापासून ४०० अब्ज मैलपर्यंत दूर अंतरालांत हें शेंडेनक्षत्र जात असावें असें होईल!

प्राचीन काळीं शेंडेनक्षत्र दिसणें म्हणजे मोठें दुश्चिन्ह आहे असें लोक समजत असत. अद्यापहि कित्येक देशांत असें समजतात कीं, शेंडेनक्षत्र आकाशांत दिसूं लागलें म्हणजे राजास कांहीं अनिष्ट येणार आहे, किंवा राज्यक्रांति होणार आहे, किंवा दुष्काळ पडणार आहे, आणि त्याचें हें सूचक आहे. आपल्या देशांतहि पुष्कळ लोकांची समजूत अशीच आहे. ज्योतिषशास्त्राचें ज्ञान जसजसें लोकांस जास्त होत जाईल, तसतशा असल्या भ्रांतिमूलक समजुती जाऊन शेंडेनक्षत्रा-विषयीं जी लोकांस इतकी भीति वाटते ती वाटणार नाहीं; आणि हे विलक्षण पदार्थ जेव्हां जेव्हां अंतरिक्षांत दिसूं लागतील तेव्हां तेव्हां ते पाहण्यास लोकांस भीति न वाटतां मौजच अधिक वाटेल.

## २७. लव्हाळीं

खड्याच्या पायाशीं नईच्या[1] थडींत
जन्मलीं गाऱ्यांत लव्हाळीं हीं
नांव गांव कांहीं रंगरूप नाहीं
फळें फुलें तींही कोठचीं त्यां ?
बेंडकोळ्या सदा ड्रॉंड्रॉंवती भोंतीं
आंतुन टोंचतीं क्षुद्र जन्तु
सोसूनिया परी सर्वही आघात
दिन कंठितात शांत चित्तें ! १

नईच्या लाडक्या लेकी—लहरींशीं
चाले अहर्निशीं खेळ त्यांचा
रानावनांतील देवतांचीं बाळें
शृंगाराचे चाळे साधे त्यांच्या
अंगा घुसळीत सदा वीची येती
चरणां लागती प्रेमभावें
अनुनयें त्यांच्या आनंदुनी चित्तीं
मान डोलवितीं लव्हाळीं हीं २

आतिथि कोणीही घरालागिं येतां
नमस्कारिती त्यां आदरोनि
प्रेमसरिताच्या पुरीं नाहतांना
वांकविती माना नम्रतेनें
राग द्वेष सारा सांडूनिया दूर
करिती संसार समाधानें
कौतुक तयांचें करील ना कोण
सदा पायीं लीन लोकांच्या जे ? ३

---

१ नदीच्या

# ३८. वसईची मोहीम

हिंदुस्थानांत युरोपियन लोक व्यापाराकरितां येऊन ठाणीं करून राहूं लागले. त्यास मूळ आरंभ पोर्तुगीज लोकांपासून झाला. त्यांचा मुख्य सरदार व्हास्को डि गामा हा पहिल्यानें कालिकोट बंदरावर आला. तेथून या लोकांनीं पाय पसरण्यास सुरुवात केली. गोवें प्रांत व हल्लींच्या ठाणें जिल्ह्याचा सर्व पश्चिम भागही हळूहळू त्यांच्या ताब्यांत आले. या लोकांत धर्मवेड फार होतें. त्यामुळें त्यांच्या राज्यांतलि हिंदू प्रजेस फार त्रास होऊं लागला. "जमीनदारांचीं वतनें बुडविलीं, गांवचे गांव घेऊन बाटविले, किरिस्ताव केले. घरांत कोणी नसलें तर पोरें नेऊन बाटवावीं." पोर्तुगीजांनीं आरंभिलेला हा धर्मच्छळ संभाजीच्या कारकीर्दीपासून चालला होता. लोक पोर्तुगीजांच्या जुलुमास अगदीं कंटाळून गेले. वसईचे देसाई व देशपांडे यांनीं प्रांतास होत असलेला हा छळ पेशव्यांच्या कानावर घातला व पोर्तुगीजांच्या जुलुमापासून सुटका करण्याची आग्रहपूर्वक विनंति केली. बाजीराव, चिमाजीआप्पा यांनीं 'सवड सांपडतांच पोर्तुगीजांचें कार्य हातीं घेतों' अशीं त्यांस उत्तरें पाठविलीं. परंतु पेशवे हबशीप्रकरणांत गुंतल्यामुळें त्यांस वेळ सांपडला नाहीं. या प्रकरणांतून मोकळें झाल्यावर चिमाजीआप्पानें पोर्तुगीजांचा समाचार घेण्याचा निश्चय केला.

सन १७३७ च्या चैत्र महिन्यांत कोंकणांत जाऊन चिमाजीनें पोर्तुगीजांचीं साष्टी बेटांतील ठाणीं घेण्याचा सपाटा चालविला. ठाणें, बेलापर, वेसावें आणि साष्टी इतक्या जागा सर केल्या. मराठ्यांच्या झालेल्या या जयानें पोर्तुगीज लोक अगदीं चिरडीस आले व त्यांनीं पावसाळा संपल्यावर मराठ्यांकडून, आपला गेलेला मुलूख परत मिळविण्याकरितां मोठी जोरांत तयारी चालविली. पोर्तुगीजांनीं आपलें आरमार आणिलें व केळवें—माहिम येथील मराठे लोकांस शह दिला.

ही बातमी पुण्यास कळतांच खुद्द चिमाची आप्पा कोंकणांत उतरला व त्यानें पोर्तुगीजांचा वसई प्रांतांतील अम्मल पुरा उठविण्याचा निश्चय केला. त्यानें मराठे सरदारांस निरानिराळीं ठाणीं हस्तगत करण्यास पाठविलें. थोड्याच दिवसांत जयाचीं वर्तमानें येऊं लागलीं. राणोजी शिंद्यानें डहाणू घेतलें. तारापुरास तर मोठी निकराची लढाई होऊन तींत बाजी भिवराव रेटरेकर पडला, पण शेवटीं तें स्थळ मराठ्यांच्या हस्तगत झालेंच. अशी फत्ते झाली. वेसवें घेतल्याचें खंडेरावाकडून पत्र आलें. अशीं भराभर स्थळें कायम झालीं. शेवटीं एका वसईखेरीज पोर्तुगीजांकडे कांहीं राहिलें नाहीं. तेव्हां चिमाजी आप्पानें शके १६६० माघ शुद्ध १० मीस म्हणजे इ. स. १७३९ त वसईस वेढा घातला.

वसई मोठी बळकट जागा पश्चिमेस व दक्षिणेस खाडी पूर्वेकडून चिखल. यामुळें दोहोंकडूनही हल्ला करणें अशक्य होतें. एकट्या उत्तरेकडून हल्ला करावयाचा तर तिकडेही वाळू होती. त्यामुळें त्रास फार होई. मराठ्यांनीं मोर्चे लाविले, वर तोफा ठेवण्याकरितां धमधमे राचिले व सुरुंगहि चालविले पण पोर्तुगीजांच्या बंदुकीपुढें कांहीं चालेना. दोन महिन झाले तरी जयाचें कांहींच चिन्ह दिसेना. आप्पानें तर निश्चय केला होता कीं, ‘ वसई घेतल्याशिवाय परत फिरणार नाहीं. ’ त्यानें सरदार लोकांस बोलावून म्हटलें: “ माझें डोकें उडवून तरी वसईच्या किल्ल्यांत टाका.” या आप्पाच्या निर्वाणीच्या शब्दांनीं मराठे लोकांस स्फुरण चढलें व लागलीच वसईचें काम ताबडतोब शेवटास नेण्याच्या खटपटीस ते लागले. दहा सुरुंग तयार केले होते. वैशाख शुद्ध पंचमीच्या दिवशीं सर्व बेत ठरून षष्ठीस हल्ल्याचे लोक तयार झाले. व डावे बाजूकडील सुरुंगास बत्त्या दिल्या. अर्धवट सुरुंग उडाले व कांहीं लोक घाईनें तसेच वर चढून गेले. इतक्यांत उरलेले सुरुंग उडाले व सर्व लोक वायां गेले. उजवे बाजूकडील सुरुंग उडाले व बुरुजांस वाट झाली, हें पाहतांच कांहीं लोक वर चढले, पण याहि बाजूस फिरून सुरुंग उडाले व चढलेले

लोक वर उडून नाश पावले. दोन्ही ठिकाणीं नाश झाल्यामुळें लोक कच खाऊं लागले. परंतु मल्हारराव होळकरानें केलेला सुरुंग अजून उडावयाचा होता. तो सुरुंग उडतांच किल्ल्यावर निशाणें लावण्याचा बेत करून सप्तमीच्या दिवशीं उडविला. तो उडतांच अर्धा बुरुज कोसळला. त्याबरोबर मराठे वर चढले व हल्ल्यास सुरुवात केली. पोर्तुगीज लोकांनीं आंतून फिरून तोफांचा मारा केला, पण मराठे त्या बुरुजावरून हटेनात. तेव्हां नाइलाज होऊन अष्टमीस प्रहर दिवसास पोर्तुगीज किल्ला सोडण्यास तयार झाले. आठ दिवसांच्या आंत पोर्तुगीजांनीं सर्व चीज-वस्तु घेऊन चालतें व्हावें असा करार झाला. येणेंप्रमाणें शके १६६१ वैशाख शुद्ध ८ मीस मराठ्यांचें निशाण किल्ल्यावर फडकूं लागलें.

* * *

मराठ्यांच्या इतिहासामध्यें अतुल पराक्रम, अचाट साहस, अलौकिक तेज, अद्वितीय रणोत्सव, आणि अपार स्वाभिमान हे गुण व्यक्त करणारे जे कांहीं युद्धप्रसंग प्रसिद्ध आहेत त्यांमध्यें वसईचा रणसंग्राम अग्रस्थानीं गणण्यासारखा आहे यांत शंका नाहीं. फिरंगी लोकांनीं हिंदु धर्माचा व हिंदु प्रजेचा अत्यंत छळ केला म्हणून संतप्त झालेले निस्सीम स्वधर्माभिमानी महाराष्ट्र वीर एकत्र होऊन दृढ निश्चयानें शत्रूस जिंकण्याकरितां वसईवर चढाई करून गेले, व तेथें मोठ्या आवेशानें तीन महिनेपर्यंत सतत अग्निगोलांचा भयंकर वर्षाव होत असतांहि वेढा देऊन बसले आणि अखेर आपल्या बाहुबलानें शत्रूस पादाक्रांत करून वसईवर आपला स्वधर्मसंरक्षणाचा बाणा दाखविणारा भगवा झेंडा फडकविण्यास समर्थ झाले; हा वीररसानें ओतप्रोत भरलेला वृत्तांत ऐकून ज्याचें अंतःकरण आनंदानें व कौतुकानें थक्क होणार नाहीं असा मनुष्य विरळा !

## ३९. कृष्णाकुमारी

कळी--उमलली जों न पावली पूर्ण विकासाला
अदय कराचा तोंच तिजवरी पडला कीं घाला.
सुनील गगनीं चमकूं लागे सुंदर इंदुकला
तोंच तिचा निर्घृण राहूनें धरिला हाय, गळा !
भीमनृपाला प्रियतर बाळा कृष्णा वेल्हाळा,
नडली, पडली बळी अकालीं, त्यायोगें काळा
स्वार्थ संसृती, लोभपरायण जगताची रीती
उठे सुतेवर पिता हितास्तव विसर नयनीती

२

उपवर झाली भीमकबाळी रूपवती कृष्णा
तत्प्राप्तीस्तव सहज लागली भूपवरां तृष्णा
जयपुरराजा म्हणे गुणवती व्हावी मज भाजा
जोधपूरचा भूप म्हणे तो भाग असे माझा.
शिंद्याच्या जोरावर चढला मारवाडवाला
वांछी व्हावी प्राप्त आपणा कृष्णेची माला
जयपुरची मागणी तयानें धाकें परतविली;
राजस्थानीं वैरागीची ज्वाला भडकविली;
कृष्णेसाठीं सज्ज जाहले खड्गाचे हात
घोर युद्ध माजलें वाहले रक्ताचे पाट !

३

अमीर नामा पठाण घातक, ये भीमापाशीं
वदे हितास्तव करा स्वदुहिता अर्पण मानासी
अथवा खंडूनच हें टाका मूळ अनर्थाचें
कां कारण होतां पाडाया बळी सहस्रांचे ?

विचार पडला कसा पोटचा गोळा तोडावा
चुकवावें वा काय उपायें शत्रूंच्या घावा
चालक, मंत्री अजित नृपाचा तोचि मार्ग दावी;
'समयींच' म्हणे 'ही अग्नीची ज्योत मालवावी !'
आप्त जवळचा दौलत त्यावर ये ती कामगिरी
कोसळून आकाश गमे त्या पडलें काय शिरीं !
" धिक्कार असो ! " वदे " जीविता तुमच्या धिक्कार
व्यर्थ जन्म घेऊन जाहलां धरणीला भार
छत्र शिरीं मिरवितां, म्हणवितां स्वतां लोकपाळ
पोर एक पोटची तिचाहि न करवे सांभाळ !
हाच काय पुरुषार्थ ? कुलाचा हाच काय मान ?
पुरुष सजावा कीं अबलेची कापाया मान !
रजपूतांचे छावे आम्ही अबलांचे साथी,
वागवितों तलवार कटीला नित्य तयांसाठीं.
वदा कोण त्या मृणालिनीच्या जीवावर उठला ?
तद्रक्ताचा तिच्या कपाळीं लाविन खास टिळा.
पडेल जेथें मृगनयनेचा अश्रुबिंदु एक,
अरिरुधिरानें त्या स्थानावर लिहूं सूड लेख
नको बुद्धि ती, नका अमंगल वच तें उच्चारूं
धीर न सोडा; धर्म आपुला रणीं मरूं—मारूं. "

४

दौलत थिजला; परि न खलांचा दुष्ट यत्न थिझला
जवान दुसरा ती नव कलिका तोडाया सजला !

करूनियां निर्धार मनाचा, धरून तलवार
गेला कृष्णेजवळ नीच तो करावया वार !
करीत होती हार फुलांचा जाईच्या रमणी
जणों करी स्वकरें तरुणांचीं हृदयें बद्ध गुणीं
तिच्या दिव्य तेजानें दिपला, भरला कंप करीं
उगारलेलें शस्त्र तयाचें गळलें भूमिवरी !
टिकलें पुण्यप्रभावापुढें नाहीं पळ दुरित
भग्नमनोरथ परत दुरात्मा गेला थरथरत

५

गळून पडलें शस्त्र पुढें तें निशाण मरणाचें
धरून जें स्वकरीं भूमिवरी स्वैर मरण नाचे !
परि नाहीं ती धैर्यदेवता तिळभर डगमगली
मधु स्मिताची खळी कपोलीं उलट तिच्या पडली !
परि मातेनें तिच्या मांडिला एकच आकांत
मातृहृदय तें करील कैसा सहन सुताघात !
पिटी उरःस्थल कुंतल तोडी, कर माथां हाणी,
धाय मोकलुनि रडे, धरेला अश्रूंनीं न्हाणी.

६

पाषाणालाही शोकानें त्या पाझर फुटता,
परि न तयानें वळले खळ ते, त्यजी न विषकटुता !
शस्त्र न चाले म्हणुनि विषानें भरलेली वाटी
आणून दिली जनकाज्ञेनें कृष्णेच्या हातीं !
स्मितवदनानें करीं विषाचा धरून तो प्याला
पदरें नयन पुशी मातेचे वदे वीरबाला:—

" कां करिसी हा शोक ? आणिसी कां नयनीं पाणी
कवण वांचला सांग, भूवरी आजवरी प्राणी !
मृत्यु सखा सोयरा जिवाचा असे सदा साथी !
मृत्युबलानें तुटे भवाची दुःखाची गांठी !
वाट जिवाला चिरसौख्याची मृत्यु मात्र दावी
वद, मग आली मरणाची कां संधि घालवावी ?
जन्म जयानें दिला तोच या जीवाचा स्वामी
भाग्यवंत ती, पडे संकटीं जनकाच्या कामीं !
धिग् जीवित ! ज्याकारितां पडती बळी असंख्यांचे
मरण यशाचें, जर त्यायोगें देशधर्म वांचे. "

७

देऊन असा धीर, विषाचा घेई ती घोट
माहमूढ मातेस नावरे अश्रूंचा लोट !
एकदोनदां घोट विषाचा नाहीं तिज पचला
दुष्टांनीं यास्तव नाशाचा बेत नवा रचिला !
हाय ! कुसुंबा प्याया धरिला पुढें तिच्या ओठीं
मालविली यापरी खलांनीं ती रत्नज्योती
केला, अनुमोदिला जयांनीं कृष्णेचा अंत
त्यां शासाया चुकला नाहीं न्यायी भगवंत !
जसें करावें, तसें भरावें बीज तसे दाणे !
'विनायका'ला बोध करी हा कृष्णेचें गाणें.

# ४०. प्राचीन शिक्षणपद्धति

गुरूनें शिष्याचें उपनयन करून त्याला वेदाध्ययन आणि शुद्ध आचार शिकवावे. गुरूच्या घरीं वेदाध्ययन पूर्ण होईपर्यंत या मुलांनीं रहावयाचें असे. आणि स्मृतिकालीं मुलींचें उपनयन जरी बंद झालें असलें तरी प्राचीनकाळीं त्यांचेंही उपनयन करीत असत असें दिसतें. उपनयन हा अध्ययन सुरूं करण्याच्या पूर्वीं करण्याचा संस्कार आहे आणि त्रैवर्णिकांना उपनयन आवश्यक आहे असें म्हणणें म्हणजे प्रत्येक मुलानें शिक्षण घेणें हें त्यावेळीं आवश्यक होतें असा त्याचा अर्थ होतो. अध्यापनाप्रीत्यर्थ विद्यार्थ्यानें गुरूला कांहीं दिलेंच पाहिजे अशीहि भक्ति नव्हती. अध्ययन समाप्त झाल्यानंतर ज्याची जशी शक्ति असेल त्याप्रमाणें गुरूला कांहीं तरी देऊन गुरुगृह सोडावें असा नियम असे. ब्राह्मणानें गाय, क्षत्रियानें गांव, व वैश्यानें घोडा द्यावा, असें कात्यायनानें सांगितलें आहे. हें देण्याची ज्यास शक्ति नसेल त्यानें, मनूनें सांगितल्याप्रमाणें धान्य, वस्त्रें किंवा भाजी द्यावी. पण तेवढेंही सामर्थ्य नसल्यास कांहीं एक न देतां त्यांची आज्ञा घेऊन स्नान करावें, असें विज्ञानेश्वरानें सांगितलें आहे. याचा अर्थ असा होतो कीं, आमच्या धर्माप्रमाणें शिक्षण हें सर्वांना आवश्यक असूनही विनामूल्य मिळत असे, आणि हें शिक्षण ज्या ठिकाणीं मिळत असे तीं गुरुकुलें नगरांतील गोंगाटापासून दूर परंतु नगरापासून फार लांब नाहीं अशा ठिकाणीं एखाद्या नदीच्या कांठीं, गर्द झाडीमध्यें वसलेलीं असत. तेथील सर्वच वातावरण अत्यंत शांत, पवित्र आणि रमणीय असें असे, आणि तें तसेंच राहो अशी काळजी स्वतः राजासुद्धां घेत असे. गुरुकुलाच्या मर्यादेंत असलेल्या मृगादिकांची शिकार राजा स्वतःसुद्धां करीत नसे आणि गुरुकुलांतील लोकांच्या स्वास्थ्याची काळजी राजा नेहमीं वाही. तेथील विद्यार्थी पहांटेस उठून स्नान करून संध्या वगैरे करीत. संध्या नदीच्या कांठीं करणें फारच प्रशस्त होय. द्विजास व

त्यांतूनही ब्राह्मणास ही उपासना अतिशय आवश्यक आहे असें विज्ञानेश्वर म्हणतो. संध्योपासना ही सूर्याची उपासना आहे. सूर्याला अर्घ्य देणें, गायत्री मंत्र म्हणून सवित्याच्या श्रेष्ठ अशा तेजाचें ध्यान करणें, त्या तेजाप्रमाणेंच तेजस्वी अशी बुद्धि सवित्यापासून आपल्याला मिळते अशी श्रद्धा ठेवणें व अशी बुद्धि देणाऱ्या सूर्याची प्रार्थना करणें ह्या संध्येंतलि प्रमुख गोष्टी आहेत. प्रातःकाळीं उठून नदीवर स्नान करून सूर्याची उपासना करणाऱ्या आणि नंतर अग्निकार्य करून वडील माणसांना नमस्कार करणाऱ्या ब्रह्मचाऱ्याचें शरीर, मन आणि बुद्धि हीं तेजस्वी व्हावीं यांत काय नवल ? हीं कृत्यें संपल्यानंतर विद्यार्थी अध्ययनाला प्रारंभ करीत. आणि तो करतांना गुरु आणि विद्यार्थी जो मंत्र म्हणत म्हणत त्यावरून त्यांच्या अध्ययनाच्या ध्येयाची कल्पना येते. सह नौ अवतु । सह नौ भनक्तु । सह वीर्यं करवावहै । तेजस्वी नौ अधीतमस्तु मा विद्विषावहै । शांतिः शांतिः शांतिः । या मंत्रानें अध्ययनाला प्रारंभ करण्यांत येत असे. प्रथमतःच परमेश्वर आमचें दोघांचेंही रक्षण करो असें म्हणून ईश्वराविषयींची आस्तिक्यबुद्धि प्रकट केली आहे. ईश्वराची कृपा नसेल तर मनुष्याच्या प्रयत्नांना यश येत नाहीं म्हणून त्याची आपल्यावर कृपा असावी अशी प्रार्थना केल्यानंतर त्यानें आम्हां दोघांकडून सेवा घ्यावी अशी इच्छा व्यक्त केली आहे. ईश्वरानें आपलें रक्षण करावें, आपल्यावर कृपा करावी अशी जर इच्छा असेल तर उलट ईश्वराचीही आपण सेवा केली पाहिजे; आणि ईश्वराला जें कार्य प्रिय आहे तें कार्य यथाशक्ति करूनच सेवा होण्यासारखी आहे. ईश्वराचें कार्य " परित्राणाय साधूनां विनाशाय च दुष्कृताम् । धर्मसंस्थापनार्थाय " असें त्रिविध आहे. आणि या त्रिविध कार्यांत सहाय्यभूत होऊन ईश्वराची सेवा करावयाची असेल, तर त्याला पराक्रमाची आवश्यकता आहे. म्हणून " सहवीर्यं करवावहै ' या चरणांत आमच्याकडून पराक्रमांचीं कृत्यें घडोत अशी इच्छा व्यक्त केली आहे. पण हीं धाडसाचीं आणि पराक्रमी कृत्यें

करण्याची स्फूर्ति तरुणांमध्यें निर्माण होणें हें त्यांना मिळत असलेल्या शिक्षणावर अवलंबून असल्यामुळें आमचें शिक्षण तेजस्वी असो अशी इच्छा "तेजस्वि नौ अधीतमस्तु" या चरणांत व्यक्त केली आहे. सर्वांत पराक्रम यशस्वी होण्याला जर कोणती आवश्यक गोष्ट असेल तर परस्परांतील द्वेषाचा अभाव ही होय. द्वेषाचा आणि मत्सराचा ज्या लोकांच्या मनांत बुजबुजाट झाला आहे त्यांच्या हातून पराक्रम होणें शक्य नसल्यामुळें "मा विद्विषावहै" या चरणामध्यें आम्ही परस्परांचा कधींही द्वेष करूं नये अशी मागणी मागितली आहे. तात्पर्य, ईश्वराच्या ठिकाणीं निष्ठा, त्याची सेवा करण्याची इच्छा, पराक्रमाची हौस, तेजस्वी अध्ययनाची गोडी, आणि परस्परांचा द्वेष न करतां सर्वांनीं मिळून काम करण्याची प्रवृत्ति ह्या सर्व गोष्टी या मंत्रांत प्रतिबिंबित झाल्या आहेत. अशा तऱ्हेचीं थोर ध्येयें डोळयापुढें ठेवून अध्ययन, अध्यापन करणाऱ्या गुरुशिष्यांनीं वैयक्तिक, सामाजिक आणि राष्ट्रीय शांति प्रस्थापित करावी यांत कांहीं आश्चर्य नाहीं.

वेदाध्ययन संपून विद्यार्थी घरीं जाण्यास निघाला म्हणजे गुरु त्याला जो उपदेश करीत तोही महत्त्वाचा आहे. "सत्यं वद। धर्मं चर। स्वाध्यायान्मा प्रमदः। सत्यान्न प्रमदितव्यम्। धर्मान्न प्रमदितव्यम्। कुशलान्न प्रमदितव्यम्। भूत्यै न प्रमदितव्यम्। स्वाध्यायप्रवचनाभ्यां न प्रमदितव्यम्। देवपितृकार्यान्न प्रमदितव्यम्। मातृदेवो भव। पितृदेवो भव। आचार्यदेवो भव। अतिथिदेवो भव। यानि अनवद्यानि कर्माणि तानि सेवितव्यानि। नो इतराणि। यानि अस्माकं सुचरितानि तानि त्वया उपास्यानि नो इतराणि।" या मंत्रांतील सत्य बोलण्याविषयीं आणि सत्यापासून केव्हांही न ढळण्याविषयीं केलेला उपदेश, तसेंच गुरु आणि पिता यांच्याही वरती मातेला दिलेलें स्थान आणि आमचीं जीं चांगलीं कर्में असतील तेवढींच तुम्हीं घ्या, इतर घेऊं नका असें सांगण्यांतील प्रांजलपणा महत्त्वाचा आहे. मनूप्रमाणेंच याज्ञवल्क्यानेंही सांगितलें आहे कीं,

मद्य, बकऱ्याचें वगैरे मांस, आपलें किंवा दुसऱ्याचें उष्टें, निष्ठुर भाषण, जीवांचा वध, अश्लील व असत्य भाषण, दुसऱ्यामध्यें विद्यमान किंवा अविद्यमान दोषांचें कथन, अंगास उटी लावणें, गळ्यांत माळा घालणें, दिवसा निजणें, छत्री घेणें, काम, क्रोध, लोभ, मोह, वाद्यें वाजविणें, अंगास उटणें लावून उष्णोदकानें स्नान करणें, अति हर्ष, नृत्य, गीत इत्यादि गोष्टी ब्रह्मचाऱ्यानें वर्ज कराव्या. हें ब्रह्मचर्यपालनाला अत्यंत आवश्यक आहे. ज्या रीतीचें खाणें आपण खावें त्या रीतीचीं द्रव्यें शरिरांत उत्पन्न होतात. तामस खाण्यानें तमोविकार उत्पन्न होतात. राजस खाण्यानें वृत्ति रजोगुणी बनते व सात्त्विक खाण्यानें वृत्ति सात्त्विक बनते.

आयुष्य, सात्त्विकवृत्ति, बल, आरोग्य, सुख आणि प्रीति हीं वाढविणारे, रसयुक्त, स्निग्ध, शरिरांत मुरून चिरकाल राहणारे आणि मनाला आनंद दायक आहार सात्त्विक मनुष्याला आवडतात. तिखट, आंबट, खारट, अति उष्ण, झणझणीत, रुक्ष, दाहकारक आणि दुःख, शोक व रोग उत्पन्न करणारे आहार राजस पुरुषाला आवडतात. निवालेलें, नीरस, दुर्गंधी, शिळें झालेलें, उष्टें आणि अपवित्र अन्न तामसी माणसांना आवडतें. आपला मेंदु हें बुद्धीचें स्थान आहे. आपण लहानपणा-पासून जें अन्न खातों त्यानें तो बनत असतो. हें अन्न जर जड खाल्लें तर बुद्धीही जड होते. २०–२२ वर्षांपर्यंत मनुष्याचें शरीर व तदंतर्गत सर्व अवयव बनत व वाढत असतात. अशा वेळीं ब्रह्मचर्यानें राहून शुद्ध व सात्त्विक आहार प्रत्येक मुलानें केला तर त्याची बुद्धीही अत्यंत तीव्र होईल. मनुष्याची सर्वांगीण वाढ व्हावयाची असेल तर तो २०–२२ वर्षांचा होईपर्यंत त्याच्या आहारविहारांचें नियमन करणें किती अवश्य आहे हें यावरून लक्षांत येईल. ब्रह्मचर्याश्रमांत पूर्वींच्या काळीं मुलांच्या शारीरिक, मानसिक व बौद्धिक वाढीकडे पूर्ण लक्ष दिलें जाई. त्यांचे आहारविहार व आचारविचार यांवर कडक निर्बंध घातलेले असत व सर्व तऱ्हेचे कष्ट सोसण्याची या आश्रमांत त्यांची तयारी केली

जाई. त्यामुळें तेजस्वी बुद्धीच्या आणि बलिष्ठ शरिराच्या तरुणांची अखंड परंपरा, वर्णव्यवस्थेप्रमाणें आपआपलें कार्य करण्याकरितां पुढें येत राही. विद्वान् व वीर पुरुषांची वाण त्याकाळीं राष्ट्राला कधींही पडली नाहीं. दुर्दैवानें हा आश्रम योग्य रीतीनें पाळण्याकडे हळूहळू दुर्लक्ष होऊं लागलें. उपनयनापासून कमींतकमी १२ वर्षें तरी गुरुगृहीं राहिलें पाहिजे असा मनुस्मृतीच्या पूर्वीं नियम असे. मनूच्या काळीं ही मर्यादा ९ वर्षांवर आली आणि याज्ञवल्क्याच्या काळीं तर ती पांच वर्षांवर येऊन पोंचली. बारा वर्षें मर्यादा जेव्हां होती तेव्हां वीस वर्षांपूर्वीं मुलांचें लग्न होऊंच शकत नसे. ही मर्यादा जसजशी कमी होत गेली तसतसे बालविवाह रूढ होत गेले असावेत.

## ४१. महाराष्ट्रलक्ष्मी

महाराष्ट्रलक्ष्मी मातें जगीं धन्य वाटे ।
यशोगीत तीचें गातां मनीं हर्ष दाटे ॥ ध्रु० ॥

पुनः पुनः परचक्रानें ताडिली बिचारी,
दीर्घ काल खचली होती पारतंत्र्यभारीं,
द्वादशाब्द दुष्काळानें जाहली भिकारी,
संकटांत तीच म्हणोनी, करी उंच माथें ॥ १ ॥

मावळांत वास, न ठावें जया बाह्य वारें
नेमधर्म ज्यांचे लोकीं कृषीकर्म सारें,
विळाकोयतींच ज्यांचीं काय तीं हत्यारें,
तेच वीर बनले समयीं मावळे मराठे ॥ २ ॥

नये नीट धरितां ज्याला लेखणी करांनीं,
कृपादृष्टि संपत्तीची न ज्याचे ठिकाणीं,
परी यवनसत्तेची जो करी धूळधाणी,
कोण तया शिवरायाच्या पावला यशातें ? ॥ ३ ॥

साधुसंत झाले असती, तयांची न वाण,
मात्र रामदासा लाधे समर्थाभिधान,
जो मनीं स्वदेशहिताचें धरोनी निशाण,
ध्वजा कौपिनाची मिरवी भारतांत थाटें ॥ ४ ॥

पूर्व दिव्य, ज्यांचें त्यांना रम्य भाविकाळ,
बोध हाच इतिहासाचा सदा सर्वकाळ,
कासया वहावी चिंता मनीं मग जहाल ?
रात्र सरे तेव्हां उगवे दिनहि पूर्ववाटे. ॥ ५ ॥

# ४२. कपड्यांची अदलाबदल

अगदीं कल्पना नसतां मनुष्यावर कसे अवचित अवघड प्रसंग येतात याचा माझाच एक अनुभव सांगतों ऐका.

महायुद्ध नुकतेंच जुंपलें असल्यानें लष्करभरती जोरांत सुरू होती. त्या काळांत–१९१५ साल असेल–ढवळापूर येथील माझ्या मित्राच्या निमंत्रणावरून चार दिवस त्याजकडे राहून परत यावें म्हणून मी निघालों. दिवस उन्हाळ्याचे. बरोबर आंथरूणपांघरूण कांहीं घेतलें नव्हतें. फक्त अंगावरचे कपडे, खिशांत चार रुपये आणि हातांत एक काठी; इतक्या सरंजामानें निघालों.

स्टेशनापासून चार मैल गेल्यावर एक सुंदर तलाव दिसला. त्या-बरोबर पोटांत भूक लागल्याची जाणीव झाली. अंगाला घाम आला होता म्हणून स्नान करण्याचीहि इच्छा अनावर होणारच. तेव्हां वाट सोडून तळयाच्या कांठीं गेलों, आणि चांगला स्वच्छ खडक व त्यावर झाडाची सावली आहे असें पाहून पाय पसरून बसलों. सुमारें पांच मिनिटें बसतांच थकवा गेला आणि त्या दरींतील सृष्टिवैभव पाहण्यां-तच रममाण झालों. इतक्यांतच पलीकडच्या बाजूला एक मनुष्य स्नान करून पाण्यांतल्या खडकावर बसून आपलें अंग चोळीत होता, तो मला हांक मारून म्हणाला, “ का पाव्हण, इचार कसला करतायसा ? पाणी तरी कसं अक्षी कावळ्याच्या डोळ्यावाणी हाय बगा. मला तर दिसभर डुंबतच ऱ्हावस वाटतं ह्येच्यांत. ”

मला त्याचें आमंत्रण नकोच होतें म्हणा. पण त्यानें पाण्याचें वर्णन केलेलें ऐकून, एरव्हीं उठलों असतों त्याच्या आधींच उठावेसें वाटलें खरें. अंगांतले कपडे काढून उपरण्यांत गुंडाळून ठेवले. आंत लंगोट होताच. हळूहळू पाण्यांत उतरून चुळा भरून टाकूं लागलों. तेव्हां तो फिरून म्हणाला, “ पवायला शिकला न्हाईस जणू ? ”

हा नसता दोषारोप मी कसा ऐकून घेईन ? मी लगेच त्याला म्हणालों, " तें काय म्हणून ? असा सुंदर तलाव मिळाल्यावर मी बरा पोहायचा राहीन ?" मग पाण्यांत शिरून थोडेंसें पोहून झाल्यावर फिरून खडकावर बसून मीहि अंग चोळूं लागलों. तें पाहून तो म्हणाला, " काय राव, झालं पोहणं इतक्यांतच ? ह्ये पल्याडच छोटं बेट तर बघा. कुणा हौशी गड्यानं त्येच्यांत बागशाईबी वयेली हाय. लई नामी. आंब्याच्या कैऱ्या तर कशा अक्षी कपाळाला बडवत्यात. अन् खायला जसं काय खोबरं. तळ्यांत पाणी काई खोल न्हाई. जातांना मधूनमधून उभे ऱ्हायला खडकबी हायती. "

पाणी फार नाहीं असें त्यानें मुद्दाम सांगितलें. याचा अर्थ, फिरून मला चांगलें पोहायला येत नाहीं अशी त्याची समजूत झाली असावी. हा विचार मनांत येतांच आंतून किंचित् राग आला आणि मी म्हणालों, " अहो, पाण्याची पर्वा कोण करतो ? मनुष्य एकदां पोहूं लागला, म्हणजे खालीं पुरुषभर पाणी काय आणि भालाभर काय सारखेंच. उगाच घामाचें अंग चोळून स्वच्छ करीत होतों इतकेंच. मी फिरून पोहायला पडणारच आहें. "

अंग चोळून झाल्यावर फिरून पोहायला पडलों. समोरच तें बेट दिसत होतें. आणि त्यांतली झाडीहि सुंदर होती. खोबऱ्यासारख्या लाग- णाऱ्या कैऱ्यांचीहि आठवण होतीच म्हणा. म्हणून तसाच पोहत पोहत बेटापर्यंत गेलों आणि ओल्या अंगानें झाडींत शिरलों. बेट कांहीं मोठें नव्हतें. शोभा पहात पहात दुसऱ्या टोंकापर्यंत गेलों. पण त्या गृहस्थानें वर्णन केलेली बागशाही नाहीं. फार काय मनुष्याच्या वस्तीची खूणहि नाहीं. आणि त्या कपाळावर आपटणाऱ्या खोबऱ्यासारख्या लाग- णाऱ्या कैऱ्या तर राहोतच, पण आंब्याचें एक झाडहि शपथेला नाहीं !

हें ध्यानांत येतांच मन किंचित् चरकलें. " या परक्या माणसानें माझी अशी थट्टा कां केली ? " लगेच खिशांतल्या रुपयांची आठवण

होऊन मी मनांत म्हणालों, " अरे हा कोणी चोरबीर तर नसेल ना ? " हा विचार मनांत येतांच पाय धाईनें चालूं लागले. एकदम पाण्यांत शिरून झपझप हात टाकून मी परत निघालों. निम्म्यावर गेल्यावर पाहतों तरी तो मनुष्य दिसेना. म्हणून थोडी घाई करून कांठावर येऊन पाहतों तों त्याच्या जागेवर तो मनुष्य नाहीं आणि माझ्या जागेवर माझे कपडे नाहींत ! झालें, तोंडांत मारल्यासारखा फजीत झालों. पण करणार काय ?

कांहीं वेळ इकडेतिकडे हिंडल्यावर एका खडकाच्या सांधींत त्या मनुष्याचे कपडे आढळले. त्यावरून तो लष्करांतला शिपाई असावा असें ठरलें. तो कोणीहि असो. पण माझ्यापुढें प्रश्न असा येऊन पडला कीं, आतां हे त्याचे कपडे घालूं कीं नको ? पण ते घातल्याशिवाय गत्यंतरच नव्हतें. नुसती चड्डीलंगोट घालून उघडाबोडका चाललों तर लोक मला वेड्यांत काढावयाचे. तेव्हां शेवटीं असा निश्चय केला कीं, त्याचे हे कपडे घालावे, आणि एखादा गांव लागला म्हणजे कसेतरी नवे कपडे मिळवून हे फेंकून द्यावे. बराच वेळ विचारांत घालवून शेवटीं कपडे अंगावर चढविले आणि पाहतों तों बेटे अंगाला बरोबर बसलेहि. जणूं काय माझ्या अंगावरच शिंप्यानें बेतून शिवलेले ! झालें. मी असा मारूनमुटकून शिपाई बनलेला पाहून मला मोठ्यानें हसूं आलें. पण पोटांत भूक लागल्यामुळें तलावावर वेळ न घालवितां फिरून ढवळापूरच्या वाटेला लागलों.

सुमारें कोस दीड कोस जमीन चाललों असेन. इतक्यांत समोरून दोघे लष्करी जवान आले. मला पाहतांच ते एकदम थबकले. एकानें मला हटकलें, " खबरदार पुढें जाशील तर. आधीं तुझें नांव सांग. " दुसरा म्हणाला, " अरे नांव विचारून काय उपयोग ? तो खरें नांव थोडेंच सांगणार आहे ! पण त्याच्या पलटणीचें नांव विचार. आसपास दुसरी पलटण नाहीं म्हणा. पण त्याच्याच तोंडानें न्याय होऊं दे. " त्यावर मग खालील संभाषण झालें.

" मला काय पलटण माहीत ? "

" तर मग हा पोषाख तुझ्या अंगावर कसा ? लष्करांत नसलेले लोक असला पोषाख घालतात वाटतें ? "

" नाहीं हो, हे कपडे माझे नव्हेत. "

" मग चोरलेस वाटतें कोणा शिपायाचे ? "

" नाहीं हो, मीं ते चोरलेले नाहींत. "

" मग तुला कोणीं ते बक्षीस दिले कीं काय ? "

" मला ते कोणी बक्षीसहि दिलेले नाहींत. " यावर दोन फितीचा शिपाई म्हणाला, " अरे, बरोबर आहे. याचेच कपडे याच्या अंगावर आहेत. तेव्हां ते त्यानें चोरले नाहींत किंवा त्याला कोणी बक्षीस दिले नाहींत हें खरेंच आहे. बस्स. पकड याला आणि घेऊन चल. पलट-णीचें नांव माहीत नाहीं म्हणतो, खोटी गोष्ट. पळून जाण्याकरितांच ही सर्व बतावणी आहे. चला. फरारी सांपडला, आपलें काम झालें. "

लगेच माझ्या हाताला काढण्या बांधण्यांत आल्या व त्या दोघां-बरोबर मीहि चाललों. पोटांत भूक खवळली होती. पण करणार काय ?

सुमारें एक कोस गेल्यावर लष्करी तळ लागला. बरोबरीच्या शिपा-यांनीं मला साहेबापुढें उभें केलें व सांगितलें कीं, पळून जाणारा हा ' रंगरूट ' आपल्या हुकुमाप्रमाणें धरून आणला आहे. साहेबानें अधिक चौकशी केली नाहीं. माझें नांव देखील कोणी विचारलें—उच्चारलें नाहीं. आणि ' आठ दिन कांजी हाऊस. डबल परेड. आगे इन्साफ ' अशी शिक्षा सांगून टाकून साहेब आपल्या कामाला निघून गेला. शिपायांनीं मला पहारेवाल्याच्या स्वाधीन केलें व तेही निघून गेले. पहारेवाला मला अंधारकोठडींत घेऊन गेला. दिवस बुडण्यापूर्वीं एका लोखंडी थाळयांत मला डाळभाकरी देण्यांत आली. भुकेमुळें ती खाऊन पाणी प्यालों आणि कांबळयावर पडून आजच्या दिवसाचें नवल करीत करीत झोंपीं गेलों.

दुसरे दिवशीं सकाळीं मला परेडीला नेण्यांत आलें. इतर शिपायांबरोबर मीहि उभा राहिलों. पण कवाइतीच्या इंग्रजी शब्दांपैकीं मला एकहि माहीत नव्हता. कोठून असणार ? नांगर व आसूड यांच्याशींच माझा संबंध. लष्करी शिपाई दिसला तर त्याच्याकडे गांवढळ माणसाच्या कौतुकानें पाहण्यापलीकडे मला लष्कराचा परिचय नव्हता. आज अंगावर प्रत्यक्ष लष्करी कपडे येऊन पडले, पण त्यामुळें कवाइतीचें ज्ञान थोडेंच येणार ? कवाइतीच्या हुकुमाचे शब्द ऐकून इतर शिपाई ( अजून ते रंगरूटच होते ) त्याप्रमाणें मागेंपुढें पावलें टाकीत खालवर हात करीत. त्यांचें पाहून मग त्याप्रमाणें करावयाचें म्हणून मी सहजच मागें राही. पण कवाईत शिकविणाऱ्या सुभेदाराच्या लक्षांत हें तेव्हांच आलें. तेव्हां तो माझ्यावर रागावून ओरडूं लागला. मी खुलासा कसा करणार ? फक्त गयावया करूं लागलों. तेव्हां शेजारचा दुय्यम अधिकारी म्हणाला, " सुभेदारसाहेब, हा इसम नुसतें ढोंग करतो आहे. त्याला लष्करांतून पळून जायचें होतें. लुच्चा मनुष्य आहे. त्याला मार दिल्यावर कवाईत आपोआप येईल. " सुभेदार म्हणाला, " फरारी झाला होता तो इसम हाच काय ? " असें बोलून त्यानें हातांतल्या छडीनें माझ्या पिंढऱ्यांवर दोन तडाखे दिले. पण नुसत्या मारानें विद्या थोडीच येते. तो दिवस तसाच गेला. दुसरे दिवशींहि तोच प्रकार. या दिवशीं मी काकुळतीला येऊन थोडें धैर्य करून म्हणालों, " साहेब, माझी हकीकत तरी ऐकून घ्या. " सुभेदार म्हणाले, " हकीकत मला कशाला ? आतां तुझा इन्साफ होईल, तेव्हां साहेबालाच काय हवें असेल तें सांग. माझें काम फक्त कवाईत शिकवावयाचें आहे. " त्याहि दिवशीं रागानें त्यानें माझ्या पायांवर दोन छड्या मारल्याच. तिसरे दिवशीं माझ्यामुळें इतर रंगरूटांची कवाईत बिघडते, असें पाहून " दोनतीन दिवसांत आणखी रंगरूट धरून आणतील त्यांच्याबरोबर त्याला उभा करीत जा " असें सांगून सुभेदारानें माझा नाद सोडला. तीन दिवसांनीं आणखी पंधरा नवे रंगरूट

आले, तेव्हां त्यांच्याबरोबर मला अगदीं पहिल्यापासून कवाईत शिकविण्याला सुरुवात झाली.

कोठडींत पडल्यापडल्या मी दररोज रात्रीं विचार करीं कीं, कुणाच्या तरी हृदयाला दया येईल तर पहावी आणि खरी हकीकत सांगून सुटका करून घ्यावी. पण कवाईतीच्या वेळेशिवाय मला बाहेरच काढीत नसत. आणि कवाईत चालली असतांना बोलण्याची मनाई. नवे आलेले रंगरूट मोकळे असत; पण मला मात्र बंदी. कारण माझा इन्साफ व्हावयाचा होता. या नव्या रंगरूटांपैकींहि कांहीं माझ्यासारखे दुर्मुखलेले व मनांतून दुःखीकष्टी दिसत. पण कांहीं आनंदांत व खुषींत होते. अंगावरच्या लष्करी पोषाखाकडे पाहून कांहींना दुःख होई तर कांहींजण त्यामुळें ऐटीनें झुलत चालत, मधूनमधून आपल्या अंगाकडे आणि छातीकडे मान मुरडून पाहात, आणि मिशांवरून हात फिरवीत.

मग एके दिवशीं एक नाईक सुट्टीच्या वेळीं, माझ्या कोठडीच्या बाहेरच्या बाजूला, छायेंत भिंतीला टेंकून स्वस्थपणें चिलीम ओढीत बसला होता. त्याच्या चेहऱ्यावरून तो भलाहि दिसत होता. तेव्हां मोठा धीर करून मीं त्याला म्हटलें, “ नाईकसाहेब, आपणांशीं दोन शब्द बोलूं का ? ” तो म्हणाला, “ ठीक आहे. बोल तुला काय बोलावयाचें तें. ” तेव्हां त्याचें माझें खालीलप्रमाणें संभाषण झालें.

“ नाईकसाहेब, आपण दयाळू दिसतां. आपण माझी दाद घ्याल काय ? ”

“ बाबा, लष्करच्या कारभारांत दयामाया कांहीं एक नसते. येथें नुसता हुकुमाचा—शिस्तीचा कारभार. ”

“ पण शिस्तीच्या मुळाशीं कांहीं न्याय तरी पाहिजे. ”

“ तुझ्यासारखीं माणसें आधीं स्वतः चुका करितात आणि मग अन्याय म्हणून लोकांच्या नांवानें हांका मारीत बसतात. ”

“ पण नाईकसाहेब, मीं खरोखर कांहींच चूक केली नव्हती. ”

" तुला रंगरूट म्हणून धरून आणला, तेव्हां तूं कागदावर अंगठा उठवून कां दिलास ? बरें, अंगठा उठवून दिलास तर शिपायाची नोकरी पुरी करायची होतीस. मिळाला असता डिस्चार्ज चारदोन वर्षांनीं. हें युद्ध कांहीं जन्मभर चालत नाहीं. कशाला गेलास पळून ? भोग आतां कर्मांचीं फळें. "

" नाईकसाहेब, अहो, देवाशपथ मीं कागदावर अंगठा उठवून दिलेला नाहीं. मला वाटेंत पकडून आणिलें आणि त्या दिवसापासून बघा मला कोठडींत ठेवून दिलें आहे. मला माझें नांवगांवहि कुणी विचारीना. मग माझा अपराध खरा कीं खोटा याची चौकशी कोण करणार ? "

" काय वेडा ! अरे असें धडधडीत खोटें तरी बोलूं नकोस. तुला वाटेंत उगीच पकडून आणिलें तर हे लष्करी कपडे तुझ्या अंगावर कुठून आले ? "

" हां, नाईकसाहेब, मुद्याचाच प्रश्न केलात. हे कपडे माझे नव्हेत. चुकून माझ्या अंगावर आले. "

" झोंपेंत कुणीं तुझ्या अंगावर घातले जणूं ? "

" नाहीं. मींच ते अंगावर घातले. पण माझे कपडे चोरीला जाऊन त्यांच्याऐवजीं हे दुसरे तिथें चोरानें ठेवले. दुसरे कपडे अंगांत घालायला नव्हते म्हणूनच हे घातले. आणि आतां कुठेंतरी जाऊन नवे घेऊन घालीन आणि हे फेंकून देईन अशा विचारांत होतों इतक्यांत धरणें आलें. "

" बाबा, तूं काय वाटेल तें सांगशील, पण तुझ्यावर कोणीं भरंवसा ठेवावा ? चोराच्या हातीं लष्करी कपडे जायला ते काय असे वाटेवर पडले आहेत कां ते बाजारांत मिळतात ?"

" पण माझा चोर हाच तुमचा फरारी मनुष्य असला तर त्याच्या जवळ लष्करी कपडे असणारच. "

" अस्सं ! एकूण फरारीपणाच्या गुन्ह्याला चोरीची जोड ! असेल बाबा नाहीं कोणीं म्हणावें ? पण तूं असा गाफील कसा ? "

" हां, नाईकसाहेब, आपण बरोबर विचारलेंत. पण मी सगळी हकीकत सांगतों ती ऐकून घ्याल ना ? "

नाईक म्हणाला, " सांग तर. "

तेव्हां त्याला मी इत्थंभूत हकीकत थोडक्यांत सांगितली. ती ऐकून घेऊन तो कांहीं न बोलतां निघून गेला. पण दुसऱ्या दिवशींहि पुनः त्याच वेळीं नाईक त्याच जागीं येऊन बसला व तोच होऊन मला म्हणाला, " तुझें नांव काय ? " मी म्हणालों, " माझें नांव संताजी जाधव. " तेव्हां तो म्हणाला, " तूं सांगतोस हेंच नांव खरें असेल तर, तुझी हकीकतहि खरी असावी. "

मीं म्हटलें, " तें कशावरून ? "

नाईक म्हणाला, " मी सकाळीं मुद्दाम रजिस्टर पाहून आलों. त्यांत फरारी इसम म्हणून ज्याच्या नांवापुढें शेरा पडलेला आहे त्याचें नांव संताजी जाधव असें नाहीं. सदू कदम असें आहे. "

मी म्हणालों, " माझें नांव मला माहीत. पण नाईकसाहेब, माझी हकीकत जर खरी आहे असें तुम्हांला वाटतें तर माझी सुटका होण्याला तुम्ही मदत नाहीं का करणार ? "

नाईक म्हणाला, " तूं म्हणतोस तें सारें खरें. तुझी मला दया येते. पण मी तरी काय करणार ? खरा फरारी सांपडला तर मग तुझी सुटका होण्याचा कांहीं तरी संभव. पण न सांपडला तर आयता नगाला नग मिळालेला. आमचा साहेब कशाला तुला सोडील ? नांव कांहीं कां असेना ? एकाच्या जागीं दुसरा. त्याचें काम झालें. ह्या भागांत पन्नास रंगरूटांची भरती झाली पाहिजे, असा वरच्या साहेबाचा हुकूमच आहे. तेव्हां सदू कदम नसला तरी संताजी जाधव चालतो. आणि उद्यां तर तुझी चौकशी होणार. तेव्हां तुझें हें काम

मला कठीण दिसतें. पण तुझा अंगठाबिंगठा खराच घेतलेला नाहीं ना? म्हणजे बोलायलाच नको."

मी म्हणालों, "माझा अंगठाबिंगठा कांहीं घेतलेला नाहीं. मी फरारीच समजून सगळे चालले आहेत. कोणी नुसतें नांव काय असें विचारील तर शपथ."

नाईक म्हणाला, "लष्करभरती म्हणजे सगळाच जुलमाचा मामला सुरू आहे. नांव कोण विचारणार आणि कशाला? हातांत बंदूक घ्यायला दोन पायाचा माणूस उभा करतां आला म्हणजे काम झालें. असो. पण त्यांतूनहि कांहीं सुचलें तर पाहीन. नुसती खरी हकीकत सांगून निभाव कितीसा लागणार तें दिसतेंच आहे. पण दैवावर हवाला ठेवून बैस. याहून मी अधिक काय सांगणार?"

इतकें बोलून नाईक निघून गेला. तो बोलला तेंच खरें होतें. कारण अशा स्थितींत दैवावर हवाला ठेवण्यापेक्षां माझ्या हातीं दुसरें कांहींच नव्हतें.

(२)

त्याच दिवशीं संध्याकाळीं एका शिपायानें येऊन माझ्या कोठडीचा दरवाजा उघडला. त्याच्याबरोबर एक इसम होता. त्याला त्यानें 'येथें पडून रहा' असें म्हणून दटावून आंत लोटून दिला आणि दाराला कुलूप घालून तो निघून गेला. अंधार पडत चालल्यामुळें मला त्या इसमाचें तोंड दिसलें नाहीं. पण तो लष्करी पोषाखांत नव्हता, इतकें साधारण वाटलें. रात्रीं सुमारें नऊ वाजतां कँपांत जिकडेतिकडे सामसूम झालें तेव्हां तो इसम मला हलक्या आवाजांत हांक मारून म्हणाला, "पाव्हण, तुमच्याशीं दोन गोष्टी बोलायच्या आहेत. बोलूं कां?"

मी म्हणालों, "बोल बाबा. एकट्यानें वेळ जात नव्हता म्हणूनच ईश्वरानें सोबत पाठविली असें दिसतें."

इतकें आश्वासन मिळाल्याबरोबर त्यानें येऊन माझे पाय घट्ट धरले आणि दीनवाणा आवाज काढून म्हणाला, " पाव्हण, मला माफ करा. मीं तुमचा मोठा गुन्हा केला." मला यांतलें कांहींच उमगेना. मी म्हणालों, " माफी करण्याच्या आधीं तुम्ही कोण ? आणि तुम्हीं माझा गुन्हा काय केला, हें तर सांगाल कीं नाहीं ?" त्यावर तो म्हणाला, " तुमचा काय गुन्हा केला, हें सांगायला फारशी लांब हकीकत सांगायलाच नको. सहा दिवसांपूर्वीं तळ्यावर तुमची गांठ पडली होती. एवढ्यावरून मी कोण आणि तुमचा गुन्हा काय केला हें आपोआपच कळून येईल. "

मी आश्चर्यानें थक्क झालों. हा मनुष्य माझ्याच कोठडींत अवचित कसा आला याची कांहींच कल्पना चालेना. मी इतकेंच म्हणालों, "गुन्हा तर खराच. पण त्या तुमच्या गुन्ह्यानें लष्कराच्या कायद्याचे एकाऐवजीं आपण दोन गुन्हेगार झालों. देवानें तुम्हांला माझे कपडे घेऊन जाऊन आपले ठेवण्याची बुद्धि कां दिली हें सांगाल काय ?"

तो म्हणाला, " काय सांगूं बाबा ? माणसावर जन्मांत कधीं कधीं प्रसंगच तसे येतात. मीं साऱ्या जन्मांत कोणाच्या सुतळीच्या तोड्या-चाहि अपहार केला नाहीं. तुमच्या कपड्यांची चोरी केली हें मात्र खरें. पण त्याचें कारणहि तसेंच होतें. "

मी म्हणालों, "माझी कुचेष्टा करण्याची तर तुम्हांला लहर आली नाहीं ना ?"

तो म्हणाला, " मी तुम्हांला भेटलों त्या वेळीं माझ्या मनाची स्थिति काय होती हें काय सांगूं ? मनांतलें दुःख दाबून ठेवून मी संभावितपणानें धूर्ताची करणी तुमच्याशीं कशी केली याचेंच मला आश्चर्य वाटतें. "

मी म्हणालों, " तुमचें मन तुम्हांलाच माहीत. मला काय माहीत ? तुम्ही सांगाल तीच हकीकत खरी. "

तो म्हणाला, "तुम्ही विश्वास ठेवा किंवा न ठेवा, पण मी सांगतों यांतलें अक्षरहि खोटें नाहीं. माझें नांव सद्दू कदम. एक महिन्यापूर्वी मला अधिकाऱ्यांनीं जबरीनें आणून लष्करांत दाखल केलें, आणि माझा अंगठा घेऊन माझें नांव शिपायांत दाखल केलें. लष्करांत नोकरी करण्याचें मला वाईट वाटत नव्हतें. नोकरी काय कोठें तरी करावयाचीच. पण घरीं म्हाताऱ्या आईला दुखणें आलें होतें तिच्याकरितां औषध आणायला म्हणून बाजारांत गेलों तों तिथेंच मला पकडून नेलें. मीं साहेबाला होईल तितकें समजावून सांगितलें कीं, "मला लष्करांत तुम्हीं दाखल करून घेतलें तर नोकरीहि करीन. पण घरीं आई मरायला टेंकली तिला तांब्याभर पाणी द्यायलाहि कोणी नाहीं, तिचें आतां काय होईल? म्हणून मला सोडा. नाहींतर रजा द्या. मी जातों, आईची सेवा करतों. जगली तर तिची परवानगी घेऊन आनंदानें परत येतों. आणि मेली तर मग मला जगांत कशाची काळजीच उरली नाहीं. मी परत येऊन इमानानें नोकरी बजावीन." पण रंगरूटांची भरती करणाऱ्या साहेबाला हें काय होय? त्यानें माझें धड बोलणेंहि ऐकून घेतलें नाहीं. तेव्हां मीहि निश्चय केला कीं, सांपडेल त्या युक्तीनें पळून जावें, मग काय होईल तें होईल. त्याप्रमाणें एके दिवशीं संधि साधून रात्रीचा मी कोठडीचे गज काढून पळून गेलों आणि धरणें येईल म्हणून आडमार्गानें गांवीं चाललों. पण अंगावरचे लष्करी कपडे चहाडखोर! त्यांची भीति मनांत एकसारखी वाटत होती. इतक्यांत सुदैवानें तळ्यांत आंघोळीला उतरलों असतां तुम्हीं तिथें आलांत आणि तुम्ही कपडे उतरून ठेवलेले बघतांच चोरीची कल्पना मनांत आली. कल्पना कसली? ईश्वरी प्रेरणाच्च ती. कारण त्या चोरीमुळें आईचें मरण्यापूर्वी मला दर्शन तरी झालें. तुमचे कपडे मीं चोरले तेव्हां नुसती चोरी केली इतकेंच मन खात होतें. पण आतां तुमच्यावर हें नसतें संकट आलें असें पाहून माझ्या मनाला अधिकच्च दुःख होत आहे. तुमच्या कपड्यांमुळें मला आईची भेट घेतां आली. आतां मी मरणालाहि भिणार नाहीं

आणि माझे प्राण देऊन देखील तुमची सुटका करतां आली तर करीन."

इतकें बोलून तो कोंवळया मनाचा मनुष्य रडूं लागला व खरोखरच त्यानें आपल्या अश्रूंनीं माझे पाय भिजविले.

त्याची ती प्रेमळ भावना पाहून मी आपलें संकट विसरूनच गेलों व त्याला म्हणालों, "बाबा, तूं दुःख करूं नको. लष्करच्या कायद्यांत आपण दोघेहि सांपडलों खरे, तेव्हां समदुःखीच म्हणावयाचे. तूं वाईट वाटून घेऊं नकोस. फरारी म्हणून मला शिक्षा झाली तरी मी सोशीन. आणि लष्करी नोकरी बोकांडीं बसलीच तर तूं आणि मी आनंदानें करूं."

यावर तो म्हणाला, "मीं उद्यां खरी हकीकत सांगितली म्हणजे तुम्हांला त्यांनीं सोडूनच दिलें पाहिजे. एक फरारी झाला तर त्याची शिक्षा दोन माणसांना काय म्हणून? असें मी साहेबाला हडसून खडसून विचारीन."

मी म्हणालों, "तुम्ही काय वाटेल तें सांगाल पण तुमचें ऐकणार कोण? असो. मला आधीं हें सांगा कीं, तुम्हांला मीं ओळखलें नाहीं. पण मला तुम्हीं ओळखलेंत हें कसें?"

तो म्हणाला, "ही सर्व नाइकांची कृपा. मला पकडून आणलेल्या महारानें नाइकापाशीं गुदरलें, तेव्हां त्यानेंच आपण होऊन मला एकदम विचारलें, 'कायरे, तुझें नांव सदू कदम कां?' मी 'होय' म्हणतांच त्याला आनंद झाल्यासारखा दिसला व तो म्हणाला, 'गड्या, भली केलीस! सुखासुखी दुसऱ्याच्या घराला आग लावायची विद्या कुठें शिकलास? ज्याचे कपडे चोरलेस तो इसम पहा त्या पलीकडच्या कोठडींत संकटांत पडला आहे. तुला त्याच्याच कोठडींत नेऊन कोंडणार आहें. उद्यां काय होईल तें होईल, पण आज आधीं त्याची माफी माग.' पण आतां उगाच बोलत बसण्यांत अर्थ नाहीं. मी सांगतों एवढी गोष्ट प्रथम करा म्हणजे मला समाधान वाटेल."

मी म्हणालों, “ ती काय ? ” तो म्हणाला, “ त्या दिवशीं तळ्यावर जशी आपण कपड्यांची अदलाबदल केली तशीच आतां येथेंहि करूं. ”

मी म्हणालों, “ त्याची घाई कशाला ? सकाळीं काय होईल तें पाहूं. ” पण तो म्हणाला, “ मी एक क्षणभरहि थांबणार नाहीं. त्या दिवशीं तुमची चोरी केली त्याच्या भरीला आज तुमच्यावर जुलूम करतों असें वाटलें तर म्हणा-पण आधीं तुमचे ते लष्करी कपडे उतरा, मला द्या आणि हे तुमचे परत घ्या. ”

या इसमानें सुचविलेल्या या युक्तीनें सुटकेची कांहीं तोड कदाचित् निघेल असें वाटून मी कबूल झालों. कांहीं वेळानें मी त्याला म्हणालों, “ कपडे ज्याचे त्याला मिळाले खरे; पण तुमच्या आईची हकीकत काय झाली ? ” तो म्हणाला, “ तुमच्या कपड्यांनीं माझ्यावर मोठा उपकार केला. त्यांनींच माझ्या आईची गांठ पडूं दिली. लष्करी कपडे टाकून साध्या कपड्यांत असल्यावर मला एकदम कोण ओळखणार ? हे तुमचे कपडे अंगावर घातल्याबरोबर धांवतच घरीं निघालों. आई मरायला टेंकली होती आणि खरोखर तिला तांब्याभर पाणी द्यायला कोणी नव्हतें. मी लष्करांत गेलों असें तिला कळलें तेव्हां मी मेलों असेंच घेऊन ती चालली होती. मग मी फिरून दृष्टीस पडल्यावर तिला किती आनंद झाला असेल याची तुम्हीच कल्पना करा. त्यापुढें ती तीन दिवस जगली पण त्या अवधींत तिला होणाऱ्या असह्य वेदनांबद्दल ती एक शब्दहि बोलली नाहीं. शुद्ध जाईपर्यंत ‘ माझा बाळ परत आला. मी आतां सुखानें मरेन, ’ एवढेच शब्द ती वरचेवर बोले. आणि माझा हात जो तिनें धरून ठेवला होता तो तिला झोंप लागल्याशिवाय किंवा बेशुद्धि आल्याशिवाय तिच्या हातून मला सोडवून घेतां येत नव्हता. मीं आपल्याकडून पुष्कळ उपचार केले. पण मी लष्करांत गेलों हें ऐकल्याबरोबर तिनें जें अंथरूण धरलें तें मी परत गेलों तरी सोडलें नाहीं. इतका तिला जबर धक्का बसला होता. मीं तिला वाटेल तें खोटें सांगितलें व असेंहि म्हणालों कीं,

'मला आतां यापुढें लष्करांत परत जावयाचें नाहीं. मीं पुष्कळसा पगारहि बरोबर आणला आहे. तूं आणि मी खुशाल राहूं.' पण त्याचाहि कांहीं उपयोग झाला नाहीं व शेवटीं माझें नांव घेत घेत तिनें प्राण सोडला!"

इतकें बोलून तो स्तब्ध बसला व कांहीं वेळानें मला पुन: म्हणाला, "या जगांत मला एकटी तीच होती. मला संसारांतलें दुसरें कोणीहि माणूस नाहीं. तेव्हां मी आतां मरणालासुद्धां भिणार नाहीं. मग लष्करी शिक्षेला कसा भिणार?"

मी म्हणालों, "तरी पण तुझी आयती सुटका झालेली, तिचा फायदा घ्यावा कीं नाहीं? कोठें चार दिवस दुसऱ्या मुलुखांत गेला असतास म्हणजे झालें होतें. मला सोडविण्याला कशाला आलास?"

त्यावर तो म्हणाला, "मी खोटें कशाला बोलूं व मानभावीपणा कशाला करूं? केवळ तुमची सुटका करावी म्हणूनच मी कांहीं परत आलों नाहीं. एक तर तुम्ही पकडले जाऊन या संकटांत पडलां असाल अशी मला कल्पनाहि नव्हती. पण मी आपल्या पायांनीं परत आलों याचें खरें कारण विचाराल तर आईचेंच प्रेम! मरणापूर्वीं तिची गांठ पडावी म्हणून मी पळून गेलों आणि तिचें उरलेलें कार्य नीट व्हावें म्हणून परत आलों."

मी म्हणालों, "गड्या, मला हें नीट समजत नाहीं. तुम्ही परत आल्यानें तिचें उरलेलें कार्य कसें शेवटाला जाणार?"

तो म्हणाला, "सांगतों ऐका. आई मेली त्याच दिवशीं महारानें गांवांत दवंडी पिटविली कीं, सदू कदम म्हणून कोणी लष्करचा शिपाई फरारी झाला आहे. त्याला जो कोणी धरून देईल त्याला वीस रुपये बक्षीस मिळतील! मी आईला 'पुष्कळ पगार बरोबर घेऊन आलों' म्हणून सांगितलें. पण खरोखर माझ्या खिशांत एक पैसाहि नव्हता. तुमचे कपडे घातले त्यांत रुपये होते; पण ते मी ईश्वराचें

नामस्मरण करून तेथेंच ठेवले. ते तुम्हांला सांपडलेच असतील. ”

मी म्हणालों, “ होय, सांपडले. आणि म्हणूनच मी मोठ्या बुचकळ्यांत पडलों कीं, कपडे चोरून न्यावेत, पण त्यांतले रुपये काढून ठेवावें हें काय गौडबंगाल ? बरें पुढें ? ”

तो म्हणाला, “ पुढें खिशांत पैसा नाहीं हें लक्षांत आल्याबरोबर मला आई मेल्यापेक्षांहि अधिक दुःख झालें. तेव्हां मींच होऊन पाटलाला बोलावूं पाठवलें आणि तो आला तेव्हां त्याला म्हणालों, ‘ पाटीलबुवा, जिच्याकरितां मी लष्करांतून पळून आलों ती गेली. आतां मी आपल्याच पायांनीं लष्करांत परत जाणार. पण एवढी कृपा करा कीं, मला धरून गांवकामगाराबरोबर लष्करांत पोहोंचता करा. ’ हें बोलणें ऐकून तो सहजच बुचकळ्यांत पडला. तेव्हां त्याला मीं सांगितलें कीं, आतांच तुमच्या महारानें दवंडी दिली. पाटील म्हणाला, ‘ मग त्याचें काय ? तुम्ही आपल्या पायांनीं गेल्यावर मला धरून पाठवायला कशाला पाहिजे ?’ मी म्हणालों, ‘बक्षिसाच्या वीस रुपयांकरितां ! ’ पाटील म्हणाला, ‘ अशीं बक्षिसें मिळविण्यापेक्षां मी पोटांत कांटे भरीन ! लष्करांत लोक कसे धरून नेतात याची मला पुरी माहिती आहे !’ तेव्हां मी म्हणालों, ‘ पाटीलबुवा, बक्षिसाचे रुपये तुम्ही घ्या, असें मीं म्हटलें नाहीं. तो म्हणाला, ‘ तर मग बक्षिसाचें काय बोलतां ?’ मी म्हणालों, ‘ ही माझी आई मरून पडली आहे. हिला जाळण्याला मजजवळ एक पैसाहि नाहीं. तेव्हां मी गेल्यावर मागें ते बक्षिसाचे रुपये तुम्हांला तिच्या कार्याला होतील. ’ पाटील भला माणूस होता. तो मला म्हणाला, ‘ लोकांना धरून देऊन बक्षिस मिळवून त्यांतून कोणाचें धर्मकृत्य करावें इतका मी नादान नाहीं. समजा, माझीच आई मेली असती तर मीं काय केलें असतें ? ’ असें म्हणून त्यानें चावडीच्या शिपायाला हांक मारली, कनवटीचे रुपये काढून त्याला दिले व पुढची व्यवस्था कानांत सांगून त्यानें त्याला पाठवून दिलें आणि तो मला म्हणाला, ‘ बाबा, माझा धर्म मीं केला. तुझा धर्म तूं कर.

मी तुला परत जाहि म्हणत नाहीं व रहाहि म्हणत नाहीं, आणि राहिलास तरी पकडून देत नाहीं. एका आईच्या पोटीं जन्माला आल्यानें जसे दोघे भाऊ होतात, तसेंच एका आईला स्मशानांत पोहोंचविण्यानेंहि दोघे भाऊ होतात. तुमची आणि माझी आई गेली तरी तुम्ही व मी आतां भाऊभाऊ उरलों. आणि आपला जन्म असे तोंवर हा ऋणानुबंध आपण पाळूं. ' आईच्या दुःखानें रडण्याचा मी थांबलों होतों. पण पाटलाचा हा भलेपणा पाहून आई मेल्यावर भाऊ भावाला प्रथम भेटला म्हणजे जसें त्याला दुःख होतें, तसेंच मला फिरून झालें. ओक्साबोक्शीं रडलों आणि सुतकी होतों, तरी पाटलाला मीं कडकडून आलिंगन दिलें. पण त्याच्या ऋणांत राहूं नये हाच माझा धर्म म्हणून स्मशानांतून तसाच इकडे निघालों. आणि पाटलाला इतकेंच म्हणालों कीं, ' आईच्या अस्थींची वाट कशी लावावी, हें भावानें भावाला सांगायला नकोच. ' झालें. मीं होऊन गांवचा महार बरोबर घेतला आणि पाटलानें धरून पाठविला अशी बतावणी करण्याच्या निश्चयानें इकडे आलों. पण येथें येऊन पहातों तों माझें नशिब थोर. कारण मीं पूर्वी तुमचे कपडे चोरल्यानें तुमच्यावर जें संकट आणलें तें स्वतः हजर होऊन कपड्यांची अदला-बदल केल्यानें तें टळेल असें वाटून आतां मनाला सुखच होतें. "

इतकें बोलून तो स्तब्ध बसला. त्याच्यानें पुढें बोलवेना. तेव्हां मीच त्याला म्हणालों, " बाबा, या जगांत इतका भलेपणा असेल आणि इतका प्रेमळपणा असेल अशी मला कल्पना नव्हती. तूं माझ्या संकटा-बद्दल यत्किंचित्हि काळजी करूं नकोस. माझ्या नशिबीं असेल तर मी सुटून जाईन, नाहींतर शिक्षा भोगीन आणि लष्करांत दाखलहि होईन. त्याचें एवढें संकट कसलें ? पण पाटील जसा तुझा भाऊ झाला तसा मीहि तुझा भाऊ झालों नाहीं का ? पाटील तुझ्या आईच्या स्मशानयात्रेला उपयोगीं पडला. पण मी तर तुला तिची शेवटची भेट

घेण्याच्या उपयोगीं पडलों कीं नाहीं ? झालें तर. भावाशिवाय असें एकमेकांच्या उपयोगीं कोण पडतें ?”

हें माझें मनमोकळें भाषण ऐकून त्याला फार आनंद झाला. पण आलेलें संकट यापलीकडे निवारण्याचें त्याच्या किंवा माझ्या हातीं कांहींच नसल्यामुळें मी म्हणालों, “ आतां आपण सुखानें झोंप घेऊं. ”

दुसऱ्या दिवशीं सकाळीं आठ वाजतां नाईक आमच्या कोठडीपाशीं आला व हंसतच म्हणाला, “गारुडी एक रुपयाचे दोन रुपये करितो, तसें आमच्या एका कोठडींत आज एका फराऱ्याचे दोन फरारी झाले ! ”

इतक्यांत आम्ही एकमेकांनीं एकमेकांचे कपडे बदलले ही गोष्ट त्याच्या लक्षांत आली. तेव्हां तो हंसून म्हणाला, “ शाबास, तुम्ही आधींच माझें निम्में काम केलेंत. ” आणि त्यांतल्या त्यांत माझ्याकडे वळून तो म्हणाला, “ संताजी, तुझी सुटका करण्याचें जमलें तर पाहतों. पण एक गोष्ट तूं करावी कीं, मी साहेबापुढें जें काय करीन त्यांत तूं मध्यें बोलूं नये. एवढेंच नव्हे, तर मीं तुला शिव्या दिल्या, मारलें, काय वाटेल तें केलें, तरीहि ओंठ मिटून गप्प बसलें पाहिजे. ”

मला याचा कांहींच अर्थ कळेना. पण नाइकाचा हेतु चांगला म्हणून पुढें तोंड मिटायचें तें आधींच मिटून घेतलें आणि खुणेनें म्हणालों, “ चला, माझी तयारी आहे.”

कँपाच्या हपिसांत साहेब खुर्ची टाकून चौकशीला बसला होता. नाइकानें सदू कदमाला पुढें केला व मला किंचित् मागें उभा केला व तो म्हणाला, “ साहेब, सोनगांवचा पाटील फार हुषार. त्यानें हा फरारी रंगरूट धाडून दिला आहे. ”

साहेब खुषींत येऊन म्हणाला, “ बहोत अच्छा. ” त्यानें रजिस्टरचें पान उघडलें आणि ज्याच्यापुढें फरारी असा शेरा लिहिला होता तें नांव मोठ्यानें उच्चारून म्हणाला, “ सदू कदम कोण ? तूंच ? ” तेव्हां सदू म्हणाला, “ होय साहेब. मीच फरारी झालों होतों. ”

पण साहेबाला अधिक खुषींत आणण्याकरितां नाईक म्हणाला, " साहेब, नुसत्या नांवावर काय जातां ? चेहरेपट्टी तपासली तरी त्यांत काय फरक पडणार ? सदू तो सदूच. "

तेव्हां साहेबाला आपलें काम पक्कें झालें असें वाटून तो थाटानें म्हणाला, "लष्करांतून पळून गेल्याबद्दल सदूला आणखी आठ दिवस अंधारकोठडी द्या. "

इतकें झाल्यावर साहेब माझ्याकडे पाहून म्हणाला, " क्यौं नाईक, हा दुसरा इसम कोण ? "

तेव्हां नाइकानें लगेच मोठ्या रागाचा आविर्भाव आणला आणि हातांतल्या छडीनें माझे पाय सडकीत तो म्हणाला, " हा कोणी सदूचा भाऊ त्याला सोडवायला म्हणून येथें आला होता. एकदां रंगरूट आम्हीं पकडल्यावर याच्या बापालाहि काय सोडतों ? साहेब, रदबदली करण्याला आलेले लोक असेच आम्हांला नेहमीं त्रास देतात त्यांना अशीच शिक्षा केली पाहिजे. "

असें म्हणून त्यानें आणखी चार छड्या माझ्या पायांवर ओढल्या. त्या इतक्या जोरानें लागल्या कीं, मी अगदीं कळवळलों, आणि त्या दुःखानें माझ्या सुटकेचा आनंदहि क्षणभर खाऊन टाकला. छड्या देऊन झाल्यावर नाइकानें मला मोठमोठ्यानें चार शिव्या हांसडल्या, स्वतः चार धक्के दिले, आणि शेजारच्या शिपायाला तो म्हणाला, "जा, याला धक्के देऊन एकदम हद्दीच्या बाहेर घालीव. " साहेब पुनः म्हणाला, " बहोत अच्छा किया. " दाद ना फिर्याद !

आठ दिवस कोठडींत राहिलों काय ? फरारी ठरलों काय ? चौकशी झाली काय ? आणि मी सुटलों काय ? कोणी एकानें तरी आठ दिवसांत मला नांव विचारायचें होतें किंवा माझी चेहरेपट्टी पडताळून पहायची होती ! रंगरूट खात्यांत तेव्हां अशी अंदाधुंदी होती. पण या सर्वांचा विचार करायला मी तेथें राहतों कशाला ? नाइकाचे आभार

मानण्याला थांबेन म्हणावें तर त्यानें आधींच ताकीद देऊन ठेवली होती. इमानी प्रेमळ सदूला भाऊ म्हणून एकदां कडकडून भेटावें असें मनांत आलें. पण तें तरी कसें घडणार ? पण या विचारांनाहि वेळ नव्हता. कारण शिपायानें मला धक्के देत ढकलीत ठाण्याच्या हद्दीपर्यंत आणून सोडलें होतें. तेव्हां मी सदूला आणि नाइकाला तेथूनच मनानें नमस्कार केला आणि घरीं परत आलों.

घरीं आल्यावर घरचे भाऊ व बाहेरचे चार सोबती जमवून सर्व हकीकत सांगितली. मी घरून निघालों तों स्नेह्याच्या गांवीं जाण्याकरितां. म्हणून चारांचे आठ दिवस होऊन मी परत आलों नाहीं तरी याची त्यांना काळजीच नव्हती. पण झालेला हा सगळा प्रकार जेव्हां मीं सांगितला, तेव्हां आश्चर्यानें हंसून त्यांची मुरकुंडी वळली. त्या आठ दिवसांत मी कवाइतीचे कांहीं नाहीं म्हटलें तरी चार धडे शिकलों होतों. ‘ लेफ्ट राइट ’ कळूं लागलें होतें. तेव्हां माझ्या खेडवळ स्नेह्यांना संध्याकाळीं हुरडा खायला बोलावून ते आल्यावर त्यांना मीं म्हटलें,“गड्याहो, चला आतां मी तुम्हांला लष्करची कवाईत शिकवतों.”

पण माझ्यासारखेच ते सगळे ठोंबे ! ओळींत एक उभा राहील तर शपथ; आणि राइट म्हटलें कीं, डावा पाय व लेफ्ट म्हटलें कीं उजवा पाय पुढें टाकीत. तेव्हां मी हंसून म्हणालों, “ गड्याहो, लष्कराच्या गोष्टी कांहीं फुकटच्या नाहींत ! ” असें म्हणून माझ्या पायांना हात लावून पुन्हा म्हणालों, “ कवाईत यायला अशा छड्या खाव्या लागतील.”

पण मीं मात्र छड्या कोणालाच दिल्या नाहींत. डिसमिस् ! एवढा आणखी एक शब्द पाठ झाला होता तो उच्चारला, पण कोणीच जागचा हालेना. तेव्हां श्राद्धांतल्या पिंडांप्रमाणें आपल्याच हातांनीं सर्वांना मागेंपुढें केलें आणि लष्करभरतीच्या गोष्टी बोलत घरीं परत गेलों !

# लेखक परिचय



## वा. भा. दामले

हे अकोल्यास वकिली करतात. यांच्या स्फुट भावगीतांचा संग्रह ‘ भावलहरी ’ या नांवानें प्रसिद्ध झाला आहे. त्यांतून ‘ विदर्भगीत ’ घेतलें आहे.

## विनायक सदाशिव वाकसकर ( १८९२ )

बडोद्याकडील जे लेखक मराठी वाङ्मयाची सेवा करीत आहेत त्यांत वाकसकर हे प्रमुख आहेत. यांचा इतिहासाचा व्यासंग जबर आहे; आणि ऐतिहासिक संशोधनपर कित्येक लेख व प्रबंध यांनीं लिहिले आहेत. ‘ अप्रसिद्ध ऐतिहासिक व्यक्तींचीं चरित्रें ’ व ‘ शिवाजी आणि शिवकाल ’ हीं यांचीं पुस्तकें प्रसिद्ध आहेत. ‘ शिवाजी आणि शिवकाल ’ हा ग्रंथ मूळ सर यदुनाथ सरकारच्या पुस्तकाचा अनुवाद असला तरी तो सरस व मनोरम उतरला आहे. महाराष्ट्राच्या इतिहासाबद्दल योग्य अभिमान हा त्यांच्या लेखनाचा एक विशेष आहे.

## होनाजी बाळ

पेशवाईच्या उत्तरकालांत जे शाहीर प्रसिद्धीस आले त्यांत होनाजी बाळ प्रमुख होते. हे जातीचे गवळी. यांचा आजा सताप्पा आणि चुलता बाळा बहिरू. हे दोघेही लावण्या करीत. तेव्हां कवित्वगुणाची ही देणगी होनाजीस पिढीजातच होती असें म्हणण्यास हरकत नाहीं. दुसऱ्या बाजीरावाच्या आश्रितांपैकीं होनाजी हे एक असून त्यांच्यावर बाजीरावाची बहाल मर्जी असे, व सरकारांतून त्यांना वर्षासनही मिळे. होनाजींच्या सर्व कवनांत त्यांनीं रचिलेली प्रभातकालची भूपाळी फार प्रसिद्ध आहे. यांतील वर्णन स्वाभाविक असून प्रभातकालच्या शांत वातावरणाला अनुकूल असणाऱ्या रागदारींत ती रचिली आहे.

## राजाराम परशुराम सबनीस ( १८९३ )

शिक्षणप्रसारक मंडळी, पुणें, या संस्थेचे आजीव सेवक असून सर परशुरामभाऊ कॉलेजांत अर्थशास्त्र, गणित, इतिहास हे विषय ते शिकवितात. महाराष्ट्राचा इतिहास व संस्कृति यांबद्दल त्यांना विशेष अभिमान वाटतो. यांनीं फार लिहिलेलें नाहीं, परंतु जें लिहिलें आहे तेंच विचारपूर्वक लिहिलें असल्यामुळें त्याला एक

प्रकारचें महत्त्व आहे. स्वाभिमान व परगुणग्रहण या इष्ट प्रवृत्तींचें मिश्रण यांच्या ठायीं दिसून येतें. 'जगाचें वाङ्मय' या नांवाचीं दोन पुस्तकें यांनीं प्रसिद्ध केलीं असून त्यांमध्यें निरनिराळ्या देशांतील लेखकांचे उत्कृष्ट उतारे संग्रहित केले आहेत.

## तुकाराम ( १६०८–१६४९ )

प्राचीन संतकवींपैकीं साधुवर्य तुकाराम हे प्रमुख होत. पुण्यापासून १८ मैलांवर देहू नांवाचें गांव आहे तेथील हे रहिवासी; आणि तेथेंच वाण्याचा धंदा हे करीत. तुकाराम महाराज सदेह वैकुंठाला गेले अशी भाविक भक्तांची समजूत आहे. ज्ञानेश्वरानंतर महाराष्ट्रांत भक्तिप्रधान वारकरी संप्रदाय बराच फोंफावला. तुकाराम महाराज स्वतः वारकरी पंथाचे असल्यामुळें अज्ञजनांत त्याचा प्रसार करण्याचें कार्य त्यांनीं केलें. त्यांनीं सुमारें ५००० अभंग रचिले आहेत. त्यांची अभंग-वाणी सहजस्फूर्त आहे. रचनेच्या ठाकठिकीकडे त्यांचें फारसें लक्ष नसे, पण अंत-रींचा उमाळा अभंगांत प्रतिबिंबित झाल्यामुळें त्यांच्या भाषेंत जिवंतपणा ओतप्रोत भरला आहे. व्यवहारांतील दाखले देऊन नीतिपर तत्त्वें अभंगांत गोंवण्याची कला तुकारामांना चांगली साधली होती. त्यांच्या अभंगांतील पुष्कळ चरण मराठीमध्यें म्हणीवजा होऊन बसले आहेत.

## हरि नारायण आपटे ( १८६४–१९१९ )

मराठींतील आद्य कादंबरीकार म्हणून हरिभाऊंचें नांव विश्रुत आहे. कॉलेज-मध्यें असल्यापासूनच त्यांच्या वाङ्मयसेवेला सुरवात झाली आणि परीक्षेच्या अभ्यासापेक्षां इतर वाचनाकडे त्यांचा विशेष ओढा असल्यामुळें कॉलेजचें शिक्षण अर्धेंच राहिलें. हरिभाऊंनीं सामाजिक व ऐतिहासिक मिळून २०।२१ कादंबऱ्या लिहिल्या. त्यांखेरीज स्वतःच काढलेल्या 'करमणूक' नांवाच्या साप्ताहिकांत किती तरी लहान मोठ्या गोष्टी त्यांनीं लिहिल्या आहेत.

हरिभाऊंच्या कादंबऱ्यांनीं मराठी भाषेंत क्रांति घडवून आणली. निबंधमालेनें मराठी भाषेचें ओज जसें सर्वांच्या प्रत्ययास आणिलें तसेंच इंग्लिशमधील कादंब-ऱ्यांच्या तोडीच्या कादंबऱ्या मराठींत लिहिणें कसें शक्य आहे हें हरिभाऊंनीं दाखविलें. मराठी वाङ्मयाचा दर्जा वाढण्यास त्यांच्या कादंबऱ्या बऱ्याच अंशानें कारणीभूत झाल्या. टिळक-आगरकरांनीं वर्तमानपत्रांच्या द्वारां लोकजागृति केली. हरिभाऊंनीं ललित वाङ्मयाच्या साहाय्यानें नवीन कालाला

अनुरूप अशीं देशहिताचीं अनेक ध्येयें समाजापुढें मांडलीं, समाजांतील दुष्ट चाली-रीती वेशीवर टांगल्या व समाजाला सर्वांगीण उन्नतीचा मार्ग दाखविला. मराठी भाषेचें साधें, शुद्ध परंतु रमणीय स्वरूप हरिभाऊंच्या वाङ्मयकृतींत पाहावयास सांपडेल. पुष्कळ नवीन शब्दांची भर त्यांनीं घातली, तसेंच खासगी बोलींतील कित्येक शब्दांना वाङ्मयाच्या क्षेत्रांत पावन करून घेतलें.

## माधव ज्युलिअन् (१८९४)

यांचें संपूर्ण नांव माधव त्रिंबक पटवर्धन. शिक्षण बडोद्यास झालें. १९१८ ते १९२३ पर्यंत ते फार्ग्युसन कॉलेजांत फार्सी भाषेचे अध्यापक होते. सध्या कोल्हापूरच्या राजाराम कॉलेजात फार्सी व इंग्लिश या भाषांचे अध्यापक आहेत. ' फार्सी–मराठी–कोश, ' ' छंदोरचना ' अशीं भाषांशास्त्रविषयक पुस्तकें, त्यांनीं लिहिलीं असलीं तरी कवि म्हणून ते विशेष प्रसिद्ध आहेत. ' विरहतरंग ', 'सुधारक,' व ' द्राक्षकन्या ' हीं खंडकाव्यें त्यांनीं लिहिलीं असून त्यांची स्फुट कविताहि बरीच आहे. फार्सी व जुने मराठी शब्द कवितेंत आणल्यामुळें क्वचित् स्थळीं कविता क्लिष्ट झाली आहे. परंतु त्यांच्या काव्यात जिवंतपणा आहे. कल्पना आणि विचार या दोहींचें नावीन्य इतक्या मोठ्या प्रमाणांत इतरत्र क्वचितच आढळून येतें.

## गोविंद गोपाळ टिपणीस ( १८६७–१९२५ )

जन्मस्थान कुलाबा जिल्ह्यांतील महाड. कौटुंबिक अडचणीमुळें कॉलेजांतील शिक्षण सोडून घरीं रहावें लागलें. तथापि प्राचीन मराठी काव्यवाङ्मयाचा सूक्ष्म अभ्यास त्यांनीं आमरण केला. त्यांचें बरेंचसें लेखन संतकवि व संतवाङ्मय यासंबंधींच आहे; तथापि इतर विषयांवरही ते अधूनमधून लिहीत असत. १९२० सालीं मुंबईच्या एल्फिन्स्टन कॉलेजांत मराठीचे प्रोफेसर म्हणून टिपणीस यांची नेमणूक झाली होती.

' संतांचा परिचय ' या शीर्षकाखालीं मासिक मनोरंजनांत टिपणीस यांनीं एक विस्तृत लेखमाला लिहिली होती त्यांतन ' चोखामेळा ' हा उतारा घेतला आहे.

## वामनपंडित

यांच्या जन्मकाळाविषयीं निश्चित माहिती नाहीं. तथापि तुकाराम–रामदासांचे हे समकालीन होते यांत शंका नाहीं. वामनपंडित या नांवाचे एकापेक्षां अधिक कवि होऊन गेले असें कांहीं टीकाकाराचें मत आहे. यथार्थदीपिका नांवाची गीतेवर

विस्तृत टीका यांनीं लिहिली आहे. रामचरित्र व कृष्णचरित्र यांतील कित्येक प्रसंगां-वर लहान लहान रसपूर्ण आख्यानें यांनी रचिलीं आहेत. भाषाशुद्धीकडे वामनपंडि-तांचें फारसें लक्ष असल्याचें दिसत नाहीं. संस्कृत शब्दांचा बराच भरणा यांच्या काव्यांत सांपडतो. पण शब्दालंकार व प्रासयुक्त भाषा यांमुळें वामनी श्लोक कानाला गोड लागतो. संस्कृतामधील वृत्तें मराठीत आणण्याचें श्रेय वामनपंडितांकडे आहे.

## नरसिंह चिंतामण केळकर ( १८७२ )

एलएल्. बी. झाल्यानंतर केळकरांनी सातार्‍याला वकिलीला सुरुवात केली होती, परंतु लिहिण्याची हौस त्यामुळें ' केसरी ' व ' मराठा ' या वर्तमानपत्राकडे टिळकांनीं मुद्दाम बोलावून घेतलें. टिळकांच्या हयातींत आणि नंतर हीं पत्रें त्यांनीं उत्कृष्टपणें चालविलीं. वर्तमानपत्री लेखनाचा दर्जा केळकरांनीं आपल्या व्यासंगानें वाढविला. मराठी गद्याचें ऐश्वर्य वाढविण्यास त्यांचें विपुल लेखन सर्वस्वी कारणीभूत झालें आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. केसरी व मराठा या पत्रांतून वेळोवेळीं नानाविध विष-यांवर त्यांनीं लेख लिहिले आहेत. त्याखेरीज ' मराठे व इंग्रज, ' ' राज्यशास्त्र, ' ' टिळकांचें विस्तृत चरित्र, ' ' आयर्लंडचा इतिहास, ' ' ग्यारिबाल्डीचें चरित्र ' इत्यादि पुस्तकें व ' तोतयाचें बंड ' वगैरे सात आठ नाटकें त्यांनीं लिहिलीं आहेत. त्यांच्याइतकें विपुल व विविध लेखन फारच थोडया लेखकांचें असेल.

## मोरोपंत ( १७२९–१७९४ )

या कवीचें सबंध नांव मोरेश्वर रामचंद्र पराडकर. यांचें लहानपण कोल्हापूरनजीक पन्हाळगडास गेलें. पाध्ये नांवाच्या गुरूपाशीं मोरोपंत संस्कृत शिकले. त्यांच्या वडि-लांनीं बारामती येथील सुप्रसिद्ध सावकार बाबूजी नाईक यांजकडे नोकरी धरली; तेव्हां मोरोपंतही बारामतीस आले आणि यांची योग्यता लक्ष्यांत घेऊन बाबूजी नाईकांनीं यांना आश्रय दिला. पंतांची बहुतेक सर्व काव्यरचना बारामतीस झाली. यांचे मुख्य काव्यग्रंथ म्हटले म्हणजे आर्याभारत, एकशें आठ रामायणें, मंत्रभागवत, हरिवंश वगैरे होत. स्फुट प्रकरणेंहि यांनीं पुष्कळच लिहिलीं आहेत.

पंतांच्याइतकी विपुल कविता फारच थोड्या कवींनीं केली आहे. बहुतेक काव्यें आर्यावृत्तांत असल्यामुळें त्यांना आर्यापति असें कौतुकानें लोक म्हणत. त्यांची भाषा व्याकरणशुद्ध व विविध प्रकारच्या शब्दार्थालंकारांनीं युक्त अशी आहे. संस्कृत शब्दांचा विशेष भरणा असल्यामुळें त्यांची कविता प्रायः दुर्बोध आहे. परंतु मराठी

भाषेला समृद्ध करून तिचें वैभव वाढविणारांमध्यें पंतांची प्रमुखत्वानें गणना केली पाहिजे यांत शंका नाहीं.

## विठ्ठल दत्तात्रय घाटे ( १८९६ )

प्रसिद्ध कवि दत्त यांचे हे चिरंजीव. हे एम्. ए., बी. टी., टी. डी. असून यांनीं शिक्षणशास्त्राचा चांगला अभ्यास केला आहे. सध्यां ते असिस्टंट एज्युकेशनल इन्स्पेक्टरच्या हुद्यावर आहेत. यांनीं कांहीं थोड्या कविता लिहिल्या असून ' मधुमाधव, ' ' शलका ' या काव्यसंग्रहांतून त्या प्रसिद्ध झाल्या आहेत. ' नाट्यरूप महाराष्ट्र ' या पुस्तकांत शिवकालीन इतिहास संवादरूपानें सांगितला आहे. थोडीच परंतु भावपूर्ण कविता यांनीं लिहिली आहे.

## गोविंद चिमणाजी भाटे ( १८७१ )

डेक्कन एज्युकेशन सोसायटीचे आजीव सभासद व विलिंग्डन कॉलेज, सांगली, या संस्थेचे माजी प्रिन्सिपाल. हे कर्ते सुधारक म्हणून प्रसिद्ध आहेत. हिंदुस्थानच्या निरनिराळ्या भागांत यांनीं प्रवास केला असून तत्संबंधी लेख व पुस्तकें वेळोवेळीं लिहिलीं आहेत. १९२९ सालीं हे विलायतेलाहि गेले होते आणि विलायतच्या प्रवासाची वर्णनपर विस्तृत लेखमाला यांनी मनोरंजनांतून प्रसिद्ध केली आहे. मराठीमध्यें प्रवासवर्णनपर विपुल वाङ्मय यांच्याइतकें दुसरें कोणीं लिहिलें नाहीं. याखेरीज ' प्रेम कीं लौकिक, ' ' अर्थशास्त्राचीं मूलतत्त्वें, ' ' सौंदर्य व ललितकला, ' ' कँट व शंकराचार्य, ' ' स्कॉटचें चरित्र ' इत्यादि विविध प्रकारचीं पुस्तकें यांनीं लिहिलीं आहेत. यांचें अवलोकन सूक्ष्म असून वर्णनपद्धति मोहक असते. भाषा सजविण्याकडे यांचें विशेष लक्ष नाहीं. सुंदर शब्दांपेक्षां अर्थवाहक शब्द उपयोगांत आणल्यामुळें यांची भाषाशैली स्वाभाविक वाटते.

## रघुनाथपंडित

या कवीसंबंधीं निश्चित माहिती मिळत नाहीं. परंतु हा रामदास–शिवाजीचा समकालीन असावा एवढें मात्र नक्की. ' नलदमयंतीस्वयंवराख्यान, ' ' गजेंद्रमोक्ष, ' व ' रामदास वर्णन ' एवढीं तीन काव्यें याचीं उपलब्ध आहेत. त्यापैकीं नलदमयंतीस्वयंवराख्यान हें फारच सरस उतरलें आहे. संस्कृतमधील नैषध काव्याच्या आधारानें हें लिहिलें आहे. प्राचीन मराठी कविता बहुतेक धार्मिक स्वरूपाची आहे. जीं कांहीं थोडीं अपवादस्थळें आहेत त्यांपैकींच या कवीची कृति आहे. शिवा-

जीच्या अष्टप्रधानांपैकीं जो रघुनाथपंडित त्यानेंच हीं काव्यें केलीं आहेत असें अलीकडे कांहीं विद्वान् संशोधक म्हणतात. रघुनाथपंडिताची भाषा प्रौढ व संस्कृत-प्रचुर आहे; शब्दालंकार व अर्थालंकार यांचीं उदाहरणें ठिकठिकाणीं सांपडतात. रचनेचें शैथिल्य बिलकुल नाहीं. तथापि जुनी भाषा व वाक्प्रचार यामुळें क्वचित ठिकाणीं दुर्बोधता आली आहे.

### करमणूक

हें साप्ताहिक पत्र प्रसिद्ध कादंबरीकार हरि नारायण आपटे हे लिहीत असत त्यांनीं आपल्या बऱ्याच कादंबऱ्या या पत्रांतूनच प्रथम प्रसिद्ध केल्या. करमणूक, ज्ञान व उपदेश यांचें योग्य संमिश्रण या पत्रांत असल्याकारणानें तें आबालवृद्धांस प्रिय असे. हें साप्ताहिक पत्र इ. स. १८९० पासून १९१७ पर्यंत प्रसिद्ध होत असे.

### माधवानुज (१८७२–१९१७)

यांचें मूळ नांव काशिनाथ हरि मोडक. धंदा डॉक्टरीचा पण वाङ्मयाकडे स्वाभाविक कल असल्यामुळें इंग्रजी कवींच्या कृतीचा उत्तम परिचय त्यांना झाला होता. रवीन्द्रनाथ टागोर यांच्या गीतांजलीचें यांनीं केलेलें भाषांतर आतांपर्यंत झालेल्या सर्व प्रयत्नांत सरस आहे. काव्यरचना करतांना जुन्या वृत्तांप्रमाणेंच नवीन चालींचाहि त्यांनीं स्वीकार केला आहे. नित्याच्या जीवनांतील मनोरम प्रसंगांची निवड करून त्यांवर काव्य करण्याकडे माधवानुजांची प्रवृत्ति असे करुणरस त्यांच्या काव्यांत प्रमुखत्वानें आढळतो.

### विनायक सदाशिव गोगटे (१८९९)

हे एम्. ए. असून तत्त्वज्ञान विषयाचे प्रोफेसर आहेत. कांहीं वर्षें नाशिक येथील हंसराज प्रागजी ठाकरसी कॉलेजमध्यें त्यांनीं काम केलें. सध्यां हे जुनागड येथील बहुद्दीन कॉलेजमध्यें आहेत. 'ज्ञानसिंधु व इतर गोष्टी' या नांवाचा यांचा लघुकथा संग्रह प्रसिद्ध आहे. इंग्रजीमधील विख्यात लघुकथालेखकांच्या निवडक लघुकथा भाषांतर करून वरील पुस्तकांत त्यांनीं संकलित केल्या आहेत. मुळांतील गोडी भाषांतरांत राखण्याचा त्यांचा प्रयत्न यशस्वी झाला आहे.

### रामदास (१६०८–१६८२)

निजामाच्या राज्यांत गोदावरीच्या कांठीं जांब नांवाचें गांव आहे. तेथें रामदास स्वामींचा जन्म झाला. रामदासांचें पहिलें नांव नारायण असें होतें. इच्छेविरुद्ध आईनें लग्न ठरविलें म्हणून हे ऐनवेळीं पळाले आणि नाशिकजवळील पंचवटींत

राहून त्यांनीं तपश्चर्या केली. पुढें रामाची ते उपासना करूं लागले म्हणून त्याचें नांव रामदास असें पडलें. रामदास हे आजन्म ब्रह्मचारी राहिले व महाराष्ट्रांत धर्मजागृति करण्याकरितां ' रामदासी पंथ ' नांवाचा स्वतंत्र पंथ त्यांनीं काढून, ठिकठिकाणीं मठस्थापना केली. स्वराज्यसंस्थापक छत्रपति शिवाजी महाराज हे रामदासांचे शिष्य होते आणि रामदासांच्या सांगण्यावरूनच भगवा झेंडा हें मराठ्यांचें राष्ट्रीय निशाण झालें.

रामदास हे साताऱ्याजवळील परळी किल्ल्यांत रहात असत. त्यालाच लोक सज्जनगड म्हणूं लागले. ' दासबोध, ' ' मनाचे श्लोक, ' स्फुट ओंव्या, ' ' करुणाष्टकें ' इत्यादि ग्रंथ त्यांनीं रचिले आहेत. त्यांपैकीं ' दासबोध ' हा त्यांचा महत्त्वाचा ग्रंथ असून रामदासांच्या शिकवणीचें सार त्यामध्यें आलें आहे. प्रपंच आणि परमार्थ यांची योग्य सांगड कशी घालावी याचा बहुमोल उपदेश दासबोधांत आला आहे. माघ वद्य ९ शके १६०३ या वर्षी रामदास स्वामींनीं सज्जनगडावर समाधि घेतली.

## गिरीश ( १८९३ )

श्री. शंकर केशव कानेटकर हे आपली कविता ' गिरीश ' या टोपण नांवानें प्रसिद्ध करतात. यांचें मूळ गांव सातारा जिल्ह्यांतील रहिमतपूर. हे एम्. ए. असून ' अभागी कमल, ' ' कला, ' ' आम्बराई ' हीं खण्डकाव्यें यांनीं लिहिलीं आहेत. यांच्या स्फुट गीतांचा संग्रह ' काञ्चनगङ्गा ' या नांवानें प्रसिद्ध झाला आहे. गिरीशांना कुणबाऊ भाषा चांगली साधते. त्यांचा सामाजिक विषयाकडे कल असून स्त्रियांचीं गाऱ्हाणीं त्यांनीं आपल्या काव्यांतून जनतेपुढें मांडलीं आहेत. रचना रेखीव असून भाषा प्रसादपूर्ण आहे. अपरिचित शब्द किंवा कर्णकटु शब्दप्रयोग सहसा आढळत नाहीत. त्यांचीं कांहीं भावगीतें गेय असल्यामुळें बरीच लोकप्रिय झाली आहेत.

## भास्कर रामचंद्र तांबे ( १८७४ )

हे ग्वालेरकडील असून त्यांचें शिक्षण व नोकरी तिकडेच झाली आहे. तांबे यांच्या कवितांचे दोन भाग प्रसिद्ध झाले आहेत. पहिल्या भागांतील बऱ्याचशा कविता कौटुंबिक वातावरणासंबंधीं आहेत. त्यांचीं नाट्यगीतें बहारीचीं आहेत व मुलांसंबंधीं लिहिलेल्या कवितांवरून त्यांचा प्रेमळपणा दिसून येतो. उच्च तऱ्हेची गूढ गुंजनात्मक

कविता लिहिण्याची प्रथा तांबे यांनींच पाडली. अर्वाचीन मराठी कवींमध्यें पहिल्या-प्रतीचे जे कवि आहेत त्यांच्यांत तांबे यांची गणना होते.

**विष्णुशास्त्री चिपळूणकर ( १८५०-१८८२ )**

प्रसिद्ध कृष्णशास्त्री चिपळूणकर यांचे हे चिरंजीव. डेक्कन कॉलेजांतून बी. ए. ची परीक्षा पास झाल्यानंतर कांहीं दिवस त्यांनीं सरकारी नोकरी केली. परंतु देशहिताचीं कामें करण्यास सरकारी नोकरी आड येत आहे असें दिसतांच त्यांनीं ती सोडून दिली व पुण्यास येऊन आगरकर, टिळक वगैरे तरुण पदवीधरांच्या मदतीनें ‘ केसरी ’ व ‘ मराठा ’ हीं वर्तमानपत्रें; आणि ‘ न्यू इंग्लिश स्कूल, ’ ‘ चित्रशाळा, ’ ‘ आर्य-भूषण छापखाना, ’ ‘ किताबखाना ’ वगैरे संस्था काढल्या. ‘ निबंधमाला ’ नांवाचें मासिक ते चालवीत होते आणि या मालेच्या द्वारें त्यांनीं लोकजागृतीचें फार मोठें कार्य केलें. स्वधर्म, स्वदेश व स्वभाषा यासंबंधीं सुशिक्षितांत त्यांनीं अभिमान उत्पन्न केला. विष्णुशास्त्र्यांनीं निबंधमालेच्या द्वारें मराठी भाषेची जी अमोलिक सेवा केली आहे तीमुळें त्यांचें नांव महाराष्ट्राच्या इतिहासांत अजरामर झालें आहे. मराठी भाषेचे अन्तर्हित सौंदर्यगुण विष्णुशास्त्र्यांनीं लोकांच्या निदर्शनास आणिले.

**श्रीधर बाळकृष्ण रानडे ( १८९४ )**

हे डेक्कन कॉलेजांत वनस्पति व प्राणिशास्त्राचे प्रोफेसर आहेत. यांनीं कांहीं स्फुट कविता व ‘ काळाच्या दाढेंतून ’ नांवाचें एक खण्डकाव्य लिहिलें आहे. कवि एकदां कॉलऱ्यानें आजारी पडला. त्यावेळीं आसन्नमरण स्थितीमध्यें असतांना मनांत जे विचार येत होते त्यांचें सम्यक् आविष्करण प्रस्तुत काव्यांत कवीनें केलें आहे. त्यांपैकीं एक उतारा या पुस्तकांत घेतला आहे.

**खं. सा. दौंडकर ( १९०५ )**

हे एम्. ए., एल्‌एल्. बी. असून मुंबई येथें वकिली करीत असतात. यांच्या लघुकथा मराठींतील नियतकालिकांतून वेळोवेळीं प्रसिद्ध झाल्या आहेत. विषय आणि रचना या दोन्ही दृष्टींनीं त्यांच्या लघुकथा नावीन्यपूर्ण असतात. कथानकाची विविधता, तंत्राची निर्दोषता, मार्मिक निरीक्षण व सूचकता हीं यांच्या लघुकथांचीं वैशिष्ट्यें आहेत. ‘ प्रतिभा ’ या पाक्षिकाच्या संपादकवर्गांपैकीं हे एक आहेत.

**कृष्णशास्त्री चिपळूणकर ( १८२४-१८७८ )**

पुण्याच्या पाठशाळेंत मोरशास्त्री साठे यांचे जवळ यांनीं संस्कृताचें अध्ययन केलें. हे लहानपणीं इतके बुद्धिवान् होते कीं, त्यांचे गुरु त्यांना ‘ बृहस्पति ’ या नांवानें

संबोधीत. इंग्रजी अमदानींत इंग्रजी विद्येशिवाय गत्यंतर नाहीं असें पाहतांच यांनीं प्रौढ वयांत इंग्रजी शिकण्यास प्रारंभ केला आणि त्या भाषेंत लौकरच प्रावीण्य मिळविलें. यांची बहुतेक गद्यपद्यात्मक वाङ्मयनिर्मिती भाषांतरित आहे. 'रासेलस,' 'पद्यमंजरी,' 'साक्रेटिसाचें चरित्र,' 'अनेकविद्यामूलतत्त्वसंग्रह' इत्यादि ग्रंथ यांनीं रचिले. कृष्णशास्त्र्यांनीं मराठी गद्यभाषेला साधें पण भारदस्त असें नवीन वळण लाविलें. परंतु त्यांच्या योग्यतेच्या मानानें त्यांच्या हातून स्वतंत्र ग्रंथरचना झाली नाहीं.

## मुक्तेश्वर ( १५९९—१६४९ )

प्रसिद्ध संतकवि एकनाथ यांचा हा नातू. हा दत्तसंप्रदायाचा होता. आरत्या, देवतांचीं स्तवनें, पदें इत्यादि त्रोटक काव्यरचनेशिवाय यांचे मुख्य ग्रंथ दोन. एक रामायण व दुसरें महाभारत. रामायण संपूर्ण उपलब्ध आहे. परंतु महाभारताचीं मात्र आदिपर्व, सभापर्व, वनपर्व, विराटपर्व आणि सौप्तिकपर्व अशीं पांचच पर्वें उपलब्ध आहेत. कवीनें बाकीचीं पर्वें रचिलीं नसावींत; किंवा रचिलीं असूनही आज उपलब्ध नसावीं. मुक्तेश्वर हा पहिल्या प्रतीचा कवि होता यांत शंका नाहीं. निसर्गाचीं काव्यमय वर्णनें ठिकठिकाणीं सांपडतात. मानवी मनाच्या सूक्ष्म छटा दर्शविण्याचें त्याचें कौशल्यही अवर्णनीय आहे. वर्ण्यविषयाच्या स्वरूपाप्रमाणें मुक्तेश्वराची वाणी भिन्न भिन्न स्वरूपें धारण करते.

## दत्तो वामन पोतदार ( १८९० )

शिक्षणप्रसारक मंडळी, पुणें, या संस्थेचे आजीव सेवक व सर परशुरामभाऊ कॉलेजमध्यें इतिहास व मराठी या विषयांचे प्रोफेसर आहेत. इतिहास–संशोधन हा त्यांचा आवडता विषय असून पुणें येथील 'भारत इतिहास संशोधक मंडळा'चे हे एक प्रमुख चालक आहेत. इतिहासविषयक बरेचसे लेख व 'मराठी गद्याचा इंग्रजी अवतार' हें वाङ्मयटीकात्मक पुस्तक अशी त्यांची वाङ्मयसेवा आहे. प्राचीन संस्कृति, प्राचीन इतिहास आणि स्वभाषा या विषयींचा त्यांचा अभिमान विशेष प्रखर स्वरूपाचा आहे. बखरी व ऐतिहासिक पत्रव्यवहार यांत आढळून येणाऱ्या जुन्या शब्दांचा व वाक्प्रचारांचा पुनरुद्धार करण्याचें बरेंचसें श्रेय पोतदारांना आहे. त्याचप्रमाणें लहान लहान ठकसेबाज व अर्थगर्भ वाक्यें हाही त्यांच्या भाषेचा विशेष नमूद करण्यासारखा आहे.

## गोपाळ गणेश आगरकर ( १८५६-१८९५ )

आगरकरांचा जन्म सातारा जिल्ह्यांतील टेंभू या गांवीं झाला. विद्यार्थीदशेंत असतांना त्यांना दारिद्र्याबरोबर बरेंच झगडावें लागलें. प्रतिकूल परिस्थितींतून वाट काढीत काढीत ते एम्. ए. झाले व चिपळूणकर व टिळक यांच्या साहाय्यानें न्यू इंग्लिश स्कूलची स्थापना त्यांनीं केली. फर्ग्युसन कॉलेज स्थापन झाल्यावर तर्क-शास्त्र व तत्त्वज्ञान हे विषय ते शिकवीत व पुढें प्रि. आपटे यांच्या मृत्यूनंतर ते प्रिन्सिपाल झाले. सामाजिक सुधारणेकडे यांचा प्रथमपासून ओढा. 'केसरी' पत्रांतून या विषयावर ते प्रथम लिहीत असत. नंतर आपल्या मताच्या प्रसारा-करितां त्यांनीं 'सुधारक' नांवाचें स्वतंत्र वर्तमानपत्र काढलें. सुधारकामधून लिहिलेले त्यांचे निबंध प्रसिद्ध आहेत. त्याशिवाय शेक्सपिअरच्या हॅम्लेट या नाट-काचें भाषांतर, डोंगरी तुरुंगांतील १०१ दिवस, वगैरे पुस्तकें यांनीं लिहिलीं आहेत. इंग्रजी अंमल सुरू झाल्यावर महाराष्ट्रांत लोकजागृति करण्याचें कार्य ज्या पुढाऱ्यांनीं केलें त्यांत आगरकरांची गणना प्रमुखत्वानें करावी लागेल. यांची भाषा मोठी जोरदार व प्रखर आहे; त्यांत आवेश व ओज आहे. त्यामुळें मराठी वाङ्मयांत यांच्या निबंधांना कायमचें स्थान मिळालें आहे.

## मोरो गणेश लोंढे ( १८५४-१९१० )

यांचें शिक्षण पेण येथें झालें. घरगुती अडचणींमुळें शिक्षणक्रम अर्धवटच राहिला. विविध विषयांवर यांनीं बरीच स्फुट कविता लिहली आहे. केवळ मुलांकरितां नीति-पर कविता लिहणार हे पहिलेच आधुनिक मराठी कवि. नीतिपर कविता सामान्य दर्जाची असली तरी कांहीं स्फुट काव्यावरून कवीच्या ठिकाणीं उच्च तऱ्हेची कल्पनाशक्ति होती असें दिसतें.

## शंकर बाळकृष्ण दीक्षित ( १८५३-१८९८ )

यांनीं 'भारतीयज्योतिषशास्त्राचा इतिहास' नांवाचा विद्वत्ताप्रचुर ग्रंथ लिहिला आहे. वैदिक वाङ्मयाचा काल ठरविण्यास त्याचा फार उपयोग होतो. हे मराठी शाळेंतील शिक्षक होते, परंतु अविरत परिश्रम करून वैदिक वाङ्मय, ज्योतिषशास्त्र व गणित यांचा अभ्यास करून त्यांनीं वरील ग्रंथ लिहिला. 'ज्योतिर्विलास' नांवाचें एक पुस्तक सामान्य वाचकांकरितां त्यांनीं लिहिलें आहे. अवघड विषय सोपा करून काव्यमय व आकर्षक भाषेंत मांडण्याची कला त्यांना साधली होती.

### वि. भि. कोलते ( १९०५ )

नागपूर विश्वविद्यालयाचे एम्. ए. असून उमरावती येथील कॉलेजांत मराठीचे अध्यापक आहेत. उदयोन्मुख कवि आणि व्यासंगी लेखक म्हणून यांनीं चांगलाच लौकिक संपादन केला आहे. यांनीं आपल्या कवितांचा संग्रह ' लव्हाळीं ' या नांवाखालीं प्रसिद्ध केला आहे. महानुभावीय वाङ्मय व भाषाशास्त्र या विषयांवरील त्यांचीं पुस्तकें लौकरच प्रसिद्ध होणार आहेत.

### गोविंद अनंत मोडक ( १८८८ )

' मुलांचा महाराष्ट्र ' या लोकप्रिय पुस्तकाचे कर्ते. ' लहान मुलांचा महाराष्ट्र ', ' लहान मुलांचा हिंदुस्थान ', ' इंग्लंडचा सोपा इतिहास ' व ' इंग्लंडचा इतिहास ' हीं इतिहासविषयक शालोपयोगी पुस्तकें यांनीं लिहिलीं आहेत.

### विनायक ( १८७२–१९०९ )

यांचें सबंध नांव विनायक जनार्दन करंदीकर. जन्म व शिक्षण धुळें येथें झालें. केशवसुत व टिळक यांचेबरोबर विनायकांनीं अर्वाचीन मराठी कवितेला नवीन वळण लाविलें. विनायकांना आधुनिक, राष्ट्रीय व ऐतिहासिक कवितेचे जनक म्हणण्यांत येतें तें अगदीं सार्थ आहे. देशाची दुरवस्था पाहून त्यांचें हृदय पिळवटून निघत असे; ऐतिहासिक कालांत ज्या शूर स्त्रियांनीं अतुल पराक्रम किंवा स्वार्थ-त्याग दाखविला, अशा स्त्रियांचीं चरित्रें त्यांनीं आदरपूर्वक गायिलीं आहेत. सोपी परंतु उत्कट भावनांनीं ओथंबलेली कविता लिहिण्याचें त्यांचें कौशल्य इतरांना क्वचि-त्च साधलें आहे.

### शंकर दामोदर पेंडसे ( १८९८ )

हे पंजाब युनिव्हर्सिटीचे पदवीधर असून सांप्रत नागपूरच्या हिस्लॉप कॉलेज-मध्यें मराठीचे प्रोफेसर आहेत. राष्ट्रीय वृत्तीचे तरुण लेखक व विशेषतः वक्ते—म्हणून यांची फार प्रसिद्धी आहे. मराठींतील प्रमुख मासिकांतून यांनीं विविध विषयांवर लेख लिहिले असून ' महाराष्ट्राचा सांस्कृतिक इतिहास ' नांवाचा त्यांचा ग्रंथ नव-भारत ग्रंथमालेनें प्रकाशित केला आहे. आवेशयुक्त, प्रतिपादनास अनुरूप अशी यांची भाषा असून प्रतिपक्षावर हल्ले करतांना तिचें रौद्र स्वरूपहि क्वचित दृष्टीस पडतें.

# अर्थबोधक टीपा

## विदर्भगीत

विदर्भ म्हणजे वऱ्हाड; पण या गीतांतील विदर्भाची मर्यादा सध्यांच्या वऱ्हाडाहून मोठी आहे हें सहज ध्यानांत येईल.

पुण्यसरिता–पवित्र नदी. वितरीत–देते. कार्पास–कापूस.

पयोष्णा–नदीचें नांव.

वैदर्भरीति–संस्कृत साहित्य शास्त्रज्ञांनीं वैदर्भी आणि गौडी अशा दोन प्रमुख रीति म्हणजे भाषाशैली मानल्या आहेत. गौडीमध्यें लांब लांब शब्द-समासप्रचुरता–असते. वैदर्भी सोपी व प्रसादयुक्त असते, म्हणून तिला कवीनें सरस म्हटलें आहे.

अतीव–फार. गीर्वाण–संस्कृत. सारस्वत–वाङ्मय.

महानुभाव–श्रीचक्रधरानें महानुभाव पंथाची स्थापना केली. या पंथाचें धार्मिक वाङ्मय प्राचीन मराठींत आहे.

आचार्य भास्कराला–भास्कराचार्य नांवाचे प्रसिद्ध गणिती होऊन गेले त्यांना. यांच्या एका पुस्तकाचें नांव लीलावती असें आहे. तें त्यांनीं आपल्या लीलावती नांवाच्या कन्येला गणित शिकविण्यासाठीं लिहिलें होतें.

मूर्त–मूर्तिमान्. विदर्भमहिला–वऱ्हाडांतील स्त्रिया. विभव–वैभव.

## घनःश्याम सुंदरा

द्विजगण–पक्ष्यांचा समूह. अघमर्षण–संध्येमध्यें म्हणावयाचें एक सूक्त. कापडी–भागीरथीची कावड घेऊन तीर्थयात्रा करणारे बैरागी. कुंभ–घागर. कुक्षीं–कडेवर. दध्योदन–दहीभात. रंगावळी–रांगोळी. बाहती–बोलावतात. पाडस–वासरूं( लहानगा कृष्ण हें यशोदेचें पाडस ).

मानस–( १ ) मन किंवा ( २ ) मानस सरोवर.

अध्यापन–शिकविणें. श्री–लक्ष्मी. अध्ययन–शिकणें. मुरहर–मुर नांवाच्या राक्षसाला मारणारा. शकटांतक–शकटासुराला मारणारा.

प्रतापतुंग–प्रतापानें श्रेष्ठ. आगळें–अधिक.

## स्फुट अभंग

साधूनी– अभ्यासानें. बचनाग– एक विषारी औषधि. भुजंग– साप.
भाव– निष्ठा. सायास– परिश्रम. खळ– दुर्जन. विषय– सुखाचीं साधनें.
अक्षराभिमानी–विद्वत्तेचा अभिमानी. आशा भरूनियां–इच्छा संपवून.
तातडी–त्वरा. बीबुडी–बीमोड; नाश. वमन–ओकणें, त्याज्य. अनुताप–त्रास.
देवाईल–देवालय. चर्म– कातडें. प्रक्षाळणें– धुणें. वोळगणे– देणें
वृंदावनफळ–एक कडू फळ. नितोडा– तोडतां न येण्यासारखा; मुळापासून.
साधन– योगसाधन. मुद्रा– समाधीचा एक प्रकार.
वाचासिद्ध–म्हटल्याप्रमाणें करण्याची शक्ति आली आहे ज्यांना ते.

## आईची आठवण

प्रेमस्वरूप– मूर्तिमंत प्रेम. कान्हा–कृष्ण. अक्षय्य– नाश न पावणारें.
सामीप्य–सान्निध्य. आबाळ–हयगय, निष्काळजी. प्रतिष्ठा– मोठेपणा
हृत्स्पन्द– हृदयाचे हलणें. आस– आशा. वक्षीं– हृदयावर.

## गजेन्द्रमोक्ष

विधु–परमेश्वर. दमुनी– शिक्षा करून. पक्षीन्द्रगमना–( पक्षि+इन्द्र=पक्ष्यांचा राजा; गरुड )– गरुड आहे वाहन ज्याचें त्याला, विष्णूला. द्विरदवरद– हत्तीचे कल्याण करणारा. करी– हत्ती. द्विरद– हत्ती; ज्याला दोन रद ( दांत ) आहेत तो. कर– हत्तीची सोंड. काळाकरिस –( काळ=मृत्यु ) मृत्युरूपी हत्तीला. हरी–सिंह. विपती–( वि=पक्षी ) पक्ष्यांचा राजा गरुड. स्वशरण– आपल्याला शरण आलेला. यान–वाहन. खगमन– आकाशांत चालणारें. जळज– कमल. त्रिदशनिकर– देवांचा समूह. स्मरणकरिता– स्मरण करणारा. अवधी– विलंब. निरवधी– अमर्याद. सुखकरीं– सहज. सारूप्य– समीपता, सलोकता, सरूपता आणि सायुज्यता अशा चार प्रकारच्या मुक्ति आहेत; त्यांपैकी तिसऱ्या प्रकारची मुक्ति. त्रिदशपति– विष्णु. रथचरण– चक्र. दीप्ति– तेज.

तींच तीं अक्षरें पुनः पुनः आली म्हणजे त्याला यमक म्हणतात. दुसऱ्या श्लोकांत ‘ करी ’ या दोन अक्षरांची पुनरावृत्ति कशी झाली आहे पहा. इतर श्लोकांतून कोणत्या अक्षरांची पुनरावृत्ति झाली आहे कां ?

वामन पंडितांची रचना व्याकरणशुद्ध नसते. प्रस्तुत कवितेंत अशुद्ध स्थळें आढळतात काय ?

## सुभद्राविवाह

प्रभास–द्वारकेजवळील एक तीर्थ. अनुज–धाकटा भाऊ. मातुल–मामा. अनुजा–पाठची बहीण. हलधर–बलराम. आप्तमुखें–ओळखीच्या लोकांकडून. अचक्षु–अंध. श्रुति–वेद. त्रिदंडी–संन्यासाचा एक प्रकार. राम–बलराम. नियती–दैव. वंचाया–फसविण्यासाठीं. यति–संन्यासी. कंचा–कोणता. तीर्थस्नायीस–तीर्थस्नान करणाराला. सपर्यंत–संपूर्ण. सुविरक्ती–तीव्र वैराग्य. सक्ति–आसक्ति, प्रीति. बलदेव–बलराम. गेह–घर. अग्रज–वडील भाऊ. कवळ–घास. वळ–बलराम. ते–ती ( सुभद्रा ). तद्योग–त्याचा उद्योग. दारक–लहान मूल. वरीं–वरवर, वरकरणी. कोप–राग. उपशम–शांत करणें. ब्रह्म–कृष्ण. पौर–नागरिक. पर्व–पूर्णिमा, अमावास्या, ग्रहण, कपिलाषष्ठी इत्यादि जे समुद्रस्नान, श्राद्ध, दान वगैरे पुण्यकर्मांना योग्य म्हणून काळ सांगितले आहेत ते प्रत्येक. अनंतवळ–बळरामाचें सैन्य. हय– घोडा. शिविका–पालखी. धरा–पृथ्वी. सुचिरक्षुधित–खूप वेळपर्यंत भुकावलेला. वृष्णिदारजन–यादवांच्या स्त्रिया ( दारा–स्त्री ). सुधांशु, सुधाकर–चंद्र. आशय–मन. पयोनिधि–समुद्र. समयज्ञ– कोणत्याही कार्याला योग्य वेळ कोणती हें जाणणारा. तूण–भाता. मुक्ता–मोती. मराल–हंस. विसर्जून–टाकून, सोडून. शशकिशोर–सशाचें पिल्लूं. वणिक्सार्थ–व्यापाऱ्याचा तांडा. कैरविणी–चंद्रविकासी कमलवेल.

बिसिनी–सूर्यविकासी कमलिनी. सविता–सूर्य. गौरविता–शोभविणारा.

सत्क्रिय–सदाचरणानें वागणारा. दंपती–पतिपत्नी. झटिति–लागलेंच. भट–योद्धा. कटक–सैन्य. बळासि–बळरामास. दस्यू–चोर ( अर्जुन ). भाट–स्तुतिपाठक. प्रस्फुरणें–कंपित होणें. अधरदल–खालच्या ओठाचा भाग.

पट–वस्त्र. अंगार–निखारा. गांठीतसे–बांधून घेतो.

निजधर्षणकरखळदंडोत्सवासि–आपलें हरण करणाऱ्या दुष्टाचें शासन करण्याचा उत्सव.

अर्णव–समुद्र. पर्वीं–पौर्णिमा व अमावस्या या दिवशीं.

संध्याराग–संध्याकालची लाली. सुरंजित–रंगविलेला. शोण–तांबडें.

सुदुर्घट–अतिकठिण. सहभव–स्वाभाविक. अनुकंपा–दया. आदान–मोठें भय. अंघ्रि–अंगठा. आणा–शपथ. पारिबर्ह–परिवार, लवाजमा. भूषा–अलंकार. वसनें–वस्त्रें. तर्णक–वासरूं. तर्पायासि–तृप्त, संतुष्ट करण्यासाठीं. अनुचर–भक्त. पर–परम, अतिशय. प्रभुवर–बलराम व कृष्ण. शरदभ्र–शरद् ऋतूंतील ढग. गुरु–वडील भाऊ. भगीरथाचा सखा–भगीरथासारखा यत्नानें प्रसिद्ध.
लोकपथ–लौकिक मार्ग.

## गौरीशंकर आणि मानव

मन्त्रदर्शी–ऋग्वेदांतील मंत्र ज्या ऋषींनीं पाहिले ते.
उषःसूक्त–उषेच्या स्तुतीचा मंत्र. स्थंडिल–होमासाठीं तयार केलेली जागा.
हिम–बर्फ. भानु–सूर्य. किरणावली–किरणांचा समूह.
ज्ञानदर्पान्ध–ज्ञानाच्या गर्वानें अंध झालेला. महोदधि–महासागर.
दुर्दम–शासन करण्यास कठीण; अजिंक्य. माळ–इन्द्रधनुष्यरूपी माळ.
अज्ञात–माहिती नसलेल्या गोष्टी.

## नळराजवर्णन

पुण्यश्लोक–पवित्र आहे कीर्ति ज्याची असा. शेषाहिला–शेष नांवाच्या सर्पाला. अवगाहणें–वर्णन करणें. शीतभानु–चन्द्र. उपराग–ग्रहण. भंग–लाटा. मौक्तिक–मोती. वाजी–घोडा. पाणउतार–ओहोटी. याजी–यज्ञ करणारा. धनद–कुबेर. गाजी–शूर. हूप–आवेश; उत्साह.
लोकबंधु–१सूर्य. २ लोकांचा हितकर्ता.
कुवलय–१ चंद्रविकासी कमल २ ( कु=पृथ्वी, वलय=मंडळ. ) भूमंडळ.
सांग–स+अंग. कुसुमचाप–मदन. शरधि–भाता. धन्व–धनुष्य. विपक्ष–शत्रु. विवर–भोंक. शरसंधानकरणी–धनुष्याला बाण जोडण्याचें कौशल्य. पूरितकाम–ज्यांचे मनोरथ सफल झाले असे. जंघी–वेगवान् किंवा जंघा म्हणजे मांड्या, त्यांनीं युक्त. वारांशि ( वार् = पाणी; राशि = सांठा )–समुद्र.
सोपा–भेटण्यास सुलभ. जोपा–सांभाळ. सोपा–पडवी, ( सुमतिचा ) सांठा. गोपायिता–रक्षणकर्ता. पावन–पवित्र. धर–पर्वत. रत्नाकर–समुद्र. गभीर–खोल. तामरस–रक्तकमळ. रसा–पृथ्वी. अक्ष–डोळा.

## मूर्तिकार

मुग्ध–मोहित. संलग्न–गढलेलें. शिरोधार्य–मस्तकावर धारण करण्यास योग्य. शिलाशलक–दगडाचे तुकडे. सुभग–सुंदर. विजन–निर्जन, ओसाड. वस्तुजात– सर्व वस्तु. कामपूर्ति करील–मनोरथ सफल होतील.

## करुणाष्टक

अनुदिन–दररोज. अनुताप–पश्चात्ताप. नीरसी–निरसन कर, नाहींशी कर. अचपळ–अतिशय चपळ, अस्थिर. कांस धरणें–आश्रयास जाणें. विषयजनित सुख–चैनीच्या पदार्थांनीं मिळणारें सुख. ओखटें–वाईट. दुरित–पाप. प्रचलित–चंचल. षड्रिपु–काम, क्रोध, लोभ, मोह, मद आणि मत्सर हे सहा शत्रु. पंचानन–सिंह. स्वरूपीं–ब्रम्हस्वरूपीं. जंबुकी–कोल्ही.

## पैसा

पहिला श्लोक एका प्रसिद्ध संस्कृत श्लोकाचें भाषांतर आहे. तीच कल्पना विशेष विस्तारानें गिरीशांनीं मांडलेली दिसते. दिसायला श्रीमंतीची स्तुति; पण खरा-खर पारख नसलेल्या अगर दुबळ्या अशा समजाची निंदा या कवितेंत सूचित आहे.

प्यारा–प्रिय, आवडता. पुत्रदारा–मुलगा व बायको. बहुश्रुत–( पुष्कळ ऐकलेला )–विद्वान्. विचक्षण–हुशार. अगारा–घराला.

## वनक्रीडा

अशन–खाणें. अघ–या नांवाचा राक्षस. शृंगीरव–शिंगाचा आवाज. बल्लव–गोप. पल्लव–कोंवळीं पानें. गुंजमाला–गुंजांच्या माळा. विहार–खेळ. तनाना करणें–आरडाओरड करणें. हंस गुरुगति–परमहंस गति, मोक्ष. चक्रपाणी–कृष्ण. मर्कट–माकड. पुच्छ–शेंपूट. निःशंक–निर्भय होऊन. तोक–लहान मूल. बक–बगळा. कर्णिका–फुलाचा मध्यभाग. ऱ्हस्व दीर्घे–लहान मोठीं. अंबुज, अंभोज–कमल. भवार्कातपत्र–संसाररूपीं सूर्याच्या तापापासून रक्षण करणारा.

## गुराख्याचें गाणें

ओहळ–ओढे. राइ–वनराई. बन्सीवाला–कृष्ण. परवशता–पारतंत्र्य. अहंकृति–अहंकार, अभिमान. लोह–लोखंड. अवमानितो–धिक्कार करतों. धनित्व–स्वामित्व, मालकी.

## काळाच्या दाढेंतून

भूतकालचे पट–जुन्या आठवणी. "कढत वाटली ओली गादी इतकें ( आंग ) गारठलें."– अतिशयोक्ति खरी पण वाचतांना स्वाभाविक वाटते.

"धरा उंच भांडें"–कॉलऱ्याच्या रोग्याच्या आंगांत पोकळ सुई टोंचून तिच्या द्वारें रक्तांत मिठाचें पाणी घालतात. तें सहज वहावें म्हणन त्या पाण्याचें भांडें 'उंच धरा' असें डॉक्टर सांगत.

प्रिय नयन–शेजारीं पत्नी काळजींत उभी होती तिचे डोळे. तेच पुढें "अंधारांत चमकले" व "( पाण्यानें ) डबडबले" आणि त्यावेळीं "अश्रु धुक्यांतुनि हास्यकिरणांचें दर्शन" कवीला झालें. बुद्बुद–बुडबुडा.

## झांशीवाली

झांशीची राणी लक्ष्मीबाई हिचा अंत ज्या ठिकाणीं १८५७ सालीं झाला त्या ठिकाणीं कवि गेला असतां त्याला हे विचार सुचले.

बिजली–वीज. कीर्तिरूप उरली–युद्धांत पडली व आतां कीर्तिरूपानें पृथ्वीवर आहे. इतिश्री–शेवट, अंत. शाहीर–कवि. तांबे–लक्ष्मीबाईच्या माहेराच्या कुलाचें नांव 'तांबे.'

## हरिश्चंद्राचा प्रवास

कौशिकदर्पें–विश्वामित्राच्या गर्वाप्रमाणें तीव्रतेनें. व्योम–आकाश. कडिये–कडेवर. उलों पाहे–उकलूं पाहे. 'सूर्यबिंब मध्यमंडळी, स्वल्प छाया दिसे मुळीं'–सूर्य जसजस डोक्यावर येतो तसतशी सांवली लहान होते. येरें–दुसऱ्यानें ( द्विजरूपांतील विश्वामित्रानें ). पल्लव–पदर. जीवन पाणी. सकाम–इच्छा धरून. प्रपा, पोहे–पाणपोई. चरणींचीं वसनें–जोडे. माया–वस्तु खरोखर नसतांना तसा भास होणें, जादू.

राजानें दुसऱ्यावर उपकार करावे, दुसऱ्याचे उपकार घेऊं नये. म्हणून पाणपोई-तील पाण्याचा स्वीकार करणें राजकुटुंबाला अयोग्य.

सुकृतधन–पुण्यरूपी धन. चामके–चालला. पालवीतसे–खुणावतो.
भीतरीं–आंत. नावेक–थोडा वेळ. गभस्ती–सूर्य. अधोपंथे–उतरणीला.
इये–ह्या. सावाइलें–वांचविलें. सायुज्यसदन–मोक्ष. अनल–अग्नि.
धर्मशिळा–सती सहगमन करतांना ज्या शिलेवर उभी राहते ती.
व्यस्त–वांकडे तिकडे, अस्ताव्यस्त. भलतियापरी-कांहीं तरी करून. विंदाण–चमत्कार.
धणीवरी–समाधान होईपर्यंत. इंदुवल्लभा–रात्र. वक्त्र–तोंड. परौतें–दूर.
अंत्रें–आंतडीं. बीभत्स–किळसवाणीं. मृगाब्धि–मृगजळ. हेलावा–लाटा.
वोडंबरी–जादू. मशकनाशिकींच्या–माशीच्या नाकांतील. शंका–भीति.
प्रभंजन–वारा. मेरु–या नांवाचा पर्वत.

## संशयरत्नमाला

परमेश्वर भेटावा म्हणून कवि धांवा करीत आहे, पण त्याग उशीर झाला. तेव्हां उशीर कां झाला म्हणून कवीच्या मनांत नानातऱ्हेचे संशय आले व त्या संशयांचें वर्णन या ठिकाणीं कवीनें केलें आहे.

देवी–लक्ष्मी. पुसती–विचारतां. आलापीत–गातगात.

शरणागतभयशमना–शरण येणाऱ्यांचें भय नाहींसें करणाऱ्या ( परमेश्वरा ).
शुभदैव–सुदैव. समीर–वायु. करुणाघन–दयेनें भरलेला ( घन ) दयाळु.
महत् कार्य–माझ्यासारख्या पातक्यास तारणें म्हणजे खरोखरच मोठें काम होय.
एकाकी–एकटा. खल–दुष्ट. सिकतासेतु–वाळूचा बंधारा. भजकीं–भक्तानीं.
पंकीं–चिखलात. सतीची–द्रौपदीची. असदर्क ( असत्-दुष्ट, अर्क-सूर्य )–दुष्ट दुःशासन हाच कोणी सूर्य. कुमुदिनी–चंद्रविकासिनी कमळ.
रक्षणीं–स्वतःच्या रक्षणीं. बळ–सैन्य. रक्षणार्हसें–रक्षण करण्यास योग्य.
दुःशील ग्रीष्म–वाईट स्वभावाचा जो मी तोच कोणी उन्हाळा. सजलों–तयार झालों; सज्ज झालों. प्रयास–कष्ट. नव–उगमापासून फार लांब न गेलेली, थोड्या पाण्याची. नामप्रतिनिधी–तुझें नांव हाच तुझा प्रतिनिधी. दवानळ–वणवा.

आज्य–तूप.

अवन–रक्षण. दयिता–प्रिय. अक्षक्रीडा–द्यूत. भजदवनव्यसन–भक्तांचें रक्षण करणें हें तुला लागलेलें व्यसन (नाद). वेंची–सांठवितो. पुरें–नगरें. स्पर्शमणि–परिस.

भारत-रण-वृत्त–' न धरीं शस्त्र करीं मी, सांगेन गोष्टी युक्तीच्या चार ' ही श्रीकृष्णाची प्रतिज्ञा अर्जुनाचें रक्षण करण्यासाठीं मोडावी लागली; म्हणजे प्रतिज्ञाभंग कांहीं परमेश्वराला नवा नव्हता !

चार मुक्ति–सलोकता, समीपता, सरूपता, सायुज्यता. बाहे–हात.

## रायगडावर काय आहे

इतिहासकार, चरित्रकार, चित्रकार, कल्पक, कादंबरीलेखक, नाटककार, कवि, कोणीही रायगडावर येवो, राष्ट्राचा इतिहास पूर्ण करण्याची ज्याची इच्छा असेल त्याला रायगडास पुष्कळच सामुग्री मिळेल.

संजीवनी–अमृत. चारुता–सौंदर्य. हिरकणी–या नांवाची गौळण. हर्म्य–राजवाडा. विधु–चन्द्र.

## लव्हाळीं

' महापुरें झाडें जाती । तेथें लव्हाळीं वांचती ' या तुकारामाच्या वचनाचा विस्तार या कवितेंत केला असल्याचें दिसून येईल.

नदींतील लव्हाळीं तशीच गोरगरिबांचीं कुटुंबें " दिन कंठितात शांत चित्तें; राग द्वेष, सारा सांडुनिया दूर, करिती संसार समाधानें; मग तयांचें कौतुक ना कोण करील ? '

## कृष्णाकुमारी

अदय–निष्ठुर. इंदुकला–चंद्राची कोर. निर्घृण–क्रूर. वेल्हाळा–आवडती. भाजा–भार्या, पत्नी. मानासी अर्पण करा–मानसिंहास आपली मुलगी द्या. धरणि–पृथ्वी. मृणालिनी–कमलिनी. अरि–शत्रु. रुधिर–रक्त. गुणीं–दोऱ्यानें. दुरित–पाप. भग्नमनोरथ–ज्याचे हेतु सिद्धीला गेले नाहींत असा. मधु–गोड. सुता–मुलगी. कुंतल–केश. जनक–पिता.

## महाराष्ट्रलक्ष्मी

द्वादशाब्द दुष्काल–सुमारें पांचशें वर्षांपूर्वी मोठा दुष्काळ पडला होता व त्याचे परिणाम प्रजेला बारा वर्षे भोंवले. समर्थाभिधान–' समर्थ ' हें नांव.